THE

# VEDÂRTHAYATNA

OR

AN ATTEMPT TO INTERPRET THE VEDAS.

# वेदार्थयत्न.



ऋग्वेदसंहिता

पदांसहित व

तिचें मराठी आणि इंग्रजी भाषांतर.

पुस्तक २. अंक ११. एप्रिल सन १८७८. मासिक भाग २५.
vol 2 April 1878 No 25

मुंबईः

"निर्णयसागर" छापखान्यांत छापिलें.

(हें सन १८६७ च्या २५ व्या आक्टाप्रमाणें नोंदलें आहे.)

२९२/२२

माझे

सर्व आर्य बंधु व भगिनी

यांस

हें भाषांतर

सादर समर्पण केलें आहे.

भाषांतरकर्ता.

२. तो पृथिवीतें धारण करिता झाला, आणि तिला पसरून विस्तीर्ण करिता झाला; तो वज्रानें मारमारून उदकें बाहेर काढिता झाला. तो [ वृत्ररूपी ] अहीस मारिता झाला, रौहिणाचे तुकडे करिता झाला. मघवा [ आपल्या ] पराक्रमानें व्यंसाला मारिता झाला.

2. He supported the earth and expanded it; he struck with the thunderbolt and sent forth the waters. He slew the serpent and killed Rauhiṇa. Maghavâ with his valorous deeds destroyed Vyaṁsa.

२. 'इंद्र आपल्या बळाच्या योगानें पृथिवीला धारण करिता झाला, म्हणजे अंतराळीं ठेविता झाला, खालीं न पडे असें करिता झाला. तसाच तो तिला पसरून विस्तीर्ण करिता झाला. तो वृत्राला मारून मेघोदकांना खालीं म्हणजे भूमीवर पाडिता झाला, तो वृत्ररूप सर्पाला मारून टाकिता झाला, आणि रौहिण या असुरालाहि मारणारा तोच होय. मघवा व्यंसाला मारून आपला पराक्रम दाखविता झाला.'

'[ वृत्ररूपी ] अहीस '= 'अहिम्'. सू. ३२, मं. १ याजवरील टीप पहा.

'रौहिण.' 'रौहिण'शब्दाचा अर्थ 'रोहिणीचा पुत्र'. 'रोहिणी' म्हणजे तांबडी. आणि ऋग्वेदांत तांबडी गाय या अर्थी या शब्दाचा उपयोग केलेला आहे, आणि तांबडी गाय म्हणजे तांबड्या वर्णाचे ढग अथवा तांबडी मेघमाला अशा भावार्थी तो शब्द योजिलेला दृष्टीस पडतो. आतां रौहिणशब्द ऋग्वेदांत प्रस्तुत मंत्राखेरीज एकच मंत्रांत ( ऋ. २. १२. १२ यांत) आला आहे, आणि तेथेंहि रौहिण म्हणजे असुरविशेष असाच अर्थ आहे, आणि त्याला इंद्रानें मारिलें असें सांगितलें आहे. आम्हांस असें वाटतें कीं, तांबडे ढग जे येतात ते उदकांला खालीं पडूं देत नाहींत, आणि त्या तांबड्या मेघमालिकेच्या पोटीं मेघोदकांला शोषून अथवा अवरोधून ठेवणारा असा असुर जन्मला आणि तो स्वभावतः उदकदात्या इंद्राचा शत्रु होय अशी वेदऋषींची कल्पना आहे.

'व्यंसाला '=' व्यंसम्.' हाहि एक तसाच असुर आहे. सू. १०१, मं. २ पहा. 'व्यंस'शब्दाचा अर्थ अक्षरशः 'बाहुरहित' म्हणजे ज्याला हात नाहींत तो, असा आहे. ज्याची आकृति कबंधासारिखी आहे, म्हणजे हात तोडून टाकिलेल्या मनुष्यासारिखी दिसते; असा जो ढग, त्यालाच ' व्यंस ' असें नांव ठेवून त्याला असुर असें मानिलें आहे असें वाटतें.

स जातूभर्मा श्रद्दधान ओजः पुरो विभिन्दन्नचरद्वि दासीः ।
विद्वान्वज्रिन्दस्यवे हेतिमस्यार्यं सहो वर्धया द्युम्नमिन्द्र ॥ ३ ॥

सः । जातूऽभर्मा । श्रत्ऽदधानः । ओजः । पुरः । विऽभिन्दन् । अचरत् । वि । दासीः ।
विद्वान् । वज्रिन् । दस्यवे । हेतिम् । अस्य । आर्यम् । सहः । वर्धय । द्युम्नम् । इन्द्र ॥ ३ ॥

---

## भाषायाम्.

३. जातूभर्मा (=जातानां=भूतानां भर्ता) स (=इन्द्रः) ओजः श्रद्धानः (=" ओजसा बलेन निष्पाद्यं कार्यं श्रद्धानः आदरातिशयेन कामयमानः ") दासीः पुरः (=दस्युसंबन्धीनि नगराणि) विभिन्दन् (=विविधं छिन्दन्) वि अचरत् (=ता विविधमचरत्=स्वकीयं विजयं प्रदर्शयितुमिच्छन् तासामुपरि चचार)। हे वज्रिन् (=वज्रधर इन्द्र), विद्वान् (=शत्रोर्मर्मस्थलादीनि जानन्) [त्वं] दस्यवे (=दस्योरूपरि=अनार्यजनानामुपरि) हेतिम् अस्य (=शस्त्रं प्रेरय) [अपि च] आर्यं सहः द्युम्नं [च] (=आर्यजनानां बलं यशश्च) वर्धय (=अतिवृद्धं कुरु)॥

जातूभर्मेति शब्दः संदिग्धार्थः । सायणेन कृतयोरर्थयोस्त्वन्यतरं वयमनुसरामः ॥

श्रद्धान ओज इत्यत्रापि यत्सायणेन व्याख्यानं कृतं तदेव साधीयः अन्यव्याख्यातॄणां व्याख्यानेभ्य इति वयम् ॥

---

'पराक्रमानें'=' शचीभिः.' अक्षरशः अर्थ, 'पराक्रमाच्या कृत्यांनीं' असा आहे. 'शची'शब्दाच्या मूळ अर्थाविषयीं सू. ५३, मं. ३ याजवरील टीप पहा.

हा मंत्र खालीं दाखविल्याप्रमाणें श्लोकबद्ध चालला असतोः—

स धारयत्पृथिवीं पप्रथच्च
वज्रेण हत्वा निरपः ससर्ज ।
अहन्नहिम् अभिनद्रौहिणं वि
अहन्विअंसं मघवा शचीभिः ॥

३. प्रजांचें पालन करणारा जो [ इन्द्र ] पराक्रम करण्याच्या इच्छेनें दस्यूंचीं नगरें फोडून टाकिता झाला आणि त्यांजवरून चालला.– हे वज्रधरा, [ मर्मस्थल ] जाणणारा [ असा तूं ] दस्यूच्या आंगावर शस्त्र टाक, [आणि ] हे इन्द्रा, आर्य लोकांचें बळ [ आणि] यश हीं वाढीव.

3. He, the support of creation, longing for exploits, struck down the cities of the Dasyus and walked forth upon them. Holder of the thunderbolt, cast thou, who knowest [ the vulnerable ], the missile against the Dasyu and, Indra, augment the power and glory of the Âryas.

---

३. 'सर्व लोकांचें प्रतिपालन करणारा जो इंद्र त्याला मोठा पराक्रम करण्याची इच्छा होऊन त्यानें अनार्य लोकांचीं शहरें फोडून टाकिलीं, आणि मग त्यांजवरून चालून गेला. आणि दस्यु लोकांस म्हणजे अनार्य लोकांस मारून आर्य लोकांचा अधिकार आणि त्यांची कीर्ति यांची वृद्धि केली; त्याप्रमाणेंच हे इंद्रा, तूं आतांहि अनार्य लोकांला मारून टाकून आर्य लोकांची समृद्धि कर' असा या मंत्राचा भावार्थ आहे.

'प्रजांचें पालन करणारा '=' जातूभर्मा.' ह्या शब्दाच्या अर्थाविषयीं थोडा वाद आहे. सायणाचार्यच दोन अर्थ करितात, 'वज्रधर' आणि ' प्रजांचें पालन करणारा.' यांतून आम्हीं एक घेतला आहे. कितीएक पाश्चिमात्य विद्वान् 'जन्मापासून पालन करणारा ' असा अर्थ करूं इच्छितात, पण या शब्दाचीं प्रयोगान्तरें नसल्यामुळें अर्थान्तराची कल्पना करण्यास मार्ग दिसत नाहीं. 'जातूस्थिर' असा एक शब्द ( २. १३. ११ यांत ) आला आहे त्याचा अर्थ ' नित्य स्थिर ' असा सायणांनीं केला आहे इतकाच, ' जातूभर्मा ' या शब्दाचा जो पाश्चिमात्यांनीं अर्थ कल्पिला आहे त्याला आधार आहे.

' पराक्रम करण्याच्या इच्छेनें '=' श्रद्दधान ओजः.' हा सायणानुसारी अर्थ इतर विद्वानांच्या अर्थापेक्षां चांगला दिसतो आणि निराधार आहे असें आम्हांस वाटत नाहीं.

' दस्यूच्या आंगावर शस्त्र टाक आ[णि] आर्य लोकांचें बळ आणि यश हीं वा[ढी]व.' यावरून 'दस्यु' म्हणजे आर्य लो[कांस] उपद्रव करणारे आणि त्यांच्या ध[र्मा]प्रमाणें न चालणारे जे आर्य लोकांच्या आसपास राहणारे रानटी अथवा अनार्य लोक, ते होत हें उघड आहे. म्ह-

तदूचुषे मानुषेमा युगानि कीर्तेन्यं मघवा नाम बिभ्रत्।
उपप्रयन्दस्युहत्याय वज्री यद्ध सूनुः श्रवसे नाम दधे ॥ ४ ॥
तत्। ऊचुषे। मानुषा। इमा। युगानि। कीर्तेन्यम्। मघऽवा। नाम।
बिभ्रत्।
उपऽप्रयन्। दस्युऽहत्याय। वज्री। यत्। ह। सूनुः। श्रवसे। नाम।
दधे ॥ ४ ॥

## भाषायाम्.

४. मघवा (=धनवान्) शवसः सूनुः (=बलस्य पुत्रः=अतिबलवान् इन्द्रो) वज्री (=वज्रहस्तः सन्) दस्युहत्याय उपप्रयन् (=दस्युहननाय असुरान् हन्तुं तान् प्रति गच्छन्) यत् ह नाम (=यदेव नामधेयं) दधे (=धृतवान्) तद् (=तदेव) कीर्तेन्यं (=कीर्तनीयं स्तुत्यं) नाम (=नामधेयम्) इमा मानुषा युगानि (=इमानि मानुषाणि युगानि=एतेषु मनुष्यसंबन्धिषु कालेषु) ऊचुषे (=इन्द्रं सेवमानाय दैन्यो-पेतायोपासकाय=तदर्थे) बिभ्रत् [वर्तते] (=धारयन्भवति=धारयति) ॥

पुराकाले वृत्रादीनां दस्यूनां हनने मघवा यथा बलवान् बलवत्त्वकीर्तिमांश्चासीत् तथैव स इदानीमपि बलवान् बलवत्त्वकीर्तिमांश्च भवति स्वबलेन च स्वोपासकानां शत्रून् हन्तीति भावः।

दुर्बोधैषा सायणेनैवं व्याख्याता। नाम शत्रूणां नामकं तदिन्द्रस्य बलमूचुष उक्तवते स्तुवते यजमानाय कीर्तेन्यं कीर्तनीयं स्तुत्यं नामकं तद्बलं बिभ्रत् धारयन्मघवा धनवानिन्द्रो मानुषा मनुष्याणां संबन्धीनीमेमानि दृश्यमानानि युगान्यहोरात्रसंघ-निष्पाद्यानि कृतत्रेतादीनि सूर्यात्मना निष्पादयतीति शेषः। किं पुनस्तन्नाम। दस्यु-[ह]त्याय दस्यूनां वृत्रादीनां हननायोपप्रयन् गृहसमीपान्निर्गच्छन् वज्री वज्रवान्सूनुः [प्राणि]नां प्रेरयितेन्द्रो यद्ध यत् खलु नाम शत्रूणां नामकं श्रवसे जयलक्षणाय यशसे दधे [धृतव]ान्। इति ॥

[वय]ं तु ऊचुषे उचतिः सेवाकर्मेति धातोरिति (ऋ. ७. ३७. ३ इत्यत्र सायणकृतं [भाष्यं] दृश्यताम्)। सूनुः श्रवसे इत्यस्य स्थले सूनुः शवसः इति साधीयांसं पाठमर्थला-[घवाद्] गृह्णीमः। इन्द्रो हि, का सुष्टुतिः शवसः सूनुमिन्द्रमर्वाचीनं राधस आ ववर्तत्। (ऋ. ४. २४. १) इत्यत्र, शवसः सूनुरित्युक्तः। शवसः सूनुः बलस्य पुत्रः अतिबली इति तस्य भाष्यम् ॥

४. अतिप्रबळ इंद्र हातांत वज्र घेऊन दस्यूंला मारण्यासाठीं चाल करून जाऊन जें नांव धारण करिता झाला, तेंच प्रख्यात नांव मघवा ह्या मानवी काळांत दीन उपासकांसाठीं धारण करीत [ असतो ].

4. Maghavâ bears in these human ages that renowned name for his humble worshipper, which he, mighty Indra, held when goi ng forth armed with the thunderbolt to slay the Dasyus.

णजे आतां जे कोळी, खोंड, भिल्ल इत्यादि रानटी व नीचजाति आपण पहातों तेच समजावयाचे. ते जसे चोरी करण्यांत आतां दक्ष आहेत तसेच पूर्वी होते, म्हणूनच दस्युशब्दाचा अर्थ 'चोर' असाहि होतो. आणि तूर्त तर संस्कृतज्ञ साधारण लोक 'दस्यु' म्हणजे 'चोर' असाच केवळ अर्थ समजतात. आर्य लोक म्हणजे आमचे जे वाडवडील त्यांची अभिवृद्धि कर, आणि त्यांचे प्रतिस्पर्धी जे अनार्य लोक म्हणजे त्यांच्या धर्माप्रमाणें न वागणारे आणि इंद्रादिकांची उपासना न करणारे लोक त्यांचा नाश कर, अशा प्रार्थना वेदांत पुष्कळ ठिकाणीं आल्या आहेत.

या मंत्राचें पूर्वार्ध परोक्षपर व उत्तरार्ध प्रत्यक्षपर आहे हें सहज लक्ष्यांत येईलच.

'अस्य' ह्या शब्दाचा अर्थ 'टाक' असा स्पष्ट असतां तो सोडून देऊन "ह्याचा ( उपासकाचा )" असा अर्थ करून, 'टाक' या अर्थी एके क्रियापदाचा अध्याहार सायणाचार्य कशाकरितां करितात नकळे. ऋ. ३. ३१. १७ आणि ६. ५२. ३ हे मंत्र पहा. त्यांतहि 'हेतिम् अस्य' हा प्रयोग आम्हीं येथें केलेल्या अर्थी केला आहे.

४. भावार्थः— 'अति प्राचीनकाळीं इंद्रानें हातांत वज्र घेऊन वृत्रादिक जे असुर ते मारून सर्वांनीं ज्याची कीर्ति गावी असा पराक्रम केला अशी प्रख्याति आहे. तोच इंद्र सांप्रतकाळीं त्या प्रकारचे पराक्रम करीत नाहीं असें कोणी समजूं नये, तर पूर्वीं जो इंद्र होता तोच आतांहि आहे आणि पूर्वीं जसे प्रख्यात पराक्रम तो करी तसेच तो आतांहि भक्तजनांसाठीं करण्यास समर्थ आहे.'

हा भावार्थ जरी उघड आहे तरी हा मंत्र कठिण आहे. पहिल्या अर्धांत क्रियापदाची अपेक्षा असतांहि तें त्यांत नाहीं; उत्तरार्धात 'पुत्र' या अर्थाचा 'सूनु' शब्द आहे, तर कोणाचा पुत्र हें दाखविण्यास शब्द नाहीं. आम्हीं पूर्वार्धात 'अस्ति' या सहज अध्याहार्य क्रियापदाचा अध्याहार करून आणि उत्तरा-

तद॑स्ये॒दं प॑श्यता॒ भूरि॑ पु॒ष्टं श्रदिन्द्र॑स्य धत्तन वी॒र्या॑य ।
स गा अ॑विन्द॒त्सो अ॑विन्द॒दश्वा॒न्त्स ओष॑धी॒: सो अ॒पः स वना॑नि ॥
॥ ५ ॥ १६ ॥

तत् । अ॒स्य । इ॒दम् । प॒श्य॒त । भूरि॑ । पु॒ष्टम् । श्रत् । इन्द्र॑स्य । ध॒त्तन॒ । वी॒र्या॑य ।
सः । गाः । अ॒वि॒न्द॒त् । सः । अ॒वि॒न्द॒त् । अश्वा॑न् । सः । ओष॑धीः । सः । अ॒पः । सः । वना॑नि ॥ ५ ॥ १६ ॥

सति पुनरूचिषे इति पाठे तत् नाम विभ्रत् धारयन् त्वं मघवा ऊचिषे तत् नाम सेवसे तस्यैव नाम्नो धारणेन जातानन्दोसीति योजनीयम् । पिबा दधृग्यथोचिषे (ऋ. ८. ८२. २) इत्यत्र 'ऊचिषे'पदस्य सायणेन या व्याख्या कृता सा दर्शनीया ॥

## भाषायाम्.

५. [ हे जनाः ], अस्य ( =इन्द्रस्य ) तद् (=वक्ष्यमाणं ) भूरि (=प्रभूतं ) पुष्टं ( =प्रवृद्धं ) [ वीर्यं ] पश्यत (=आलोकयत ) [ अपि च ] इन्द्रस्य वीर्याय श्रद् धत्तन ( =श्रद्धत्त=" वहुमानं कुरुत " ) । स [ हि ] गाः अविन्दत् ( =मनुष्याणामर्थे अलम्भयत् ) सः अश्वान् अविन्दत् ( =स इन्द्रोश्वानलम्भयत् ) स [ इन्द्रः ] ओषधीः ( =व्रीह्यादीन् वृक्षकान् ) [ अविन्दत् ] स [ इन्द्रः ] अपः ( =उदकानि ) [ अविन्दत् ] स [ इन्द्रः ] वनानि ( =वृक्षजातानि चूतपनसादीनि) [ अविन्दत्=मनुष्यान् अलम्भयत् ] ॥

येन वीर्येणेन्द्रो मनुष्याणामर्थे गाः अश्वान् व्रीह्यादीन् धान्यवृक्षकान् उदकानि तथा वृक्षान् निरपादयत् तद्वीर्यं यूयं पश्यत तस्मै वीर्याय च श्रद्धत्तेति भावः ॥

र्थांत ' सूनुः श्रवसे ' या शब्दांच्या स्थळीं ' सूनुः शवसो ' असा पाठ अर्थलाभासाठीं कल्पून निर्वाह केला आहे. ( भाषा पाहा ).

' अतिप्रबळ '=' शवसः सूनुः.' अक्षरशः अर्थ 'बलाचा पुत्र' इतकाच आहे. ' बलाचा पुत्र ' याचा अर्थ 'अति बळी' असा कसा होतो याविषयीं ऋ. ४. २४.

१ या मंत्रावरील सायणभाष्य पाहा.

' दस्यूंला.' या ठिकाणीं ' दस्यु ' म्हणजे ' वृत्रादिक जे इंद्राचे शत्रु ते ' असा अर्थ आहे.

' या मानवी काळांत '=' इमा मानुषा युगानि.' ( अत्यंतसंयोगी द्वितीया ). इंद्रानें पूर्वी आपले शत्रु मारून जसा प्रसिद्ध झाला तसाच तो आतांहि या म-

५. तर त्या [ इन्द्रा]ची ही विस्तीर्ण [ आणि ] मोठी शक्ति तुम्ही पहा, इन्द्राच्या शक्तीवर तुम्ही विश्वास ठेवा. तोच गाई प्राप्त करून देता झाला, तो अश्व प्राप्त करून देता झाला, तो वनस्पतींतें, उदकांतें, [ आणि ] वृक्षांतें [ प्राप्त करून देता झाला ].

5. Behold ye then this His great might, have ye faith in Indra's might: He found the cows, he found the horses, he the plants, he the waters, he the trees.

नुष्यकाळीं॰ आपल्या बळानें प्रसिद्ध आहे असें या मंत्रांत म्हटलें आहे. यावरून या मंत्राचा कर्ता जो कुत्स ऋषि तो आपल्या काळाला मनुष्यकाळ असें म्हणतो, आणि इंद्रानें आपले शत्रु वृत्रादिक मारिले ते पूर्वींच्या काळीं मारिले असें सुचवितो; यावरून कुत्स ऋषि हा आपण साधारण मनुष्यांतील एक मनुष्य आहें, आणि आपण ज्या काळांत राहत आहें तो साधारण मनुष्यांचा काळ आहे, असें समजतो आहे हें उघड होय. मनुष्यकाळ म्हणजे ज्या काळीं इंद्रादि देव या जगामध्यें वृत्रादिक असुरांबरोबर युद्ध करून मोठमोठे चमत्कार करीत नसतात तसला काळ. या संबंधानें हा मंत्र मोठ्या महत्त्वाचा आहे, कारण कीं कुत्स ऋषीसारिखा वेदसूक्तांचा कर्ता आपल्या काळाला ' साधारण मानवी काळ ' म्हणतो यावरून तो सत्ययुग, त्रेतायुग अथवा द्वापरयुग असे काळाचे भाग कल्पीत नाहीं आणि त्यांतून उत्तम युगांत आपण राहात आहें असेंहि समजत नाहीं हें सिद्ध होतें.

वृत्तसुखासाठीं ' कीर्तेन्यं ' याऐवजीं ' कीर्तेनिअं ' असा पाठ म्हटला पाहिजे.

५. ' हे जनहो, ज्या शक्तीच्या योगेंकरून इंद्रानें मनुष्यांच्या हितासाठीं गाई, घोडे, धान्यें, उदक आणि वृक्ष हे निर्माण केले ती इंद्राची महाशक्ति त्या त्या गाई इत्यादि रूपानें तुम्हांसमोर दिसत आहे, ती तुम्ही पहा; आणि तीच इंद्राची महाशक्ति आहे, तिच्या योगानें तुमचें कल्याण होईल असा भरंवसा ठेवा', असा भावार्थ.

' गाई प्राप्त करून देता झाला '=' गा अविन्दत्.' अक्षरशः अर्थ जरी प्राप्त करून देता झाला असा आहे तरी गाई उत्पन्न करिता झाला अथवा देता झाला असा विवक्षित अर्थ आहे.

' वनस्पतींतें '=' ओषधीः.' म्हणजे साळी इत्यादिक जीं धान्यें तीं.

भूरिकर्मणे वृषभाय वृष्णे सत्यशुष्माय सुनवाम सोमम् ।
य आदृत्या परिपन्थीव शूरोऽयज्वनो विभजन्नेति वेदः ॥ ६ ॥
भूरिऽकर्मणे । वृषभाय । वृष्णे । सत्यऽशुष्माय । सुनवाम । सोमम् ।
यः । आऽदृत्य । परिपन्थीऽइव । शूरः । अयज्वनः । विऽभजन् ।
एति । वेदः ॥ ६ ॥

## भाषायाम्.

६. भूरिकर्मणे (=बहुविधेन शत्रुवधादिकर्मणोपेताय) वृषभाय (=सर्वश्रेष्ठाय) वृष्णे (=सेचनसमर्थाय=वीर्योपेताय) सत्यशुष्माय (=अवितथबलाय) [इन्द्राय] सोमं सुनवाम (=सोमरसमभिषुणवाम) । शूरः (=वीर्योपेतो) य [इन्द्रः] परिपन्थीव (=मार्गनिरोधकश्चौर इव) [अयज्वानम्] आदृत्य (=विलोभ्य) अयज्वनः (=अयजमानस्य यज्ञमकुर्वतो मनुष्यस्य) वेदः (=धनं) विभजन् एति (=अपहरन् गच्छति=यत्र यत्र गच्छति तत्र तत्र अयज्वनो धनं यज्वने ददद् गच्छति)॥

'वृक्षांतें'='वनानि.' म्हणजे आंबे, फणस इत्यादि जे वृक्ष ते. 'वन' शब्दाचा अर्थ वेदांत वृक्ष असा होतो याविषयीं ऋ. ६. ३९. ५ याजवरील सायणभाष्य पहा.

वृत्तसुखासाठीं द्वितीय चरणांत 'वीर्याय' याच्या ऐवजीं 'वीरिआय' असा पाठ म्हटला पाहिजे. पहिल्या पादांत संहितापाठांत 'पश्यत' असें मूळरूप असतां 'पश्यता' असें दीर्घ केलें आहे त्याजकडे लक्ष्य द्यावें. वृत्ताचा विचार करितां 'पश्यत' अशा ऱ्हस्व रूपाचीच अवश्यकता आहे असें असतांहि दीर्घ पाठ केला आहे आणि तो वृत्तासाठीं केला आहे यावरून हीं जीं त्रिष्टुभ्, जगती इत्यादि वेदवृत्तें तीं म्हणण्यांत आधुनिक त्याच वृत्तांच्या प्रकारांला विरुद्ध असा कांहीं तरी पूर्वींच्या काळीं भेद असे हें उघड आहे; म्हणजे जेथें आपण आतां ऱ्हस्व किंवा दीर्घ अक्षर पाहिजेच असें समजतों तेथें वैदिक कवि दीर्घ अथवा ऱ्हस्वच पाहिजे असें समजून तीं तीं वृत्तें गात असत. याविषयीं दुसरींहि उदाहरणें सांपडतातः—याच सूक्ताच्या तिसऱ्या मंत्रांतील चौथा चरण, यांत 'वर्धय' असें मूळरूप असतां आणि आधुनिक वृत्ताला 'वर्धय' अशा रूपाचीच विवक्षा असतां 'वर्धया' असें वेदवृत्ताला अनुसरून दीर्घ केलें आहे; सू. १०१ मं. ९ पाद २ यांत 'चक्रम' असें मूळरूप असतां आणि तशाच रूपाची अवश्यकता असतां 'चक्रमा' असें दीर्घ केलें आहे. त्याप्रमाणें त्याच सूक्ताच्या आठव्या मंत्रांतील चौथा चरण पहा.

६. महापराक्रमी, सर्वश्रेष्ठ, वीर्यवान् आणि सत्यशक्तिमान् इन्द्रासाठीं आम्ही सोम पिळून काढूं; कारण कीं तो शूर, वाटमाऱ्या चोराप्रमाणें, आदर करून अधार्मिकाचें द्रव्य हरण करून धार्मिकास देत देत जातो.

6. Let us extract the Soma for the achiever of great deeds, for mighty, the manly and the truly powerful Indra; who possessed of valour goes, alluring the ungodly and carrying away his property, like a waylayer.

---

६. 'हे मित्रहो, आपण इन्द्राकारणें सोमरस काढून सिद्ध करूं, कारण इन्द्र महापराक्रम करणारा, सर्व देवांत श्रेष्ठ, वीर्यवान् आणि खरा बळवान् आहे; आणि तो अधार्मिकाचें धन युक्तीनें हरण करून धार्मिकाला देत देत जात असतो,' असा भावार्थ आहे.

'अधार्मिकाचें द्रव्य हरण करून धार्मिकास देत देत जातो '=' अयज्वनः विभजन् एति वेदः.' अक्षरशः अर्थ 'अधार्मिकाचें धन देत देत जातो'. म्हणजे अधार्मिकाचें लुटून घेऊन धार्मिकाला देत देत जातो. म्हणजे, अधार्मिकाची हानि करून धार्मिकाचा लाभ करून देत देत जिकडे तिकडे जातो, जिकडे जिकडे जातो तिकडे तिकडे अधार्मिकाचें धन धार्मिकाला देत असतो. ' देत देत जातो ' याऐवजीं जे ' विभजन् एति ' हे शब्द आहेत ते लक्ष्यांत ठेविले पाहिजेत. दुसरीं उदाहरणें वेदांत पुष्कळ सांपडतात:– ' विचाकशत् चन्द्रमा नक्तम् एति '=' रात्रीच्या वेळीं चंद्रमा प्रकाशत प्रकाशत येत असतो ' (ऋ. १. २४. १०).

' वाटमाऱ्या चोराप्रमाणें '=' परिपन्थीव.' या उपमेकडेस लक्ष्य द्यावें. यावरून दोन गोष्टी सिद्ध होतात; १ ली ही कीं, ज्या काळीं पाप नव्हतें, चोरी नव्हती इत्यादिक कथा पुराणांत सांगितल्या आहेत त्या सत्ययुगांत आतांसारिखेच रस्तेलूट करणारे चोर असत आणि रस्त्यावर लोकांस लुटीत असत. आणि २ री ही कीं, शूरपणानें रस्ते लूट करणें हें फार नीच कर्म आहे असें त्या वेळचे लोक मानीत नसत, कारण जर मानते असते, तर वाटमाऱ्या चोराची उपमा इंद्राला कुत्स कवीनें दिली नसती.

तदिन्द्र प्रेव वीर्यं चकर्थ यत्ससन्तं वज्रेणाबोधयोऽहिम् ।
अनु त्वा पत्नीर्हृषितं वयश्च विश्वे देवासो अमदन्ननु त्वा ॥ ७ ॥

तत् । इन्द्र । प्रऽइव । वीर्यम् । चकर्थ । यत् । ससन्तम् । वज्रेण । अबोधयः । अहिम् ।
अनु । त्वा । पत्नीः । हृषितम् । वयः । च । विश्वे । देवासः । अमदन् । अनु । त्वा ॥ ७ ॥

---

## भाषायाम्.

७. हे इन्द्र, त्वं ससन्तम् अहिं (=स्वपन्तं वृत्ररूपं सर्पं मदोन्मत्तत्वाच्चिन्तारहितं यथा तथा स्वपन्तं वृत्रं) वज्रेण यद् अबोधयः (=वज्रताडनेन यदा प्राबोधयः) तत् (=तदा) वीर्यं प्र चकर्थेव (=तव बलं प्रख्यातमिव कृतवानसि)। [तदा] हृषितं (=वृत्रघाताज्जातहर्षं) त्वा (=त्वां) पत्नीः (=पत्न्यः=देवपत्न्यो) वयश्च (=मरुतश्च) अनु [अमदन्] (=अनुक्रमेण हर्षं प्रापयन्) विश्वे देवासः (=विश्वे देवाश्च="अन्ये च सर्वे देवाः") त्वा (=त्वाम्) अनु अमदन् (=अनुक्रमेण हर्षं प्रापयन्) ॥

हे इन्द्र, यदा चिन्तारहितं सुखेन निद्रितं वृत्रं त्वं हतवानसि तदा त्वं तव बलं प्रख्यातमिव कृतवानसि । तेन हननेन च हृषितं त्वां दृष्ट्वा देवपत्न्यो मरुतश्च तथा अन्ये च देवाः स्वयमपि हृषिता अभवन् त्वां चाभ्यनन्दयन्निति भावः ॥

७. हे इन्द्रा, [ त्वां ] जेव्हां निजलेल्या अहीला वज्रानें जागृत केलें तेव्हां [ तूं ] जसें काय आपलें बळ प्रख्यात केलेंस. [ मग ] हर्षयुक्त झालेला जो तूं त्या तुला [ देव]पत्न्या आणि मरुत् [ हे ] आपला आनंद प्रदर्शित करिते झाले, [ आणि ] तुला सकळ देव आनंद प्रदर्शित करिते झाले.

7. Thou didst then proclaim as it were, O Indra, thy might when thou by thy thunderbolt didst wake the serpent that was sleeping. With thee that wast gladdened, the Goddesses and the Maruts rejoiced, with thee all the Gods rejoiced;

---

७. 'हे इंद्रा, तुझें बळ जरी अनादिकाळापासून सिद्धच आहे आणि नवीन उत्पन्न झालेलें नाहीं, तरी तें जें प्रख्यातीस आलें तें तूं वृत्राला मारिल्यापासून प्रख्यातीस आलें. आणि तूं जेव्हां वृत्राला मारून टाकिलेंस तेव्हां सकल देवपत्न्या, मरुत् आणि इतर देव हे आनन्दित झाले आणि तुझी स्तुति गाते झाले.'

'निजलेल्या अहीला'='ससन्तम् अहिम्.' वृत्राला 'अहि' म्हणजे 'सर्प' असें म्हणण्याचा प्रघात वेदांत आहे. याविषयीं सू. ३२, मं. १–५ आणि आमच्या टीपा पहा. 'निजलेला' याचें तात्पर्य असें कीं मला माझ्याइतका सामर्थ्यवान् शत्रु कोणी कोठेंच नाहीं असें समजून जो चिंतारहित होऊन खुशाल निजला होता त्या वृत्राला उठवून इंद्रानें मारिलें.

'आनंद प्रदर्शित करिते झाले'='अनु अमदन्.' म्हणजे तुला जसा हर्ष झाला तसा त्यांसहि झाला आणि त्यांनीं तुझी स्तुति आनंदभरानें केली.

'मरुत्'='वयः.' अक्षरशः अर्थ 'पक्षी' इतकाच आहे. सू. ८५, मं. ६ याजवरील टीका आणि भाषा पहा.

वृत्तसुखासाठीं प्रथम चरणांत 'वीरिअं' असें म्हणावें लागतें.

शुष्णं पिप्रुं कुयवं वृत्रमिन्द्र यदावधीर्वि पुरः शम्बरस्य ।
तन्नो मित्रो वरुणो मामहन्तामदितिः सिन्धुः पृथिवी उत द्यौः ॥
॥ ८ ॥ १७ ॥

शुष्णम् । पिप्रुम् । कुयवम् । वृत्रम् । इन्द्र । यदा । अवधीः । वि । पुरः । शम्बरस्य ।
तत् । नः । मित्रः । वरुणः । ममहन्ताम् । अदितिः । सिन्धुः । पृथिवी । उत । द्यौः ॥ ८ ॥ १७ ॥

---

## भाषायाम्.

८. [ अपि च ] हे इन्द्र, यदा [ त्वं ] शुष्णं, पिप्रुं, कुयवं वृत्रम् [ इत्येतानसुरान् ] अवधीः ( =हतवानसि ) शम्बरस्य [ नामासुरस्य च ] पुरः ( =पुराणि ) वि [ दारितवानसि ] [ तदा ] [ वीर्यं प्र चकर्थेव=तव बलं प्रख्यातमिव कृतवानसि ] । तत् ( =एतच्च=एतेन सूक्तेन च यत्प्रार्थितं तत् ) मित्रः, वरुणः, अदितिः ( =एतन्नाम्नी देवानां माता ), सिन्धुः ( =समुद्राभिमानिनी देवता ) पृथिवी उत द्यौः ( =पृथिवी द्युलोकश्च ) [ इत्येते ] नः ममहन्ताम् ( =अस्मभ्यम्=अस्मदर्थं पूजयन्तु=ददतु ) ॥

---

८. [ आणि ] हे इन्द्रा, तूं जेव्हां शुष्णाचा, पिप्रूचा, कुयवाचा आणि वृत्राचा वध केलास, आणि शंबराच्या नगरांचा नाश करून टाकिलास, [ तेव्हां ] तूं जसें काय आपलें बळ प्रख्यात केलेंस. [आणि] हें मित्र, वरुण, अदिति, समुद्र, पृथिवी आणि द्यू आम्हांला दान देओत.

8. [And thou didst then proclaim thy might when ] thou, Indra, slewest S'ushṇa, Pipru, Kuyava, [ and ] Vṛitra [and] didst destroy the cities of S'ambara. And may Mitra, Varuṇa, Aditi, the Sea, Earth and Heaven confirm this unto us.

---

८. 'आणि हे इंद्रा, शुष्ण, पिप्रु, कुयव, आणि वृत्र यांस जेव्हां त्वां मारिलें, आणि शंबराचीं नगरें जेव्हां त्वां फोडिलीं, तेव्हां तूं आपलें बळ या जगांत प्रख्यात करिता झालास. आणि आतां या सूक्तांत जी प्रार्थना आम्हीं केली आहे ती मित्र, वरुण, अदिति, समुद्र, पृथिवी आणि द्यू हे सफळ करोत.'

या मंत्राचा जो पूर्वार्ध त्याचा संबंध आम्हीं पूर्वींच्या मंत्राशीं घेतला आहे आणि तसा घेतल्यानें अर्थ चांगला निघतो असें आम्हांस वाटतें. सायणाचार्य 'हे इंद्रा, तूं जेव्हां शुष्णादिक च्यार असुरांला मारिलेंस तेव्हां तूं शंबराचीं नगरें फोडिता झालास' असा या मंत्राचा अन्वय या मंत्रांतच पूर्ण करून घेतात.

'शुष्ण.' सू. ५१, मं. ११ आणि टीप पहा.

'पिप्रु.' सू.५१मं.७ आणि टीप पाहा.

'कुयव' हा कोणी एक असुर होय आणि त्याला इंद्रानें मारिलें असें ऋग्वेदांत सांगितलें आहे. कुयव म्हणजे नापिकाचा असुर, म्ह. पीक चांगलें होत नाहीं आणि माहगाई पडते तोच कोणी एक असुर असा भावार्थ 'कुयव' शब्दाचा आहे.

'शंबर.' सू. ५१, मं. ६, ५४. ४, ५९. ६ इत्यादि मंत्र आणि टीपा पहा.



## सूक्तम् १०४.

आङ्गिरसः कुत्स ऋषिः। इन्द्रो देवता। त्रिष्टुप् छन्दः॥

**योनिष्ट इन्द्र निषदे अकारि तमा नि षीद स्वानो नार्वा।**
**विमुच्या वयोऽवसायाश्वान्दोषा वस्तोर्वहीयसः प्रपित्वे॥ १॥**

योनिः। ते। इन्द्र। निऽसदे। अकारि। तम्। आ। नि। सीद। स्वानः। न। अर्वा।

विऽमुच्य। वयः। अवऽसाय। अश्वान्। दोषा। वस्तोः। वहीयसः। प्रऽपित्वे॥ १॥

---

### भाषायाम्.

१. हे इन्द्र, ते (=त्वदर्थे) [अयं] योनिः (=इदमासनम्) अकारि (=अस्माभिः प्रकल्पितमस्ति)। स्वानो न अर्वा (=हेषाशब्दं कुर्वाणोश्व इव) तम् आ नि षीद (=आगत्य तस्मिन्नुपविश)। [किं कुर्वन्?] वयो विमुच्य (=वीन् रश्मीन् शिथिलान् कृत्वा) [अपि च] दोषा वस्तोः प्रपित्वे (=रात्रौ दिने दिनोपक्रमे पूर्वाह्णे च) वहीयसः (=त्वामादरेण वहतः) अश्वान् अवसाय (=विमुच्य=बद्धस्थानान्विमुक्तान् कृत्वा)॥

'प्रपित्वे'शब्दस्य व्याख्या सायणेनैव मन्त्रान्तरेषु (ऋ. ७.४१.४, ४.१६.१२) 'दिवसस्य पूर्वाह्णे' इति कृतास्ति सा दर्शनीया॥

'वि'शब्देन रश्मय उच्यन्ते इति सम्यक् सायणः॥

## सूक्त १०४.

ऋषि—अंगिरस्कुळांतील कुत्स. देवता—इंद्र. वृत्त—त्रिष्टुभ्.

१. हे इन्द्रा, तुला बसण्यासाठीं हें आसन सिद्ध केलें आहे; याजवर, खिंखाळत येणाऱ्या घोड्याप्रमाणें तूं येऊन बैस. लगाम सोड; आणि रात्रीं, दिवसाला, आणि पहांटेस तुला शीघ्र वाहून नेणारे घोडे मोकळे कर.

## HYMN 104.

To *Indra*. By *Kutsa*, of the family of *Angiras*. Metre.—*Trishṭubh*.

1. A seat has, O Indra, been prepared for thee to sit on; come, sit on it, like a neighing horse: untying the reins and letting off the horses that carry thee speedily at night, during day and in the early dawn.

---

१. हेंहि सूक्त कुत्स ऋषीनेंच केलेलें आहे. या पहिल्या मंत्रांत कुत्स कवि म्हणतात, 'हे इंद्रा, तुजकारणें हें पहा आम्हीं आसन घातलें आहे, तर तूं जवान घोड्यासारिखा त्वरित येऊन त्याजवर बैस. येण्याकरितां तुझे जे घोडे ते आपल्या रथाला जोड आणि लगाम सैल सोड. तुझे घोडे सामान्य नव्हेत, ते तुला दिवसाला तीनदा, म्हणजे सकाळीं, दोनप्रहरीं आणि रात्रीं मोठ्या त्वरेनें उपासकांचा सोम प्यावयाला नेत असतात.'

'खिंखाळत येणाऱ्या घोड्याप्रमाणें'= 'स्वानः अर्वा.' म्हणजे फार शीघ्र आणि झपाट्यानें येणारा.

'पाहांटेस'='प्रपित्वे.' ऋ.७. ४१. ४ आणि ४. १६, १२ यांजवरील सायणभाष्य पाहा. 'दोषावस्तोः प्रपित्वे' या शब्दांचा अर्थ सायणाचार्य '[हवि देण्याचा वेळ समीप आला असतां] रात्रीं आणि दिवसाला' असा करितात. 'दोषावस्तोः' हे शब्द ऋग्वेदांत पुष्कळ ठिकाणीं आले आहेत त्यांचा सायणाचार्य सर्वत्र रात्रीं आणि दिवसाला असा अर्थ करितात.

ओ त्ये नर इन्द्रमूतये गुर्नू चित्तान्त्सद्यो अध्वनो जगम्यात्।
देवासो मन्युं दासस्य श्वम्नन्ते न आ वक्षन्त्सुविताय वर्णम् ॥२॥

ओ इति। त्ये। नरः। इन्द्रम्। ऊतये। गुः। नु। चित्। तान्।
सद्यः। अध्वनः। जगम्यात्।
देवासः। मन्युम्। दासस्य। श्वम्नन्। ते। नः। आ। वक्षन्। सु-
विताय। वर्णम्॥ २॥

---

## भाषायाम्.

२. त्ये (=ते ते प्रसिद्धा) नरः (=यजमानाः=उपासका) ऊतये (=रक्षणाय) इन्द्रम् ओ गुः (=आगच्छन्ति) (=ये ये यजमाना इन्द्रं प्रति रक्षणाय गच्छन्ति) [स] तान् नू चित् सद्यः (=क्षिप्रमेव) अध्वनो जगम्यात् (=सन्मार्गान् गमयेत्=गमयतु)। [अपि च] देवासः (=देवाः) दासस्य मन्युं (=दस्योः क्रोधम्=अनार्यस्य क्रोधम्=क्रोधाविष्टान् अनार्यजनान्) श्वम्नन् (=हिंसन्तु) ते [च] [देवाः] नो वर्णम् (=अस्माकं वर्णम्=आर्यवर्णम्=आर्यवर्णस्य जनान्) सुविताय (=अस्मत्कल्याणाय=अस्माकमभिवृद्धये) आ वक्षन् (=आ वहन्तु=अस्मद्वर्णजनान् अधिकाधिकान् आनयन्तु)॥

भिल्लादीन् अनार्यजनान् मारयन्तु अस्मद्रूपा आर्यजनाश्च यथा प्रवृद्धा भवन्ति तथा कुर्वन्त्विति भावः॥

२. जे जे उपासक लोक, रक्षणासाठीं इन्द्राकडेस येतात, त्यांस तो तत्क्षणींच [ चांगल्या ] मार्गीं लावो. देव दस्यूचा क्रोध नाहींसा करोत. आणि ते आमचें कल्याण व्हावें म्हणून आमच्या वर्णाच्या लोकांला घेऊन येओत.

2. Whatever men approach Indra for protection, may he even quickly show them the paths. May the Gods remove the wrath of the Dasyu, may they bring additions to our race for our happiness.

---

२. हा मंत्र कांहींसा कठिण आहे, पण भावार्थ उघड आहे असें आम्हांस वाटतें, तो असाः–'इंद्राची भक्ति आणि उपासना जे जे लोक करितात त्यांस तो सन्मार्गाकडे वळवो. देव तामसी अनार्य जनांचा नाश करून आमचा जो उंच आर्य वर्ण त्याचें म्हणजे आर्य वर्णातील लोकांचें कल्याण जेणेंकरून होई अशा रीतीनें आम्हां आर्य लोकांची संख्या वाढवो.'

'जे जे'='त्ये.' अक्षरशः अर्थ 'ते' इतकाच आहे. पण दुसऱ्या पादांत 'तान्' हें पद आहे यावरून आणि अर्थसंदर्भाकडे पाहतांना 'जे ते' अथवा 'जे जे' असा अर्थ चांगला जुळतो.

'दस्यूंचा क्रोध नाहींसा करोत'='मन्युं दासस्य श्वम्नन्.' म्हणजे क्रोधी अथवा तामस स्वभावाचे जे अनार्य लोक (कोळी, खोंड, भिल्ल इत्यादिकांचे वाडवडील) त्यांस नाहींसे करोत.

'आमच्या वर्णाच्या लोकांला घेऊन येओत'='नः आ वक्षन् सुविताय वर्णम्.' म्हणजे आमच्या जातीचे जे लोक (आर्य लोक) त्यांतील अधिक लोक आणोत; म्ह. आमची जात जेणेंकरून मोटी होईल तसें करोत, आमच्या वर्णाच्या लोकांची संख्या वाढो आणि तसें झाल्यानें आमचें कल्याण होईल. 'आमच्या वर्णाच्या लोकांला घेऊन येओत' म्हणजे तात्पर्य आमच्या लोकांची संतति वाढवोत असें आहे. 'पुत्रपौत्र आण' अशी प्रार्थना वेदांत असते तेव्हां तिचा अर्थ 'पुत्रपौत्र उत्पन्न होतील असें कर' असा असतो, त्याचीं उदाहरणें पुष्कळ सांपडतील. ऋ. ६. १६. ३६. यांत 'ब्रह्म प्रजावत् आ भर' असें आहे त्याचा अर्थ सायणाचार्य "हे अग्नी, अन्न आणि पुत्रपौत्र घेऊन तूं ये" असा करितात.

'ते नः आ वक्षन् सुविताय वर्णम्' या चवथ्या पादाचा अर्थ सायणाचार्य "देव जे ते इंद्राला आमच्या यज्ञाप्रत घेऊन येओत" असा करितात.

वृत्तसुखाकरितां प्रथम पादांत 'इन्द्रम्' याच्या ऐवजीं 'इन्दरम्' असें म्हणावें आणि तिसऱ्या पादांत 'दासस्य' याच्या ठिकाणीं 'दाअसस्य' असें म्हणावें लागतें त्याजकडेस लक्ष्य द्यावें.

अव त्मना भरते केतवेदा अव त्मना भरते फेनमुदन् ।
क्षीरेण स्नातः कुयवस्य योषे हते ते स्यातां प्रवणे शिफायाः ॥३॥

अव । त्मना । भरते । केतऽवेदाः । अव । त्मना । भरते । फेनम् । उदन् ।
क्षीरेण । स्नातः । कुयवस्य । योषे इति । हते इति । ते इति । स्याताम् । प्रवणे । शिफायाः ॥ ३ ॥

---

### भाषायाम्.

३. केतवेदाः (=" केतं ज्ञातं परेषां धनं येन स तादृशः" =परधनाभिलाषी) [कुयवः] अव त्मना भरते (="ज्ञातं परेषां धनमपहरति"), [अपि च] त्मना उदन् (=स्वयम् उदके) फेनम् अव भरते (=फेनोपलक्षितमुदकमपहरति)। [तस्य] कुयवस्य (=एतन्नामकस्यासुरस्य) योषे (=द्वे भार्ये) क्षीरेण स्नातः (=पयसा स्नानं कुर्वाते) ते [योषे] शिफायाः प्रवणे (=शिफानाम्न्या नद्या अगाधप्रदेशे) हते स्यातां (=नष्टे भवेताम्) ॥

दुर्बोधैषा कथं कथमपि बोध्या। सायणस्तु केतवेदाः केतं ज्ञातं वेदः परेषां धनं येन स तादृशः कुयवनामासुरस्त्मनात्मना स्वयमेवावभरते। ज्ञातं परेषां धनमपहरति। अपि च सोसुर उदन्नुदकेऽन्तर्वर्तमानः सन्फेनं फेनयुक्तमुदकमात्मना स्वयमेवावभरते। अपहरति। क्षीरेण क्षरणशीलेन तेनापहृतेनोदकेन कुयवस्यासुरस्य योषे भार्ये स्नातः। स्नानं कुर्वाते। तादृश्यौ स्त्रियौ शिफायाः। शिफा नाम नदी। तस्याः प्रवणे निम्ने प्रवेष्टुमशक्येऽगाधप्रदेशे हते नष्टे स्याताम्। भवेताम्। हे इन्द्र, त्वं परेषां धनमपहृत्यान्यैर्दुरवगाह उदकस्य मध्ये वर्तमानं कुयवं सकुटुम्बमवधीरित्यर्थः इति ॥

अव भरते इति पदद्वयं पाश्चात्यैः अव भ्रियते= अधो ह्रियते=उदके नष्टो भवतीति व्याख्यातम्। तत्तु व्याख्यानं सत्यपि सायणविवरणात्साधीयसो व्याख्यानस्यापेक्षितत्वे नाधारवद्भवतीति मे मनः ॥

३. मत्सरी [ कुयव ] स्वतः [ द्रव्य ] हरण करितो, तो स्वतः उदकांत [ राहून ] उदक नाहींसें करितो. कुयवाच्या दोन बायका दुधानें स्नान करितात. त्या दोघी शिफेच्या डोहांत बुडून मरोत.

3. The covetous [ Kuyava ] himself robs, he himself robs the foamy wave in the water. Kuyava's two wives bathe in milk; may they both be drowned in the whirlpool of the S'iphâ.

३. हा मंत्र फार कठिण आहे. आम्हीं सायणास अनुसरून अर्थ केला आहे: 'कोणाचें द्रव्य कोठें आहे हें ज्याला ठाऊक असतें असा जो कुयव असुर तो नदी, सरोवर इत्यादिकांच्या उदकांत राहून तें उदक नाहींसें करीत असतो, आणि त्यामुळें जनास फार क्लेश होतात. आणि कुयवाच्या दोन बायका तर खुशाल दुधानें स्नान करितात. तर असा जो दुष्ट कुयव त्याच्या दोघीहि बायका शिफा नदीच्या डोहांत बुडून मरोत.'

यांत काठिन्य हें कीं 'कुयव' हा कोण आणि त्याची कथा काय आहे हें कळत नाहीं. या मंत्राचा स्पष्ट अर्थ समजण्यास त्याच्या कथेचा पत्ता लागला पाहिजे, तो नाहीं. या मंत्रावरून ती कथा काय असेल त्याची कल्पना करणें आहे. त्यावरून कुयव हा कोणी तरी पाणी हरण करणारा असुर असावा, आणि त्याला दोन बायका आहेत अशी समजूत असावी. आणि कुयव जरी लोकांला पाण्याचें दुर्भिक्ष करून क्लेश देतो तरी त्याच्या बायका खुशाल दुधानें स्नान करीत असतात अशी समजूत असावी; आणि शिफा ही एक नदी असून तिचा एक मोठा खोल डोह असावा, आणि कोणाचें तरी अनिष्ट चिंतावयाचें अथवा बोलावयाचें असलें म्हणजे 'तो शिफेच्या डोहांत बुडून मरो' असें म्हणण्याचा प्रघात पडलेला असावा, असें वाटतें.

'कुयव.' या असुराविषयीं ज्या ज्या मंत्रांत सांगितलें आहे ते सगळे वाचून पहातां सायणाचार्य 'कुयव' या नांवाचा असुर (त्याला इंद्रानें मारिलें), यापेक्षां अधिक कांहींच लिहीत नाहींत. अक्षरशः 'कुयव' या शब्दाचा अर्थ 'वाईट धान्य' इतका होतो, त्यावरून 'दुर्भिक्ष उत्पन्न करणारा असुर' असा अर्थ कितीएक कल्पितात. परंतु कुयवाला इंद्रानें मारिलें असें वगैरे ज्यांत सांगितलें आहे त्या वेदवाक्यांवरून पाहातां कुयवाचें स्वरूप काय आहे हें कळण्यास कांहींच आधार नाहीं. ऋ. १. १९. ६; ४. १६. १२; ६. ३१. ३; ७. १९. २ आणि १. १०३. ८ पहा.

**युयोप नाभिरुपरस्यायोः प्र पूर्वाभिस्तिरते राष्टि शूरः ।**
**अञ्जसी कुलिशी वीरपत्नी पयो हिन्वाना उदभिर्भरन्ते ॥ ४ ॥**

युयोप । नाभिः । उपरस्य । आयोः । प्र । पूर्वाभिः । तिरते । राष्टि । शूरः ।
अञ्जसी । कुलिशी । वीरऽपत्नी । पयः । हिन्वानाः । उदऽभिः । भरन्ते ॥ ४ ॥

**प्रति यत्स्या नीथादर्शि दस्योरोको नाच्छा सदनं जानती गात् ।**
**अध स्मा नो मघवञ्चर्कृतादिन्मा नो मघेव निष्षपी परा दाः ॥ ॥ ५ ॥ १८ ॥**

प्रति । यत् । स्या । नीथा । अदर्शि । दस्योः । ओकः । न । अच्छ । सदनम् । जानती । गात् ।
अध । स्म । नः । मघऽवन् । चर्कृतात् । इत् । मा । नः । मघाऽइव । निष्षपी । परा । दाः ॥ ५ ॥ १८ ॥

---

## भाषायाम्.

४. एषापि दुर्बोधा सायणेनैवं व्याख्याता । उपरस्योदकमध्य उप्तस्यावस्थितस्यायोः परेषामुपद्रवार्थमितस्ततो गच्छतः कुयवस्यासुरस्य नाभिः संनद्धमावसनस्थानं युयोप । गूढमासीत् । यथान्यैर्न दृश्यते सोऽसुरस्तथाकरोदित्यर्थः । अपि च पूर्वाभिः पूरयित्रीभिरात्मनापहृताभिरद्भिः प्र तिरते । सोऽसुरः प्रवर्धते । स च शूरः शौर्योपेतो राष्टि । राजते च । आत्मीयेन शौर्येण लोके प्रख्यातो भवतीत्यर्थः । तमिममसुरमञ्जस्याञ्जस्योपेता कुलिशी कुलं शातयन्ती वीरपत्नी वीरस्य पालयित्री । एतत्संज्ञिकास्तिस्रो नद्यः पयः पयसा तत्संबन्धिना सारभूतेनोदकेन हिन्वानाः प्रीणयन्त्य उदभिरात्मीयैरुदकैर्भरन्ते । धारयन्ति ॥

५. यद् (=यदा=यस्मात् कारणात् ) दस्योः स्या नीथा (=सा दस्योर्नीथा=कुयवस्य सा प्रसिद्धा पदवी=मार्गः) प्रति अदर्शि (=प्रत्यक्षं दृश्यते)—[सा हि] जानती ओको न (=जानती गौः स्वगृहं गच्छति तद्वत् ) सदनम् अच्छ गात् (=कुयवस्य गृहं प्रति गच्छति )—अध स्म (=अतः कारणात् ) हे मघवन् (=धनवन्निन्द्र ), चर्कृतात् (=कुयवकृतादुपद्रवात् ) नः (=अस्मान् ) [रक्ष ] इत् (=अवश्यमेव रक्ष) । निष्षपी

४. [उदकाच्या] खालीं [लपून] राहणाऱ्या [त्या] असुराचें निवासस्थान अदृश्य होय; तो विपुळ उदकांवर तरतो; तो शूर [जसा काय] राजाच होय. अंजसी, कुलिशी [आणि] वीरपत्नी ह्या त्याला दुधानें आनंदित करून [आपल्या] उदकांवर [त्यास] तरवितात.

4. Invisible is the home of the demon lying beneath [the water]. He floats on copious waters. The brave one rules. The Anjasî, the Kulis'î [and] the Vîrapatnî pleasing him with their milk bear [him] on their waves.

९. हे मघवन्, ज्यापेक्षां दस्यूचा तो मार्ग दृष्टीस पडतो आणि तो [मार्ग] वत्सोत्सुक गाईप्रमाणें [त्याच्या] घराकडे जातो, त्यापेक्षां तूं आम्हांला उपद्रवापासून [रक्ष]; विषयासक्त पुरुष [आपलें] द्रव्य [देऊन टाकितो] तसा तूं आम्हांस टाकून देऊं नकोस.

5. Since the path of the Dasyu is visible,—it goes to his lair like as a [cow] that knows her way home—do thou, O Maghavan, save us from molestation, do not give us away as a libertine gives away his riches.

'शिफा' नदी कोठें होती याविषयीं कांहीं ठाऊक नाहीं. हें नांव ऋग्वेदांत दुसऱ्या मंत्रांत कोठें आलेलें आढळत नाहीं.

द्वितीय पादाचा अंत वाचतांना 'उदन्' यांतील 'उ' अक्षर दीर्घ असावें अशी अपेक्षा होते. वृत्तासाठीं तरी 'फेनमुन्दन्' असें म्हणत असतील काय?

४. हाहि मंत्र कठिण आहे. आम्हीं सायणास अनुसरून भाषांतर केलें आहे. त्याचा भावार्थ असा कीं, 'कुयव हा असुर खोल पाण्यांत आपलें घर करून राहातो. तो शूर आहे. तो आपण हरण करून आणलेल्या उदकांवर सुखानें उदकांच्या राजासारिखा तरत असतो. अंजसी, कुलिशी आणि वीरपत्नी ह्या नद्या त्याच्या बंदिवान् जणुं होऊन गेल्या आहेत. त्या आपल्या दुधासारिख्या मिष्ट पाण्यानें त्याला संतोषवितात. आणि त्याला आपल्या हातांवर जणूं उचलून धरितात.'

परंतु 'उपरस्य आयोः' आणि 'पयः हिन्वानाः' ह्या शब्दांचा जो अर्थ सायणांनीं केला आहे त्याला निर्विवाद प्रयोगांतरांची अपेक्षा आहे. अंजसी, कुलि-

**स त्वं न॑ इन्द्र सूर्ये॒ सो अ॒प्स्व॑नागा॒स्त्व आ भ॑ज जीवशं॒से ।**
**मान्त॑रां भु॒जमा रि॑रिषो न॒ः श्रद्धि॑तं ते महत इ॑न्द्रि॒याय॑ ॥ ६ ॥**

सः । त्वम् । न॒ः । इ॒न्द्र॒ । सूर्यै॑ । सः । अ॒प्ऽसु । अ॒ना॒गाः॒ऽत्वे । आ । भ॒ज॒ । जी॒वऽशं॒से ।
मा । अन्त॑राम् । भु॒ज॑म् । आ । रि॒रि॒षः॒ । न॒ः । श्रद्धि॑तम् । ते॒ । म॒ह॒ते । इ॒न्द्रि॒याय॑ ॥ ६ ॥

---

मघेव (=निष्षपी मघानि यथा=स्त्रीकामः कश्चित् स्वधनानि कुपात्रेषु ददाति तद्वत्) नः मा परा दाः (=अस्मान् मा परा देहि=मा कुयवस्य वशमानय) ॥

चर्कृतात् इति प्रशंसेदित्यर्थे क्रियापदं क्रिधातोरिति ग्रास्मनः ॥

---

## भाषायाम्.

६. स त्वं हे इन्द्र (=अतः कारणात् हे इन्द्र, त्वं) नः सूर्ये [आ भज] (=आभाजय=भागिनः कुरु=सूर्यस्य लाभो यथास्माकं भवति तथा कुरु)। स [त्वम्] (=अतः कारणाच्च त्वम्) अप्सु (=उदकेषु=मेघोदकेषु) [अपि च] जीवशंसे (=सर्वैरपि जीवैः शंसनीये स्तुत्ये) अनागास्त्वे (=पापराहित्ये) [नः] आ भज (=आभाजय=भागिनः कुरु=वयं तत् सर्वं यथा लभेमहि तथा कुरु)। अन्तरां भुजम् (=अन्तर्वर्तमानां तनुं=गर्भरूपेण स्थिताम् अस्मत्तनुम्=अस्माकं गर्भं) मा आ रीरिषः (=मा हिंसीः)। ते महते इन्द्रियाय (=तव महते इन्द्रत्वाय=तव महते बलाय) [हि] नः श्रद्धितं [भवति] (=अस्माभिः श्रद्धा कृतास्ति) ॥

'अन्तरां भुजम्' इत्यस्य व्याख्यायां वयं सायणमनुसरामः ॥

---

शी आणि वीरपत्नी ह्या कोणत्या नद्या ह्याविषयीं कांहीं ठाऊक नाहीं. अंजसी आणि कुलिशी हीं तर नांवें दुसऱ्या मंत्रांत कोठें आलेलीं नाहींत; 'वीरपत्नी' हा शब्द दुसऱ्या एका मंत्रांत आला आहे, पण त्याचा अर्थ तेथें सायणांनीं विशेषणीं केला आहे.

वृत्तसुखार्थ पहिल्या पादांत 'उपरस्य आयोः' असें व्यस्त वाचलें पाहिजे आणि तिसऱ्या पादांत 'अञ्जसी' याऐवजीं 'अञ्जसिई' असा पाठ म्हणावा लागतो.

५. या मंत्राचा भावार्थ असा दिसतो कीं, 'हे इंद्रा, कुयवाला मारून टाकण्याविषयीं तुला कठीण नाहीं; कारण कीं त्याचें राहण्याचें स्थळ गूढ आहे असें नाहीं; तर त्याचें राहण्याचें जें स्थळ तिकडे जाण्याचा मार्ग दृष्टिगोचर असून सरळ आणि उघड आहे आणि तो मार्ग बिनचूक त्याच्या स्थानीं नेऊन पोंहचविणारा आहे. तर हे इंद्रा, कुयवा-

६. तर हे इन्द्रा, तूं आम्हांला सूर्याचा, तूं [ आम्हांला ] उदकांचा [ आणि ] जगप्रिय पुण्याचा लाभ होई असें कर. आमचें पोटचें बाळ नष्ट करूं नको. तुझ्या मोठ्या शक्तीवर आम्हीं भरंवसा ठेविला आहे.

6. Do thou then, O Indra, [ make us enjoy ] the sun, do thou [ make us enjoy ] the waters, make [us] enjoy all-loved freedom from sin. Destroy not our embryo in the womb; we have put faith in thy great prowess.

पासून आम्हांला उपद्रव होऊं देऊं नको, आणि इष्की पुरुषाला जशी पैशाची परवा नसते आणि तो आपलें द्रव्य उधळून टाकितो त्याप्रमाणें आमच्या जीवाची तुला परवा नाहीं असें होऊं देऊं नको, आणि आम्हांस कुयवाच्या हातीं पडूं देऊं नको.'

'गाईप्रमाणें त्याच्या घराकडे जातो'= 'अच्छ सदनं जानती न गात्.' म्हणजे वत्साला पाजण्यासाठीं जशी गाय समोर रस्त्यानें आपल्या गोठ्याकडेस जाते तसा. 'गाय' इतकें सायणांस अनुसरून अध्याहृत घेतलें आहे.

'विषयासक्त पुरुष आपलें द्रव्य देऊन टाकितो तसा'='मघा इव निष्षपी.' हा अर्थ यास्कास आणि सायणास अनुसरूनच आहे. आणि तो खरा आहे यांत संशय नाहीं. तर या उपमेवरून इतकें सिद्ध होतें कीं, वैदिक काळींहि (म्हणजे सत्ययुगांत सुद्धा) या कलियुगाप्रमाणेंच रांडबाज लोक असत, आणि ते आपलें द्रव्य वेश्यांस देऊन आतांच्या प्रमाणेंच भिकारी होत असत. सत्ययुगांत अनाचार नसे, पाप नसे, लोक सदाचारी असत हें म्हणणें सांप्रतच्या युगास जितकें लागू आहे तितकेंच कृतयुगाला (आणि अर्थात् त्रेतायुगाला आणि द्वापरयुगालाहि) लागू आहे, अधिक लागू होत नाहीं.

'आम्हांस टाकून देऊं नकोस'= 'मा नः परा दाः.' हे शब्द पुष्कळ ठिकाणीं ऋग्वेदांत येतात, आणि त्यांचा अर्थ आम्हांस टाकून देऊं नको, आमचा त्याग करूं नको, आमचा नाश होऊं देऊं नको असा भाष्यकार करितात तो खरा आहे आणि तोच येथेंहि घेतला पाहिजे. याच सूक्ताचा ८ वा मंत्र पहा.

६. 'याप्रमाणें हे इंद्रा, तुझी आम्हीं स्तुति केली आहे, तर तूं सूर्याचा वृत्रादिकांकडून लोप न होऊं देतां आम्हांस त्याचा सदैव लाभ होई असें कर; अंतरिक्षीं जीं उदकें तीं मेघाचा अवरोध वृत्रादिकांकडून होऊन आम्हांस अंतरतील असें करूं नको, तर तीं आम्हांस सदैव मिळतील असें कर; आणि

अधा मन्ये श्रत्ते अस्मा अधायि वृषा चोदस्व महते धनाय।
मा नो अकृते पुरुहूत योनाविन्द्र क्षुध्यद्भ्यो वय आसुतिं दाः ७

अध । मन्ये । श्रत् । ते । अस्मै । अधायि । वृषा । चोदस्व । महते । धनाय ।

मा । नः । अकृते । पुरुऽहूत । योनौ । इन्द्र । क्षुध्यत्ऽभ्यः । वयः । आऽसुतिम् । दाः ॥ ७ ॥

---

## भाषायाम्.

७. अध (=अपि च) मन्ये(=अहमिदं वक्ष्यमाणं याचे ब्रवीमि वा)। अस्मै ते (=अस्मै तुभ्यम्=अतः कारणात् तुभ्यं=पूर्वासु ऋक्षु स्तुताय तुभ्यं) श्रत् अधायि (=श्रद्धा कृतास्ति)। [एवं सति] वृषा (=सेचनसमर्थो=वीर्योपेतस्त्वं) [नो] महते धनाय (=प्रभूताय द्रव्याय=महद् धनं वयं यथा लभेमहि तथा) चोदय (=प्रेरय)। [अपि च] हे पुरुहूत इन्द्र (=बहुभिराहूत इन्द्र), अकृते योनौ (=धनशून्ये गृहे) मा नो [धाः] (=अस्मान् मा निधेहि=मा स्थापय), [त्वं] क्षुध्यद्भ्यः (=बुभुक्षितेभ्यो) [नः अन्येभ्यो वा] वयः आसुतिम् (=अन्नम् आसवं च) दाः (=देहि)॥

---

ज्याची प्रशंसा सकळ जग करितें असें जें पुण्य तें आम्हांस लाभे असें कर. आमच्या स्त्रियांच्या पोटीं जे गर्भ असतील त्यांचा नाश होऊं देऊं नको. कारण कीं आम्हीं तुझ्या मोठ्या सामर्थ्यावर भरंवसा ठेवून राहिलों आहों.'

पांचव्या मंत्रापर्यंत इंद्राची नुस्ती स्तुति आणि वर्णन केलें. आतां येथून सूक्ताचे शेवटपर्यंत ऋषि वर मागतो आहे.

'जगप्रिय पुण्याचा '=' अनागास्त्वे जीवशंसे.' अक्षरशः अर्थ सर्व जीवांनीं ज्याची प्रशंसा करावी असें जें अपापत्व, म्हणजे पापविरहितपण तें. पुण्याच्या प्रीतीविषयीं आपल्या आर्य पूर्वजांची जी योग्यता तिचें हें एक चांगलें उदाहरण आहे.

'पोटचें वाळ '=' अन्तरां भुजम्.' हा अर्थ आम्हीं सायणांस अनुसरून केला आहे, त्याशिवाय दुसरा अर्थ जरी दुसरे व्याख्यानकर्ते सुचवितात तरी तो आम्हांस आधारबद्ध आणि सयुक्तिक दिसत नाहीं. अक्षरशः अर्थ 'आंतलें शरीर' इतका आहे. ऋ. ३. २. ९ यांतहि सायणांनीं 'भुज्' शब्दाचा अर्थ 'तनु' असा केला आहे.

'शक्तीवर '=' इन्द्रियाय.' सू. ५५,

७. तर आतां [हे इन्द्रा], मी [ तुझी ] प्रार्थना करितों, तुजवर आम्हीं भरंवसा ठेविला आहे. वीर्यसंपन्न जो तूं तो आम्हांस मोठी संपत्ति प्राप्त करून दे. हे पुरुहूता, हे इन्द्रा, तूं आम्हांला दरिद्री घरांत [ घालूं ] नको, तूं भुकेलेल्यांस खावयाला आणि प्यावयाला दे.

7. And I pray : we have therefore put faith in thee; possessed of prowess do thou lead us [ to ] great wealth; do not, O many-invoked Indra, [ place ] us in a wretched home. Give food [ and ] drink to those that are hungry.

मं.४ याजवरील आमची टीप पहा.

वृत्तसुखासाठीं प्रथम पादांत 'सूरिए' असें आणि तिसरे चरणांत 'मा अन्तरां' असें वाचलें पाहिजे.

७. 'तर हे इंद्रा, मी तुझी प्रार्थना करितों कीं, वर लिहिल्याप्रमाणें तुझा महिमा आहे म्हणून तुजवर आम्हीं श्रद्धा ठेविली आहे, यास्तव आम्हांला मोठी संपत्ति दे आणि आम्हांला राहण्याला उत्तम घर दे आणि ज्यांस भूक ताहान लागली असेल त्यांस खावयाला आणि प्यावयाला दे,' असा भावार्थ.

'तर...तुजवर भरंवसा ठेविला आहे'=' अस्मै ते श्रद् अधायि.' म्हणजे पूर्वील ऋचांत सांगितलें आहे त्याप्रमाणें तुझा महिमा आहे म्हणून. 'स त्वं' याचा 'तर तूं' असा अर्थ होतो तसाच 'अस्मै ते' याचा अर्थ 'तर तुला,' 'तर तुजवर' असा होतो. 'अस्मै ते' ही 'स त्वं' याची चतुर्थी आहे.

'प्रार्थना करितों'=' मन्ये.' ऋ. ५. ५०. ५ इत्यादि मंत्रांच्या सायणभाष्यावरून 'प्रार्थणें,' 'याचणें,' 'बोलणें' असे अर्थ मन् धातूचे होतात असें सिद्ध होतें.

**मा नो वधीरिन्द्र मा परा दा मा नः प्रिया भोजनानि प्र मोषीः ।**
**आण्डा मा नो मघवञ्छक्र निर्भेन्मा नः पात्रा भेत्सहजानुषाणि ८**

मा । नः । वधीः । इन्द्र । मा । परा । दाः । मा । नः । प्रिया । भोजनानि । प्र । मोषीः ।
आण्डा । मा । नः । मघऽवन् । शक्र । निः । भेत् । मा । नः । पात्रा । भेत् । सहऽजानुषाणि ॥ ८ ॥

**अर्वाङेहि सोमकामं त्वाहुरयं सुतस्तस्य पिबा मदाय ।**
**उरुव्यचा जठर आ वृषस्व पितेव नः शृणुहि हूयमानः ९॥१९॥**

अर्वाङ् । आ । इहि । सोमऽकामम् । त्वा । आहुः । अयम् । सुतः । तस्य । पिब । मदाय ।
उरुऽव्यचाः । जठरे । आ । वृषस्व । पिताऽइव । नः । शृणुहि । हूयमानः ॥ ९ ॥ १९ ॥

---

## भाषायाम्.

८. हे इन्द्र, मा नो वधीः (=अस्मान्मा हिंसीः) [ नो ] मा परा दाः (=अस्मान् मा परित्याक्षीः) नः प्रिया भोजनानि (=अस्माकं प्रियाणि भोजनानि=अस्माकं सुखकराणि भोग्यवस्तूनि) मा प्र मोषीः (=मा हर) । हे मघवन्, हे शक्र (=सर्वकार्यशक्त) [ इन्द्र ], नः आण्डा मा निर्भेत् (=अस्माकमाण्डानि गर्भरूपाणि मा भेदेन तेषां स्थानान्निर्गमय) मा नः सहजानुषाणि पात्रा भेत् ( =अस्माकं सह जातानि पात्राणि अपत्यानि मा भिन्द्धि ) ॥

९. [ हे इन्द्र ], अर्वाङ् एहि (=त्वमस्मदभिमुखः सन् एहि आयाहि ) । त्वा (=त्वां) सोमकामम् आहुः (=सोमविषयाभिलाषमाहुः) । अयं सुतः (=अयं सोमोभिषुतो भवति) । मदाय तस्य पिब (=हर्षार्थं तं पिब) । उरुव्यचाः (=विस्तीर्णव्यापनः=स्थूलावयवस्त्वं) [तं सोमं] जठरे आ वृषस्व (=जठरे आसिञ्च=तेन जठरमापूरय )। हूयमानः (=अस्माभिराहूयमानस्त्वं ) नः पितेव शृणुहि (=अस्माकं पिता यथास्मान् शृणोति तद्वत् अस्मान् शृणु अस्माकं स्तुतीः शृणु ) ॥

८. हे इन्द्रा, तूं आम्हांस मारूं नको, तूं आम्हांस टाकून देऊं नको, तूं आमचीं प्रिय धनधान्यें हरण करूं नको. हे मघवन्, हे शक्तिमान इंद्रा, तूं आमचीं आंडीं फोडूं नको, तूं आमचीं सहोदर मुलें मारूं नको.

8. Do not slay us, do not O Indra, cast us away, do not rob our dear possessions. Do not, O Maghavan, do not O mighty Indra, break our eggs; do not destroy our brood of common birth.

९. [हे इन्द्रा], तूं आम्हांकडेस ये; तुला सोमकामी असें [जन] म्हणतात. [हा तुजकरितां] सोम सिद्ध केला आहे, तर माद उत्पन्न व्हावा म्हणून तूं हा पी. स्थूलशरीरी तूं [हा सोम आपल्या] पोटांत ओतून घे. तुला आम्ही हाक मारीत आहों, तर तूं ती आमच्या बापाप्रमाणें ऐक.

9. Come hither. They call thee a lover of Soma. Here is Soma extracted [for thee]. Partake of it and be delighted. Possessed of magnitude pour thou it into thy stomach. Called by us, hear us like a father.

८. ह्या मंत्राचा अर्थ स्पष्टच आहे. यांत इंद्रानें बरें होऊं द्यावें, वाईट होऊं देऊं नये याविषयीं प्रार्थना आहे.

'टाकून देऊं नको'='मा परा दाः.' म्हणजे प्रसंग आला असतां आमचा तूं परित्याग करूं नको, आम्हांस तूं साहाय्य कर, आमचा पक्ष धरून आम्हांस रक्ष.

'आमचीं आंडीं फोडूं नको'='आण्डा मा नो निर्भेत्.' म्हणजे आमचे जे गर्भ ते न पडतील, नष्ट न होतील तर योग्य काळीं प्रसवाला येतील असें कर.

'आमचीं सहोदर मुलें'='नः पात्रा सहजानुषाणि.' म्हणजे, एकाच आईपासून उत्पन्न झालेलीं जीं आमचीं मुलें तीं. 'मुलें' हा 'पात्राणि'शब्दाचा अर्थ आम्हीं सायणांस अनुसरून केला आहे, परंतु दुसरे प्रयोग 'पात्र'शब्दाचा अर्थ 'मुल' असा होतो असे मिळत नाहींत. पळ्या वगैरे 'भांडीं' असाहि अर्थ सायण होईल म्हणतात. पण मग 'सहजानुषाणि' हें विशेषण चांगलें लागत नाहीं.

वृत्तसुखार्थ प्रथम पादांत 'इन्द्र' असें आहे त्याऐवजीं 'इन्दर' असें म्हटलें पाहिजे.

## सूक्तम् १०५.

आप्त्यस्त्रित ऋषिः आङ्गिरसः कुत्सो वा । विश्वे देवा देवता । अन्त्या त्रिष्टुप् । सं मां तपन्तीत्यष्टमी यवमध्या महाबृहती । शिष्टं सूक्तं पङ्क्तिच्छन्दस्कम् । आद्यौ द्वावष्टाक्षरौ पादौ द्वादशाक्षरस्तृतीयस्ततो द्वावष्टाक्षरौ सा यवमध्या महाबृहती ।

**चन्द्रमा अप्स्वन्तरा सुपर्णो धावते दिवि ।**
**न वो हिरण्यनेमयः पदं विन्दन्ति विद्युतो वित्तं मे अस्य रोदसी १**

चन्द्रमाः । अप्ऽसु । अन्तः । आ । सुऽपर्णः । धावते । दिवि ।
न । वः । हिरण्यऽनेमयः । पदम् । विन्दन्ति । विऽद्युतः । वित्तम् ।
मे । अस्य । रोदसी इति ॥ १ ॥

---

### भाषायाम्.

१. अप्सु अन्तः आ (=उदकेषु मध्ये=मेघोदकोत्पत्तिस्थानभूतेषु अन्तरिक्षप्रदेशेषु मध्ये) [वर्तमानः] चन्द्रमाः (=आह्लादकः) सुपर्णः (=पक्षी=पक्षिवत्त्वरितं गच्छन् चन्द्रो) दिवि धावते (=द्युलोके त्वरितं गच्छति) । हे हिरण्यनेमयो विद्युतः (=हे सुवर्णसदृशपर्यन्ताः द्योतमानाः आपः=अन्तरिक्षप्रदेशाः), वः पदं (=युष्माकं स्थानं) [जना] न विन्दन्ति (=न जना जानन्ति) । [अतः कारणात्] हे रोदसी (=द्यावापृथिव्यौ), मे(=मम) अस्य (=एतस्योच्यमानस्य) [स्तोत्रस्य] (=एतत् स्तोत्रं) वित्तं (=जानीतम्) ॥

अस्मिन् रात्रिसमये चन्द्रः पक्षिवच्छीघ्रं द्युलोके धावति तस्मात् मम स्तोत्रं श्रोतुं न शक्नोति । अन्तरिक्षमपि क्व वर्तत इति न ज्ञातं केनापि । अतः कारणात् तदपि मम स्तोत्रं न श्रोष्यति । एवं सति स्पष्टं दृश्यमाने हे द्यावापृथिव्यौ युवामेव ममेदं स्तोत्रं शृणुतमिति भावगतम् ॥

---

९. हा या सूक्ताचा उपसंहार आहे. आणि ऋषि म्हणतो, 'हे इंद्रा, तुला शेवटची प्रार्थना आतां अशी आहे कीं, हा सोम काढून आम्हीं तुजसाठीं तयार केला आहे, आणि तुला सोमाची फार आवड आहे असें जन म्हणत असतात. आणि तुझें पोट मोठें आहे, तर तूं ये आणि हा तूं पी आणि पोटांत भरून घे. आम्ही तुला हाक मारीत आहों, तर आमच्या बापाप्रमाणें आमची हाक ऐक आणि आम्हांजवळ ये, आतां अंत पाहूं नको.'

हें कुत्स ऋषीचें एक सूक्त येथें संपलें. याचा विचार जरी विशेष न केला, आणि केवळ वरवर वाचून पाहिलें, तरी त्यांत सत्ययुगांतले ऋषि जसे होते म्हणून पुराणादिक ग्रंथांत सांगितलें आहे तसें कुत्स ऋषीचें स्वरूप नाहीं, तर तो आतांच्या काळच्या साधारण मनुष्यांसारिखाच एक भाविक भक्त आहे, त्याच्या आंगीं कोणतेहि चमत्कार करून दाखविण्याची शक्ति नाहीं, त्याच्या हातीं ऋद्धिसिद्धि नाहींत, तो पाहिजे ते पदार्थ

## सूक्त १०५.

ऋषि—आप्त्य या उपनांवाचा त्रित नामक पुरुष; अथवा कुत्स ऋषि (जो पूर्वसूक्ताचा कर्ता तो). देवता—विश्वे देव म्हणजे सकळ देव. वृत्त—पंक्ति (सू. ८० याच्या आरंभीं दिलेली आमची टीप पहा). मात्र आठवी ऋचा यवमध्या महाबृहती (यवमध्या महाबृहती म्हणजे ज्याचे पहिले दोन चरण अष्टाक्षरी म्ह. अनुष्टुप् वृत्ताचे, तिसरा चरण द्वादशाक्षरी म्ह. जगती छंदाचा आणि त्याच्या मागून आणखी दोन अष्टाक्षरी चरण असें पांच चरणांचें वृत्त), आणि शेवटची ऋचा त्रिष्टुभ्.

१. अंतरिक्षप्रदेशांतील आह्लादकारक पक्षी द्युलोकीं धांवत आहे. हे सुवर्णप्रांतक लखलखीत अंतरिक्षप्रदेश हो, तुमचें स्थान कोणी जाणत नाहीं. तर हे द्यावापृथिवी हो, तुम्ही हें माझें [स्तोत्र] ऐका.

## Hymn 105.

By *Trita Âptya* (i.e. *Trita* the son of the waters) or *Kutsa* (author of the previous hymn). *To Vis've Devâs, All the Gods.* Metre—*Pankti* (see Hymn 80 and note) except the eighth which is *Yavamadhyâ Mahâbrihatî*, and the last which is *Trishtubh*.

The *Yavamadhyâ Mahâbrihatî* consists of five pâdas, the first, second, fourth and fifth of which are of eight syllables each and the third of twelve syllables.

1. The delightful bird of the heavenly waters fleets through heaven. Of you, ye golden-edged waters (regions of the sky), they do not find the exact site. Know then, ye Earth and Heaven, this my [prayer].

---

केवळ इच्छामात्रेंकरून उत्पन्न करण्यास समर्थ नाहीं, आणि त्याला शापानें सर्व जग भस्म करून टाकण्याचें सामर्थ्य नाहीं. हें त्याचें खरें स्वरूप आहे.

वृत्तसुखासाठीं 'त्वाहुः' असें आहे त्याऐवजीं 'तुआहुः' असें म्हणावें लागतें.

१. हें १०५ वें सूक्त जसें चमत्कारिक आहे तसेंच तें कांहींसें कठिण आहे. त्याचा कर्ता 'आप्त्य' या उपनांवाचा 'त्रित' म्हणून कोणी ऋषि तो होय; अथवा पूर्वसूक्ताचा कर्ता जो कुत्स तोच याहि सूक्ताचा ऋषि असावा असें सर्वानुक्रमणिकेंत वगैरे सांगितलें आहे. कांहीं संकट आलें होतें आणि तें निवारण व्हावें अशी सूक्तकर्त्याची प्रार्थना करण्याची इच्छा आहे आणि त्याप्रमाणें त्याणें प्रार्थना केली असतांहि संकट दूर होत नाहीं, त्यावरून देव आपली प्रार्थना कां ऐकत नाहींत अथवा आपण कोणत्या देवाला हाक मारावी अशा विवंचनेंत ऋषि असून त्याणें हें सूक्त रचिलें असें सूक्तावरून दिसतें. आणि तें संकट रात्रीच्या वेळीं आलें असावें असें वाटतें.

सायणाचार्य असें म्हणतात कीं खालीं लिहिलेली कथा शाट्यायन ब्राह्मणांत सांगितली आहे.— "या सूक्ताविषयीं "असा इतिहास आहे कीं एकत, द्वित "आणि त्रित या नांवांचे तीन ऋषि "होते. ते एके समयीं मारवाड देशांत "रानांत होते आणि तहानेनें व्याकूळ "झाले. त्यास शोधतां शोधतां एक कूप "सांपडला. मग त्रित हा पाणी पिण्या- "करितां त्या कूपांत उतरला, आणि "त्याणें स्वतः पाणी पिऊन कूपांतून "पाणी वर आणून दुसऱ्या दोघांस "दिलें. त्यांणीं तें पाणी पिऊन त्रितास "कुव्यांत लोटून देऊन त्याचें सर्व द्रव्य "घेऊन कुव्याच्या तोंडावर गाडीचें चाक "झांकून निघून गेले. मग कूपांत पड- "लेल्या त्रितास बाहेर येतां येईना "यास्तव सकळ देव मला वर काढोत "असें त्याणें मनांत स्मरण केलें. नंतर "हें सूक्त त्याणें रचिलें" असें सायणाचार्य शाट्यायन ब्राह्मणांतून उतरून घेतात, आणि म्हणतात कीं, कूपांतून त्रित हा शोक करीत करीत ही ऋचा म्हणूं लागला. एकत, द्वित आणि त्रित हीं वस्तुतः संख्याविशेषणें असून, यांचा अर्थ 'पहिला,' 'दुसरा' आणि 'तिसरा' असा आहे. 'त्रित' ऋषि कूपांत पडला होता आणि त्याला वर चढावयास येईना तेव्हां त्याणें हें सूक्त रचिलें अशी जी कथा ती या सूक्ताच्या १७ व्या मंत्रांत त्रिताला कूपांत घातलें, तो आपलें संरक्षण व्हावें म्हणून देवांचा धांवा करितो, तो धांवा ऐकून 'बृहस्पति' नांवाचा देव त्याला साहाय्य करितो असें जें सांगितलें आहे, त्यावरून रचिली गेली असें असेल. 'त्रित' हें विशेषनाम असेल असें १७ व्या मंत्रावरून दिसतें खरें. आणि त्रित हें विशेषनाम असण्यांत नवल दिसत नाहीं (द्वित आणि एकत हीं नांवें, त्रित शब्दाच्या अक्षरशः व्युत्पत्तीवरून मागाहून कल्पिलीं असतील); पण तो विहिरींत पडला होता आणि त्याला एकत आणि द्वित या ऋषींनीं त्याचें द्रव्य हरण क-

रून दुष्टपणानें तेथें टकलला इत्यादि कथा मागाहून अर्थ लावण्याकरितां कल्पिली हें उघडच आहे. इतकें खरें कीं कांहीं संकटाच्या निवारणार्थ हें सूक्त रचिलें, पण तें संकट कोणतें आणि कोणावर आलें होतें यावियीं पूर्वी जरी कांहीं कथा असेल आणि सूक्त रचिलें त्यानंतर कांहीं वर्षेपर्यंत सर्व लोकाला सहज समजण्यासारिखी असेल, तरी तिचा मागाहून अगदी लोप झाला. आतां तिजविषयीं कांहीं ठाऊक नाहीं असें दिसतें.

या पहिल्या मंत्रांत ऋषि म्हणतो,—'पक्ष्याप्रमाणें अवकाशांतून धांवत असतो असा जो आह्लादकारक चंद्रमा तो द्युलोकीं त्वरेनें धांवत आहे यावरून द्युलोक कोणता तें स्पष्ट समजतच आहे. परंतु अंतरिक्षाच्या सीमा कोणत्या तें स्पष्ट समजत नाहीं, त्याच्या बाजूला विद्युद्रूप सोन्याच्या झालरी लाविल्याप्रमाणें मात्र दिसतें. पृथिवी आणि द्युलोक कोणते हें मात्र स्पष्ट समजतें, यास्तव हे द्यावापृथिवी हो, तुम्ही दोघी मिळून माझी ही प्रार्थना ऐकून घ्या.'

'अंतरिक्षप्रदेशांतील आह्लादकारक पक्षी'=' अप्सु अन्तः आ चन्द्रमाः सुपर्णः.' अक्षरशः अर्थ 'पाण्यांमधील आह्लादकारक पक्षी.' पाणी म्हणजे मेघोदकें जेथें निर्माण होतात आणि नित्य वाष्परूपानें राहतात ते प्रदेश=अंतरिक्ष. चंद्रास पक्षी म्हणतात याविषयीं सू. ३५, मं. ७ याजवरील टीप पहा.

'तुम्ही हें माझें [स्तोत्र] ऐका'=' वित्तं मे अस्य '=' वित्तं मम [स्तोत्रस्य].' विद् धातूच्या संबंधानें कर्मणि षष्ठी येत असते याचीं उदाहरणें वेदांत पुष्कळ मिळतील. आणि 'स्तोत्र' शब्द प्रस्तुत वाक्याप्रमाणेंच अध्याहृत घ्यावा लागतो असेहि दुसरे मंत्र आहेत. ऋ.३. ३९. १ ('शस्यमानेन्द्र यत्ते जायते विद्धि तस्य'), २. ३५. २ ( मन्त्रं वोचेम कुविद् अस्य वेदत् ) हे मंत्र पहा.

'तर हे द्यावापृथिवी हो, तुम्ही हें माझें [ स्तोत्र ] ऐका'=' वित्तं मे अस्य रोदसी.' हा शेवटचा पाद पालवपद होय आणि प्रत्येक मंत्राच्या शेवटीं येत जाईल.

हा मंत्र पंक्तिवृत्ताचा (म्हणजे पंचचरणी अनुष्टुप्वृत्ताचा ) आहे, तो अगदी आधुनिक वृत्ताप्रमाणें म्हणतां येतो, मात्र पहिला चरण 'चन्द्रमा अप्सु अन्तरा' असा म्हटला पाहिजे.

अर्थमिद्वा उ अर्थिन आ जाया युवते पतिम् ।
तुञ्जाते वृष्ण्यं पयः परिदाय रसं दुहे वित्तं मे अस्य रोदसी ॥२॥
अर्थम् । इत् । वै । ऊम् इति । अर्थिनः । आ । जाया । युवते ।
पतिम् ।
तुञ्जाते इति । वृष्ण्यम् । पयः । परिऽदाय । रसम् । दुहे । वित्तम् ।
मे । अस्य । रोदसी इति ॥ २ ॥
मो षु देवा अदः स्वऽरव पादि दिवस्परि ।
मा सोम्यस्य शंभुवः शूने भूम कदा चन वित्तं मे अस्य रोदसी ३
मो इति । सु । देवाः । अदः । स्वः । अव । पादि । दिवः । परि ।
मा । सोम्यस्य । शम्ऽभुवः । शूने । भूम । कदा । चन । वित्तम् ।
मे । अस्य । रोदसी इति ॥ ३ ॥

---

## भाषायाम्.

२. एषा सायणेनैवं व्याख्याता । अर्थिनो धनमपेक्षमाणाः पुरुषा अर्थमिद्वै अपेक्षितं धनं प्राप्नुवन्त्येव । नाहं प्राप्नोमि । उ इत्येतत् पादपूरणम् । अपि च जायान्यदीया भार्या पतिं स्वपतिमायुवते । आभिमुख्येन प्राप्नोति । मदीया तु मद्विरहाद्धतासीत् । अपि च संयुक्तौ तौ जायापती वृष्ण्यं वीर्यरूपं पय उदकं तुञ्जाते । प्रजननायान्योन्यसंवट्टनेन प्रेरयतः । तदनन्तरं रसं पुरुषस्य सारभूतं वीर्यं परिदाय गर्भाशयेनादाय गर्भरूपेण धृत्वा दुहे । दुग्धे । पुत्ररूपेण जनयति मम तु पुत्रोपि नोत्पद्यते । अत इदं मदीयं दुःखं हे द्यावापृथिव्यौ जानीतम् इति ॥

३. हे देवाः, अदः स्वः (=एष सूर्यो) दिवस्परि (=परि दिवः=द्युलोकसकाशात् ) मो सु अव पादि (=मैव पततु=मैव प्रभ्रष्टो भवतु)। [वयं] सोम्यस्य (=सोमार्हस्य=पूज्यस्य ) शंभुवः (=सुखस्य कारयितुः) [ सूर्यस्य ] शूने (=अपगमने=विरहितत्वे ) कदा चन ( =कदापि ) मा भूम ( =मैव भवेम ) । हे रोदसी ( =द्यावापृथिव्यौ ), मे (=मम ) अस्य (=एतस्योच्चार्यमाणस्य ) [ स्तोत्रस्य=स्तोत्रं ] वित्तं (=जानीतम् ) ॥

२. अर्थी जनास अर्थाची प्राप्ति होत आहे. स्त्रीला पतीची प्राप्ति होत आहे. तो पौरुष रेताचा उत्सर्ग करितो. तें घेऊन ती आपल्या आंगापासून रस देते. तर हे द्यावापृथिवी हो, तुम्ही हें माझें [ स्तोत्र ] ऐका.

2. Those who desire any object attain [their] object. The wife unites with her husband. He impregnates her with his manly seed, receiving which she yields the sap. Know then, ye Earth and Heaven, this my [ prayer ].

३. हे देव हो, हा सूर्य द्युलोकापासून खालीं न पडो. कल्याणकारक आणि पूज्य [ सूर्या]-विरहित आम्ही राहूं असें कधींहि न होओ. तर हे द्यावापृथिवी हो, तुम्ही हें माझें [ स्तोत्र ] ऐका.

3. Never, O Gods, may this resplendent Sun fall down from heaven. Never may we be without the adorable and blissful [God the Sun ]. Know then, ye Earth and Heaven, this my [ prayer ].

---

२. ह्या मंत्राचा सारांश असा दिसतो कीं, 'ह्या प्रसंगीं जे ते आपआपल्या इच्छेप्रमाणें वागत आहेत आणि इष्ट फळ मिळवीत आहेत, पण माझी अवस्था तशी नाहीं. माझी आणि माझ्या स्त्रीची गांठ पडत नाहीं आणि वांछिलेलें मला मिळत नाहीं. तर हे द्यावापृथिवी हो, तुम्ही हें माझें स्तोत्र ऐका.'

'तें घेऊन ती आपल्या आंगापासून रस देते '=' परिदाय रसं दुहे.' सायणाचार्य म्हणतात कीं पुरुषरेत घेऊन तें गर्भरूपानें आपल्या आंगीं स्त्री ठेविते आणि शेवटीं अपत्यरूपानें पुरुषाला परत देते. कदाचित् 'मनकामना (पुरुषाची) पूर्ण करिते' इतकाच अर्थ असेल. मात्र 'रस'शब्दाचा 'कामना' हा अर्थ आलीकडचा आहे, तो वेदकाळीं होता असें समजावें लागतें. तथापि 'गोड पदार्थ' असा मूळ अर्थ असून त्याचा 'गोडी' (अथवा कामना) हा अर्थ प्राचीन कां असूं नये?

वृत्तानुरोधेंकरून 'वृष्णिअं पयः' असा तृतीय पादांत उच्चार केला पाहिजे.

३. 'हे देव हो, आकाशामधील देदीप्यमान सूर्य पतन होऊन खालीं न पडो आणि आम्ही या सूर्याविरहित आहों असें कधींहि न घडो. आणि हे द्यावापृथीवी हो, तुम्ही ही माझी विनंती ऐका.'

'सूर्य '=' स्वः.' सायणाचार्यांनीं 'स्वः' शब्दाचा अर्थ निराळा केला आहे.

या मंत्रांत सूर्य द्युलोकांतून तुटून

यज्ञं पृच्छाम्यवमं स तद्दूतो वि वोचति ।
क्व ऋतं पूर्व्यं गतं कस्तद्बिभर्ति नूतनो वित्तं मे अस्य रोदसी ॥४॥

यज्ञम् । पृच्छामि । अवमम् । सः । तत् । दूतः । वि । वोचति ।
क्व । ऋतम् । पूर्व्यम् । गतम् । कः । तत् । बिभर्ति । नूतनः । वित्तम् ।
मे । अस्य । रोदसी इति ॥ ४ ॥

---

## भाषायाम्.

४. यज्ञं (=यज्ञियं=पूजनीयम्) अवमं (=सर्वेषां देवानां मध्ये समीपतमम्) [अग्निम् अहं यत्] पृच्छामि तत् स [देवानां] दूतो वि वोचति (=विविच्य कथयतु)। पूर्व्यम् ऋतं (=पूर्वकालीनं सत्यम्=उपासकानां श्रेयो भविष्यत्येवेति यत्सत्यं तत्) क्व गतम्? को नूतनः (=को नवीनो देवः) तद् [ऋतम् अधुना] बिभर्ति (=धारयति)? [न ज्ञायते। अतः कारणात्] हे रोदसी (=द्यावापृथिव्यौ), मे (=मम) अस्य (=स्तोत्रस्य=इदं स्तोत्रं] वित्तं (=जानीतम्)॥

ये ये देवानामुपासनां कुर्युस्तेषामसंशयं श्रेयो भविष्यतीति यत्सत्यं तदधुना क्व गतं न जाने मम हि दुःखं न निवार्यते। अतः कारणात् हे द्यावापृथिव्यौ, युवामेव ममेदं विज्ञापनं शृणुतमिति भावः॥

यज्ञियशब्दस्थाने यज्ञशब्दोऽत्रापि प्रयुज्यते। यज्ञं यजनीयमिति सम्यक् सायणपादाः॥

---

खालीं न पडो आणि तो आम्हांला केव्हांहि नाहींसारिखा न होओ अशी जी प्रार्थना आहे तिचें प्रयोजन काय असेल तें, या सूक्ताची कथा काय आहे आणि कोणत्या प्रसंगाला अनुलक्षून हें रचिलें आहे तें पूर्णपणें समजल्याशिवाय, ध्यानांत येण्यासारिखें नाहीं.

वृत्तानुरोधेंकरून दुसऱ्या पादांत 'स्वः'शब्दाच्या ऐवजीं 'सुअः' आणि तिसऱ्या पादांत 'सोम्यस्य' याच्या ऐवजीं 'सोमिअस्य' असें वाचावें लागतें.

४. अतिसंनिध असलेला जो यजनीय [ अग्नि ] त्याला मी पुसतों; तो [देवांचा] दूत तें [मला] सांगो: सनातन सत्य कोठें गेलें? तें कोणत्या नूतन [देवा]जवळ आहे? [तर] हे द्यावापृथिवी हो, तुम्ही हें माझें [स्तोत्र] ऐका.

4. I ask adorable [Agni] the nethermost [of the gods]; may that divine messenger make clear [unto me]: where is the ancient Truth gone? What new [god] holds it? Know then, ye Earth and Heaven, this my [prayer].

---

४. ऋषीचें हृद्य असें दिसतें कीं, 'मी देवांचा उपासक आहें आणि यथामति आणि यथाशक्ति देवांची उपासना करीत असतों. आणि देवांचे जे उपासक असतील त्यांजवर देवांची कृपा होते आणि त्यांजला जें कांहीं जडभारी होईल त्याचा परिहार देव करितात हें सत्य पुरातन काळापासून प्रसिद्ध आहे. असें असून माझें हें सांप्रतचें संकट तर दूर होत नाहीं. तर आतां सांगितलेलें सत्य सांप्रत काळीं कोठें गेलें बरें? उपासकांला साहाय्य करण्याची शक्ति इंद्रादिक देवांच्या हातून जाऊन नूतनच एकाद्या देवाच्या आंगीं आली आहे काय? तर तें कसेंहि असो, हे द्यावापृथिवी हो, तुम्ही माझी ही प्रार्थना ऐका.'

'यजनीय'='यज्ञम्.'हा अर्थ आम्हीं सायणांस अनुसरून केला आहे आणि आम्हांस वाटतें, तो शुद्ध आहे. 'यज्ञिय' अशा रूपाच्या ऐवजीं वृत्तानुरोधानें 'यज्ञ' रूपाचा प्रयोग वेदांत होणें यांत कांहीं नवल नाहीं. 'यज्ञिय'शब्द वेदांत असून तो अग्नीला 'यजनीय' शब्दाऐवजीं विशेषणार्थी अनेक मंत्रांत लाविलेला आहे.

वृत्तानुरोधेंकरून प्रथम पादांत 'पृच्छामि अवमं' असें आणि तृतीय पादांत 'पूर्विअं' असें म्हणावें लागतें.

**अमी ये देवाः स्थन त्रिष्वा रोचने दिवः ।**
**कद्व ऋतं कदनृतं क्व प्रत्ना व आहुतिर्वित्तं मे अस्य रोदसी ॥**
**॥ ५ ॥ २० ॥**

अमी इति । ये । देवाः । स्थन । त्रिषु । आ । रोचने । दिवः ।
कत् । वः । ऋतम् । कत् । अनृतम् । क्व । प्रत्ना । वः । आऽहुतिः ।
वित्तम् । मे । अस्य । रोदसी इति ॥ ५ ॥ २० ॥

**कद्व ऋतस्य धर्णसि कद्वरुणस्य चक्षणम् ।**
**कदर्यम्णो महस्पथाति क्रामेम दूढ्यो वित्तं मे अस्य रोदसी ॥६॥**

कत् । वः । ऋतस्य । धर्णसि । कत् । वरुणस्य । चक्षणम् ।
कत् । अर्यम्णः । महः । पथा । अति । क्रामेम । दुःऽध्यः । वित्तम् ।
मे । अस्य । रोदसी इति ॥ ६ ॥

---

## भाषायाम्.

५. हे देवाः, दिवः (=द्युलोकस्य) त्रिषु रोचने आ (=त्रिषु रोचनेषु आ=त्रिषु लोकेषु) ये अमी [यूयं] स्थन (=स्थ=भवथ) [तान् वः पृच्छामि]। कद् वः ऋतं (=युष्माकं सत्यं=स्तोतृजनस्य कल्याणं कार्यमिति यो युष्माकं नियमः स क्व गतः)? कत् अनृतं (=अस्तोतृजनानां घातः कर्तव्य इति यो युष्माकं नियमः स क्व गतः)? वः प्रत्ना आहुतिः (=युष्माकं पुरातना आहुतिः=युष्मभ्यं मया पूर्वं यद्धविर्दत्तं तत्) क्व [गतम्]? । [न ज्ञायते । अतः कारणात्] हे रोदसी (=द्यावापृथिव्यौ), मे (=मम) अस्य [स्तोत्रस्य=इदं स्तोत्रं] [युवां] वित्तं (=जानीतम्) ॥

६. [हे देवाः,] वः (=युष्माकं=युष्माभिः सदैव क्रियमाणम्) ऋतस्य धर्णसि (=सत्यस्य धारणं=सत्यमाचरतां पालनं) कत् (=क्व गतम्)? वरुणस्य चक्षणम् (=असत्यमाचरतां हननं सत्यमाचरतां साहाय्यं वरुणेन देवेन नित्यमेव क्रियते तत्) कत् (=क्व) [गतम्]? महः (=महतः) अर्यम्णः (=एतन्नाम्नो देवस्य) पथा (=तेन दर्शितेन समीचीनेन मर्गेण) [वयं] दूढ्यः (="दुर्धियः पापबुद्धीन् अस्मदनिष्टपरान् शत्रून्") कत् अति क्रामेम (=क्व पूर्ववत् अतिक्रम्य गच्छेम)? [न ज्ञायते । अतः कारणात्] हे रोदसी (=द्यावापृथिव्यौ), [युवां] मे (=मम) अस्य [स्तोत्रस्य=इदं स्तोत्रं] वित्तं (=जानीतम्) ॥

५. हे देव हो, तुम्ही हे जे तीन दिव्यलोकीं आहांत [ त्या तुम्हांला मी पुसतों ]: तुमचें सत्य कोठें ? असत्य कोठें ? तुम्हांला [मी ] पूर्वी दिलेली आहुति कोठें [गेली]? [तर] हे द्यावापृथिवी हो, तुम्ही हें माझें [स्तोत्र] ऐका.

६. तुमचें सत्याचें पाठबळ कोठें [ गेलें ]? वरुणाची दृष्टि कोठें [गेली] ? महान् अर्यमाच्या मार्गानें दुष्ट लोकांच्या हातून आम्ही कोठें पार पडूं ? [ तर ] हे द्यावापृथिवी हो, तुम्ही हें माझें [ स्तोत्र ] ऐका.

5. Ye gods, as many as you are in the three regions of Heaven, where [is] your Truth, where [is] Untruth ? Where the offering I formerly made unto you ? Know then, ye Earth and Heaven, this my [prayer].

6. Where [ is ] your support of Truth ? Where [ is ] the eye of Varuṇa ? Where shall we escape the wicked by the path of great Aryaman ? Know then, ye Earth and Heaven, this my [ prayer ].

---

५. पृथिवीवर राहणारा ( अवम ) जो अग्नि देव त्याला वरील मंत्रांत प्रश्न केला; आतां या मंत्रांत खालीं ( म्हणजे पृथिवीवर) न राहणारे, तर दिव्य लोकीं उच्च प्रदेशीं राहणारे जे इंद्रादिक देव त्यांस कवि पुसतो, ' हे द्युलोकीं राहणारे सकळ देव हो, सत्याचा प्रतिपाळ करावा, असत्याचें पारिपत्य करावें, हा जो तुमचा पुरातन नियम तो कोठें गेला ? मी सत्यानें वागून प्राचीन काळापासून तुमची उपासना करीत आलों ती कोठें गेली ? हें कांहींच समजत नाहीं. तर हे द्यावापृथिवी हो, तुम्ही तरी ही माझी प्रार्थना ऐकून घ्या.'

' तीन दिव्य लोकीं '=' त्रिषु आ रोचने दिवः.' ' रोचने ' हें येथें ' रोचनेषु ' याऐवजीं आहे. ' रोचन ' म्हणजे प्रकाशयुक्त प्रदेश. ' दिवो रोचनम् ' म्हणजे द्युलोकांतील प्रकाशयुक्त प्रदेश, अथवा दिव्यलोक. हे प्रदेश अथवा द्युलोकाचे भाग तीन आहेत असें वर १०२ व्या सूक्ताच्या ८ व्या मंत्रांत आलें आहे. तो मंत्र आणि त्याजवरील आमची टीप पहा. द्युलोकांतील जे देव ते भूलोकीं अथवा अंतरिक्षीं राहणाऱ्या देवांहून वेगळे आहेत याविषयीं ऋ. ३. ६. ८ हा मंत्र पहा. ऋ. ८. ६९. ३ यांत सांप्रतच्या मंत्राप्रमाणेंच ' रोचने ' हें एकवचन अनेकवचनी संख्यावाचकाला जोडिलें आहे ( जन्मन् देवानां विशः

**अहं सो अस्मि यः पुरा सुते वदामि कानि चित् ।**
**तं मा व्यन्त्याध्यो३ वृको न तृष्णजं मृगं वित्तं मे अस्य रोदसी॥७॥**

अहम् । सः । अस्मि । यः । पुरा । सुते । वदामि । कानि । चित् ।
तम् । मा । व्यन्ति । आऽध्यः । वृकः । न । तृष्णऽजम् । मृगम् ।
वित्तम् । मे । अस्य । रोदसी इति ॥ ७ ॥

## भाषायाम्.

७. अहं सोस्मि (=स एवास्मि) यः पुरा (=पूर्वकाले) सुते (=सोमेभिषुते सति) कानि चित् वदामि (=कतिपयानि स्तोत्राणि प्रावदम्) । तं मा । (=तं मां=तमेव माम्=एवं सत्यपि मां), वृको न तृष्णजं मृगम् (=अरण्यश्वा पिपासन्तं मृगं यथा भक्षयति तथा), आध्यः (=आधयः=व्याधयो) व्यन्ति (=भक्षयन्ति) । [अतः कारणात्] हे रोदसी (=हे द्यावापृथिव्यौ), [युवां] मे (=मम) अस्य (=उच्चार्यमाणस्यैतस्य स्तोत्रस्य=इदं स्तोत्रं) वित्तं (=जानीतम्) ॥

त्रिषु आ रोचने दिवः).

या मंत्रांत वृत्तानुरोधेंकरून प्रथम पादांत 'देवाः' असें आहे तेथें 'देव-आः' असें म्हटलें पाहिजे, आणि दुसऱ्या चरणांत 'त्रिषु आ' असें आणि चवथ्यांत 'कुअ प्रत्ना व आहुतिः' असें म्हटलें पाहिजे.

६. 'हे देव हो, सत्याचें प्रतिपालन करावें असें जें तुमचें ब्रीद तें कोठें गेलें? खऱ्याचें कल्याण करावें, खोट्याचें पारिपत्य करावें—म्हणजे पुण्यवंताचें बरें करावें आणि पापी लोकांचा नाश करावा—असें जें वरुणाचें ब्रीद तें कोठें गेलें? दुष्ट लोकांनीं आम्हांस फांसी पाडावयाचें योजिलें तर त्यांतून पार पाडण्याकरितां मोठा जो अर्यमा देव तो चांगला मार्ग दाखवितो तो अर्यमा देव आतां कोठें गेला? तर हे द्यावापृथिवी हो, तुम्हीच आतां हें माझें स्तोत्र ऐका.'

'तुमचें सत्याचें पाठबळ'=' वः ऋतस्य धर्णसि' म्हणजे तुम्हीं जें सत्याचें साहाय्य करीत असतां तें.

'वरुणाची दृष्टि.' वरुण हा सर्व पातकें पाहतो आणि कितीहि चोरून पाप केलें तथापि तें त्याच्या दृष्टीस पडतें असें वेदांत सांगितलें आहे. ऋ. ७.८६ हें सूक्त पहा. शिवाय, 'विश्वं स वेद वरुणो यथा धिया' (ऋ. १०.११.१) 'तो जसा काय आपल्या बुद्धीनें सर्व जाणतो' असें म्हटलें आहे. तैत्तिरीय ब्राह्मणांत "अनृते क्रियमाणे वरुणो गृह्णाति"=' खोटें केल्यास वरुण पकडतो' (१.७.२.६) असें म्हटलें आहे.

'अर्यमा.' अर्यमा म्हणजे सूर्यदेवताच

७. तोच हा मी आहें कीं जो पूर्वीं सोमरस काढून कितीएक स्तोत्रें गात होतों; त्या मलाच, तृषातुर मृगाला लांडगा [ खातो ] त्याप्रमाणें, व्यथा खाऊन टाकीत आहेत. [तर] हे द्यावापृथिवी हो, तुम्ही माझें हें [स्तोत्र] ऐका.

7. I am the same [person] who formerly would sing a few hymns after the Soma was pressed. And yet sorrows are eating me as a wolf [eats] a thirsty deer. Know then, ye Earth and Heaven, this my [prayer].

---

समजावयाची, म्हणजे सूर्याचें एक रूपांतर होय. सू. २६, मं. ४ याजवरील टीप पहा. चांगला मार्ग दाखविणें हें काम अर्यमा देव करीत असतो असें सांगितलें आहे.

वृत्तानुरोधेंकरून चवथ्या पादांत 'दूढिओ' असें वाचलें पाहिजे.

---

७. 'हे देव हो, पूर्वीं सोमरस काढून कितीएक सूक्तें रचून एकामागून एक जो गात होतों तोच मी तुमचा भक्त आहें, दुसरा कोणी नव्हे. असें असतां ज्याप्रमाणें एकादा हरिण तृषाक्रांत होऊन पाणी पिण्यास जावा आणि त्याला वाटेंत लांडग्यानें खावें त्याप्रमाणें ह्या व्याधि मला खात आहेत. तर हे द्यावापृथिवी हो, तुम्ही हें माझें स्तोत्र ऐका.'

या मंत्रावरून हें सूक्त कांहीं संकटाच्या प्रसंगास अनुलक्षून रचिलें आहे, आणि पुरातन काळापासून आपण देवांची उपासना करीत आलों आहों असें असतां देव मला या प्रसंगीं पावत नाहींत, असा ऋषीचा अभिप्राय आहे असें स्पष्ट दिसतें. ह्यावरूनच हें सूक्त करणारा ऋषि ( मग तो कुत्स असो अथवा त्रित असो ) कूपांत पडला होता आणि त्याला वर यावयाला येईना तेव्हां त्याणें हें सूक्त केलें अशी कथा प्रवृत्त झाली.

वृत्तानुरोधेंकरून तिसरा चरण 'तं मा विअन्ति आधयः' असा वाचला पाहिजे.

**सं मा तपन्त्यभितः सपत्नीरिव पर्शवः ।**
**मूषो न शिश्ना व्यदन्ति माध्यः स्तोतारं ते शतक्रतो वित्तं मे अ-**
**स्य रोदसी ॥ ८ ॥**

सम् । मा । तपन्ति । अभितः । सपत्नीःऽइव । पर्शवः ।
मूषः । न । शिश्ना । वि । अदन्ति । मा । आऽध्यः । स्तोतारम् । ते ।
शतक्रतो इति शतऽक्रतो । वित्तम् । मे । अस्य । रोदसी इति ।
॥ ८ ॥

---

## भाषायाम्.

८. पर्शवः (=पार्श्वस्थीनि) मा (=मां) सपत्नीरिव अभितः सं तपन्ति (=सपत्न्य एकस्यैव पत्युर्बह्व्यो जायास्तं पुरुषं यथा पीडयन्ति तथा माम् अभितः पीडयन्ति)। हे शतक्रतो (=शतप्रज्ञेन्द्र), ते स्तोतारं मा (=तव स्वभूतं स्तोतारं मां), मूषो न शिश्ना (=मूषो न शिश्नानि=मूषका यथा अन्नरसालिप्तानि कुविन्दस्य सूत्राणि विविधं भक्षयन्ति तथा), आध्यो व्यदन्ति (=आधयो विविधं भक्षयन्ति=भक्षणार्थं मां विच्छिद्य मम बहून् खण्डानिव कुर्वन्ति)। [अतः कारणात्] हे रोदसी (=द्यावापृथिव्यौ), मे (=मम) अस्य [स्तोत्रस्य=इदमुच्चार्यमाणं स्तोत्रं] वित्तं (=जानीतम्) ॥

मूषो नेत्यत्र। मूषो न। यथा मूषिकाः शिश्ना शिश्नानि कुविन्देन वापितान्यन्नरसेनालिप्तानि सूत्राणि भक्षयन्ति इति सायणः ॥

८. मला सवतींसारिख्या चारी बाजूंनीं माझ्या बरगड्या पीडा करीत आहेत. हे शतप्रज्ञ [इंद्रा], मी तुझा स्तोता असतांहि, उंदीर खळीनें भिजलेले दोरे तोडून खातात तसे, हे व्याधि मला तोडून खात आहेत. [तर] हे द्यावापृथिवी हो, तुम्ही माझें हें [स्तोत्र] ऐका.

8. My ribs are distressing me on all sides like rival wives. Sorrows are, O Indra of one hundred wisdoms, consuming me, though thine own worshipper, like as mice gnaw away the weaver's threads steeped in rice-water. Know then, ye Earth and Heaven, this my [prayer].

८. 'हे इंद्रा, जशा सवतो आपल्या नवऱ्याला चोहोंकडून जाचून दुःख देतात, तशा माझ्या ह्या बरगड्या मला सर्व बाजूंनीं दुखवीत आहेत. आणि कोष्ट्याच्या ताण्यावर ताणलेलें आणि खळ लावून ओलें केलेलें सूत जसें उंदीर कुरतुडून खाऊन त्याचे तुकडे तुकडे करितात, तशीं हीं माझीं दुःखें मला जणुं खाऊन माझे तुकडे तुकडे करीत आहेत; मी तुझा भक्त आहें म्हणून मला कांहीं सोडून देत नाहींत. तर हे द्यावापृथिवी हो, तुम्ही तरी ही माझी प्रार्थना ऐकून घ्या.'

'सवतींसारिख्या' = 'सपत्नीरिव.' या मंत्रावरून कितीएक विद्वान् वैदिकयुगांत म्हणजे कृतयुगांत आणि त्रेतायुगांत वगैरे आपले आर्य पूर्वजांतून कितीएक लोक एकापेक्षां अधिक बायका करीत आणि त्या सापत्नभावानें एकमेकांशीं भांडत आणि आताच्या प्रमाणेंच पतीला जाचून त्रास देत असत असें जें अनुमान काढितात तें खरें आहे असें वाटतें.

'खळीनें भिजविलेले दोरे' = 'मूषः शिश्नेव.' म्हणजे कपडा विणण्याचे पूर्वीं ताण्यावर पांजणीगारांनीं ताणून त्याजवर खळ लाविलेली असते असें जें सूत म्हणजे जे दोरे ते. या मंत्राचा हा अर्थ प्राचीन काळीं यास्कांनीं केला आहे आणि तोच सायणांनींहि आपल्या भाष्यांत दिला आहे. सांप्रतकाळीं ताण्यावर सूत ताणून त्याजवर तांदळाची खळ लावितात आणि हे दोरे उंदराच्या सपाट्यांत सांपडले म्हणजे ते जसे खाऊन टाकितात, तसेच वेदकाळींहि उंदीर खाऊन टाकीत असत, आणि आलीकडे कापड विणण्यांत आणि वेदकाळीं विणीत त्यांत भेद कांहीं दिसत नाहीं, एकच पद्धत दिसते. 'शिश्न' शब्दाचा अर्थ आम्हीं एथें केल्याप्रमाणें होतो याविषयीं ऋ. १०. ३३. ३ हा मंत्र आणि त्याजवरील भाष्य पहा. त्या मंत्रांतहि 'मूषो न शिश्ना वि अदन्ति मा आध्यः' असेच शब्द आले आहेत. तेथेंहि सायणांनीं आम्हीं येथें केल्याप्रमाणेंच अर्थ केला आहे.

**अमी ये सप्त रश्मयस्तत्रा मे नाभिराततां ।**
**त्रितस्तद्वेदाप्त्यः स जामित्वाय रेभति वित्तं मे अस्य रोदसी ॥९॥**

अमी इति । ये । सप्त । रश्मयः । तत्र । मे । नाभिः । आऽतता ।
त्रितः । तत् । वेद । आप्त्यः । सः । जामिऽत्वाय । रेभति । वित्तम् ।
मे । अस्य । रोदसी इति ॥ ९ ॥

## भाषायाम्.

९. अमी ये सप्त रश्मयः ( =येमी पुरोवर्तमानाः सप्त रश्मयः=सूर्यस्य किरणाः?) तत्र ( =तेषु ) मे नाभिः ( =मम नाभिः ) आतता ( =संबद्धास्ति ) । तत् (=एतत्) आप्त्यस्त्रितः ( =आप्त्योपनामकस्त्रित ऋषिः ) वेद ( =जानाति ) । स [ च ] जामित्वाय रेभति ( =बान्धवाय स्तौति=हे रश्मयो, यूयमेवाबन्धोर्मम बन्धवो भवतेति तान् स्तौति ) । [ अतः कारणात् ] हे रोदसी ( =द्यावापृथिव्यौ ), मे ( =मम ) अस्य [स्तोत्रस्य] ( =एतस्योच्चार्यमाणस्य स्तोत्रस्य=एतत्स्तोत्रं) वित्तं ( =जानीतम् ) ॥

अत्र सायणः । येऽमी द्युलोके वर्तमानाः सप्तसंख्याका रश्मयः सूर्यस्य किरणाः सन्ति तत्र तेषु सूर्यरश्मिषु अध्यात्मं सप्तप्राणरूपेण वर्तमानेषु मे मदीया नाभिराततां संबद्धा । ऋषिरात्मानमेव परोक्षतया निर्दिशति । त्रितस्तीर्णतमस्तिरस्कृताज्ञान आप्त्योऽपां पुत्र ऋषिस्तत् पूर्वोक्तं वृत्तान्तं वेद जानाति नान्यः । स जानन्नृषिर्जामित्वाय कूपान्निर्गन्तृत्वाय रेभति । तान् रश्मीन् स्तौति । अन्यत्समानम् । इति ॥

९. हे जे सप्त रश्मि यांच्याठायीं माझा नाभि बांधला आहे. आप्त्य त्रित तें जाणतो आहे. तो आप्तपणाकरितां त्या रश्मींचा स्तव करीत आहे. [तर] हे द्यावापृथिवी हो, तुम्ही माझें हें [स्तोत्र] ऐका.

9. My navel is tied in these seven rays that you see. Âptya Trita knows this. He implores them to become his relations. Know then, ye Earth and Heaven, this my [prayer].

९. या मंत्राचें भाषान्तर आम्हीं अक्षरशः केलें आहे. ऋषीचा अभिप्राय असा दिसतो कीं, 'मला माझे आप्तांनीं सोडून दिलें आहे आणि मी या 'सप्तरश्मीं'त (=?) बांधलों गेलों आहें, आणि मला दुसरें कोणी नाहीं. तर हे मला बांधणारे जे सप्त रश्मि त्यांनींच माझे आप्त व्हावें म्हणून मी प्रार्थना करीत आहें.'

या मंत्रांतील पहिले दोन चरण कठिण आहेत, इतर सर्व भाग सोपे आहेत. 'हे जे सप्त रश्मि' म्हणजे काय? आणि त्यांत माझा नाभि बांधला गेला आहे म्हणजे काय? कदाचित् असें असेल काय? कीं हें सूक्त कोणी मरणोन्मुख मनुष्यानें केलें आहे आणि तो आपला जीव जात आहे आणि तो सूर्यकिरणांत बांधला जाऊन द्युलोकांत उडून जात आहे असें समजत आहे आणि त्या रश्मींनींच आतां आपणास बंधूंच्या जागीं व्हावें अशी प्रार्थना करीत आहे?

कसेंहि असलें तरी 'सप्त रश्मयः' म्हणजे सूर्याचे 'सप्त किरण' होत असें विवक्षित दिसतें. ऋ. ८. ७२. १६ यांत सूर्याचे किरण सात होत असें स्पष्ट सांगितलें आहे ( सूर्यस्य सप्त रश्मिभिः ). यावरून सूर्यकिरणांचे सप्त रंग आहेत असा जो आधुनिक शास्त्रविद्येचा सिद्धांत तो प्राचीन काळीं आर्य लोकांस अपरिचित नव्हता असें दिसतें.

वृत्तसुखासाठीं तिसरा चरण 'त्रितस्तद्वेद आप्तिअः' असा म्हटला पाहिजे.

**अमी ये प॒ञ्चोक्ष॒णो मध्ये॑ त॒स्थुर्म॒हो दि॒वः ।**
**दे॒व॒त्रा नु प्र॒वाच्यं॑ सध्री॒ची॒ना नि वा॑वृतुर्वि॒त्तं मे॑ अ॒स्य रो॑दसी ॥**
**॥ १० ॥ २१ ॥**

अ॒मी इति॑ । ये । पञ्च॑ । उ॒क्षणः॑ । मध्ये॑ । त॒स्थुः । म॒हः । दि॒वः ।
दे॒व॒ऽत्रा । नु । प्र॒ऽवाच्य॑म् । स॒ध्री॒ची॒नाः । नि । व॒वृ॒तुः । वि॒त्तम् । मे॒ ।
अ॒स्य । रो॒द॒सी इति॑ ॥ १० ॥ २१ ॥

---

## भाषायाम्.

१०. अमी ये पञ्च उक्षणः (=येमो बलवन्तः पञ्च देवा) महो दिवो मध्ये (=महतो द्युलोकस्य मध्ये) तस्थुः (=आसते) [ये च] देवत्रा प्रवाच्यं नु सध्रीचीनाः (=मया कृतं देवविषयकं स्तोत्रं प्रति नित्यम् आगमनशीलाः) [सन्ति] [तेधुना] निववृतुः (=द्युलोकमध्यान्नताः सन्ति=न दृश्यन्ते)। [अतः कारणात्) हे रोदसी (=द्यावापृथिव्यौ), [युवां] मे (=मम) अस्य [स्तोत्रस्य=इदमुच्चार्यमाणं स्तोत्रं] वित्तं (=जानीतम्) ॥

अत्र सायणस्त्वेवं व्याख्यातवान् । उक्षणः सेक्तारः कामाभिवर्षकाः पञ्च । तत्र इन्द्रस्तद्वरुणस्तदग्निस्तदर्यमा तत्सविता चनो धादित्यर्द्धर्चेन प्रतिपादिताः पञ्चसंख्याका देवाः । यद्वा । अग्निर्वायुः सूर्यश्चन्द्रमा विद्युदित्येवं पञ्चसंख्याकाः । तथा च शाट्यायनकम् । एतान्येव पञ्च ज्योतींषि यान्येषु लोकेषु दीप्यन्ते । अग्निः पृथिव्यां वायुरन्तरिक्षे च आदित्यो दिवि चन्द्रमा नक्षत्रे विद्युदप्स्विति ! नक्षत्रे नक्षत्रलोके । अप्सु मेघस्थोदकेषु । तैत्तिरीयेऽप्येवमाम्नातम् । अग्निः पृथिव्यां वायुरन्तरिक्षे च सूर्यो दिवि चन्द्रमा दिक्षु नक्षत्राणि स्वर्लोक इति । येऽमी पञ्चसंख्याका देवा महो दिवो महतो विस्तीर्णस्य द्युलोकस्य मध्ये तस्थुः । तिष्ठन्ति । आसते । देवत्रा देवेषु नु क्षिप्रं प्रवाच्यं प्रशंसनीयं देवानां योग्यं मदीयं स्तोत्रं प्रति सध्रीचीनाः सहाञ्चन्तो युगपदागच्छन्तस्ते देवा मदीयं परिचरणं स्वीकुर्वन्ति । तदनन्तरं निवावृतुः । तृप्ताः सन्तो निवर्तन्ते च । अन्यत्समानम् ॥

१०. हे जे महाप्रबळ पांच [देव] विस्तीर्ण द्युलोकाच्या मध्यें असतात, ते, मी देवांविषयीं स्तोत्र रचितों त्याप्रत सर्व एकदम येणारे असतांहि, [आज] सर्व निघून गेले आहेत. [तर] हे द्यावापृथिवी हो, तुम्ही माझें हें [स्तोत्र] ऐका.

10. These five mighty [gods], who stand in the middle of great Heaven, and who always come all to my praise of the gods, have gone away. Know then, ye Earth and Heaven, this my [prayer].

---

१०. यांत ऋषीचा भावार्थ असा दिसतो कीं, 'हे जे पंच महाप्रबळ देव या विस्तीर्ण द्युलोकाच्या मध्यें असतात, आणि जे देवांविषयीं मी स्तोत्र म्हणूं लागलों म्हणजे नित्य येत असतात, ते आज मी स्तोत्र म्हणत असतांहि आणि मला संकट प्राप्त झालें आहे तरी मजकडेस न येतां आणि मला साहाय्य न करितां आपापलीं स्थानें सोडून गेले आहेत, आणि अदृश्य झाले आहेत. यास्तव हे द्यावापृथिवी हो, तुम्ही मात्र मला दिसतां आहां, तर तुम्ही तरी ही माझी प्रार्थना ऐकून घ्या आणि मला पावा.'

या मंत्रांत सांगितलेले पांच देव कोणते तें मात्र निश्चयानें सांगवत नाहीं. सायणाचार्य म्हणतात– इंद्र, वरुण, अग्नि, अर्यमा आणि सविता हे पांच देव अथवा अग्नि, वायु, सूर्य, चन्द्रमा आणि विद्युत् हे पांच देव असतील. ऋ. १०. ५.५. ३ यांत 'पञ्च देव' असे शब्द आले आहेत पण तेथें तरी पांच देव कोणकोणते तें समजत नाहीं.

'महाप्रबळ'=' उक्षणः.' 'उक्षन्' शब्दाचा मूळ अर्थ 'बैल' असा आहे. 'वृषा' शब्दाचा तरी तोच अर्थ आहे. आणि दोनहि शब्द वेदांत देवांस विशेषणार्थीं अथवा नामार्थीं लाविलेले आढळतात. बैल हें नांव देवांला आदरार्थी लाविलेलें आहे. आधुनिक भाषेंत जसें 'सिंह' असें म्हटलें म्हणजे बळ आणि पराक्रम या गुणांचा बोध होतो तसा वेदांतील मंत्रांत 'बैल' म्हटलें म्हणजे वीर्य आणि शक्ति यांहींकरून संपन्न असा विचार मनांत येतो.

वृत्तानुरोधेंकरून प्रथम चरणांत 'पञ्च उक्षणः' असें व्यस्त म्हटलें पाहिजे, आणि तिसऱ्या पादांत 'प्रवाचिअं' असें वाचलें पाहिजे.

**सुपर्णा एत आसते मध्य आरोधने दिवः ।**
**ते सेधन्ति पथो वृकं तरन्तं यह्वतीरपो वित्तं मे अस्य रोदसी ११**

सुऽपर्णाः । एते । आसते । मध्ये । आऽरोधने । दिवः ।
ते । सेधन्ति । पथः । वृकम् । तरन्तम् । यह्वतीः । अपः । वित्तम् ।
मे । अस्य । रोदसी इति ॥ ११ ॥

---

## भाषायाम्.

११. एते (=एते ते प्रसिद्धाः) सुपर्णाः (=? सूर्यकिरणाः ?) दिवः आरोधने मध्ये (=दिवो मध्ये यद् देवानां स्थानं तत्र) आसते (=तिष्ठन्ति) ते यह्वतीः अपः तरन्तं (=महतीरपः=महद् अन्तरिक्षं तरन्तं=महति अन्तरिक्षे चरन्तं) वृकम् (=अरण्यश्वानम्=अरण्यश्ववद् घातकं वृत्रं) पथः सेधन्ति (=मार्गात् निवारयन्ति) [मम स्तोत्रं च श्रोतुं न लब्धावसरा भवन्ति] । [अतः कारणात्] हे रोदसी (=द्यावापृथिव्यौ), [युवां] मे (=मम) अस्य [स्तोत्रस्य] (=इदमुच्चार्यमाणं स्तोत्रं) [युवामेव] वित्तं (=जानीतम्) ॥

अत्र सायणाचार्याः । सुपर्णाः । रश्मिनामैतत् । शोभनपतना एते सूर्यरश्मय आरोधने सर्वस्यावरके व्याप्ते दिवोऽन्तरिक्षस्य मध्य आसते । वर्तन्ते । ते सूर्यरश्मयः पथो मार्गाद्वृकमरण्यश्वानं सेधन्ति । निषेधन्ति निवारयन्ति । कीदृशम् । यह्वतीर्महतीरपस्तरन्तम् । अतिक्रामन्तम् । कूपपतनात्पूर्वं त्रितं दृष्ट्वैनं भक्षयितुं कश्चिदरण्यश्वा महतीं नदीं तितीर्षुराजगाम । स च सूर्यरश्मीन्दृष्ट्वायमवसरो न भवतीति निववृते । अतो रश्मयो वृकं निषेधन्तीत्युच्यते । यास्कपक्षे त्वाप इत्यन्तरिक्षनाम । यह्वतीरपो महदन्तरिक्षम् । पथः पथा द्वादशरश्म्यात्मना मार्गेण तरन्तं वृकं चन्द्रमसं सूर्यरश्मयो निषेधन्ति । अहनि हि सूर्यरश्मिभिर्निरुद्धश्चन्द्रमा निःप्रभो दृश्यते । अतो निःप्रभं कुर्वन्तीत्यर्थः ॥

११. हे [ जे ] द्युलोकाच्या अंतर्भागीं सुपर्ण आहेत, ते विस्तीर्ण उदकांवर पोहणारा जो लांडगा त्यास मार्गातून हाकून लावीत आहेत. [तर] हे द्यावापृथिवी हो, तुम्ही माझें हें [स्तोत्र] ऐका.

11. These Birds, which are in the interior of Heaven, are driving away from the road the wolf that floats on the wide waters. Know then, ye Earth and Heaven, this my [ prayer ].

११. भावार्थः–' हे जे द्युलोकांतील देव राहण्याच्या स्थळीं पक्ष्याप्रमाणें सत्वर पळणारे देव आहेत ते सुद्धा या वेळीं माझें स्तोत्र ऐकूं शकत नाहींत, कारण कीं ते अंतरिक्षांतील मेघरूपानें असणाऱ्या उदकांवर सुखानें पोहून प्रकाशाला अडवून टाकणारा जो वृत्र त्याला मार्गांतून हाकून देण्याच्या कामीं गुंतले आहेत. यास्तव हे द्यावापृथिवी हो, तुम्ही तरी ही माझी प्रार्थना ऐकून घ्या.'

यांत ' सुपर्ण ' ( म्हणजे पक्ष्याप्रमाणें धांवणारे देव ) ते कोण तें स्पष्ट समजत नाहीं. सायणाचार्य ' सूर्यकिरण ' असा अर्थ करितात. आकाशांतून पक्ष्याप्रमाणें जणुं सत्वर पळत जाणारे जे सूर्य अथवा चंद्र किंवा दुसरे प्रकाशगोल ते कोणी तरी विवक्षित आहेत यांत संशय नाहीं.

' द्युलोकाच्या अंतर्भागीं '=' आरोधने दिवः.' ' आरोधनं दिवः' म्हणजे द्युलोकांतील देवस्थान, देव जेथें राहतात असा द्युलोकाचा भाग. ऋ. ४. ८. २ आ ४ हे मंत्र आणि त्यांजवरील सायणभाष्य पहा.

' लांडगा '=' वृकम्.' भाषांतर अक्षरशः आहे. परंतु येथें लांडग्यासारिखा नाशक जो वृत्र तो घ्यावयाचा असें समजलें पाहिजे.

या ऋचेचा अर्थ सायणांनीं केला आहे तो भाषेंत उतरून घेतला आहे.

नव्यं तदुक्थ्यं हितं देवासः सुप्रवाचनम् ।
ऋतमर्षन्ति सिन्धवः सत्यं तातान सूर्यो वित्तं मे अस्य रोदसी १२

नव्यम् । तत् । उक्थ्यम् । हितम् । देवासः । सुऽप्रवाचनम् ।
ऋतम् । अर्षन्ति । सिन्धवः । सत्यम् । ततान । सूर्यः । वित्तम् । मे ।
अस्य । रोदसी इति ॥ १२ ॥

## भाषायाम्.

१२. हे देवासः (=देवाः), तत् (=एतद्=वक्ष्यमाणं) नव्यं (=स्तोत्रयोग्यम्) उक्थ्यं (=स्तुत्यं) सुप्रवाचनं (=शोभनवचनयोग्यं=सुस्तुत्यर्हं) [ बलं ] [ युष्मासु ] हितं (=स्थापितं) [ भवति ] [ यत् ] सिन्धवः (=नद्यः नदीनामुदकोत्पत्तिस्थानभूता आन्तरिक्षप्रदेशा) ऋतम् अर्षन्ति (=सत्यभूतमुदकं वहन्ति=प्रेरयन्ति=अवसृजन्ति) [अपि च] सूर्यः सत्यं ततान (=सत्यरूपं स्वकीयं तेजः प्रसारयति)। हे रोदसी (=रोदसौ=द्यावापृथिव्यौ), [युवां] मे (=मम) अस्य [स्तोत्रस] (=इदं स्तोत्रं) वित्तं (=जानीतम्) ॥

अत्रेदमुक्तं भवति। हे देवाः, यदन्तरिक्षान्मेघोदकानि वर्षन्ति यच्च सूर्यस्तेजःपुञ्जः सन्नुदेति स्वतेजसा च विश्वं भुवनं दृष्टिगोचरं करोति युष्माकमेव तत् प्रभाफलम्। एवं सति मम दुःखस्य निवारणं युष्माभिरनायासेन कार्यं न कृतं भवति। अतः कारणात् हे द्यावापृथिव्यौ, युवामेव मम प्रार्थनं शृणुतमिति ॥

ऋतशब्द उदकवाच्यपि भवतीति कृत्वा सायणेन यद् व्याख्यानं बहुषु मन्त्रेषु कृतं तदाधारबद्धमस्तीति ममाभिप्रायः। आपश्चित् पिप्युः स्तर्यो न गावः नक्षन् ऋतं जरितारः ते इन्द्र (ऋ. ७. २३. ४) इत्यत्र ऋतशब्दस्य उदकवाचित्वानिवार्यत्वात्। वक्ष्यमाणेषु च मन्त्रेषु ऋतशब्दस्य सायणेन उदक इत्यर्थस्य स्थाने कृतत्वाच्च ॥ आ यात्विन्द्रो दिव आ पृथिव्या मक्षू समुद्रादुत वा पुरीषात्। स्वर्णरादवसे नो मरुत्वान् परावतो वा सदनादृतस्य (ऋ. ४. २१. ३) इत्यत्र "ऋतस्य सदनात्" इत्येतत् पदद्वयम् उदकस्य स्थानात् मेघलोकात् इति यत् सायणेन व्याख्यातं तत्साधीयः। उपपन्नो हि द्युलोकभूलोकान्तरिक्षसूर्यलोकेषु मेघलोकस्य निर्देशः॥ अहम् अपः अपिन्वम् उक्षमाणाः धारयं दिवं सदने ऋतस्य (ऋ. ४. ४२. ४) इत्यत्र च उदकाधारे स्थाने सूर्यमधारयम् इति सम्यक् सायणः न तु ऋतस्य यज्ञस्य स्थाने वेद्याम् इति यावत् इति यत्पाश्चिमात्या इच्छन्ति तत्। वेद्यां दिवो धारणस्यासंभवात् ॥ ते आववृत्रन् सदनादृतस्य आदित् घृतेन पृथिवी वि उद्यते (ऋ. १. १६४. ४७)

१२. हे देव हो, नद्या सत्यस्वरूप उदकातें वाहवितात [आणि] सूर्य [आपल्या प्रकाशानें] सत्यातें [ सर्वत्र ] पसरतो हा जो स्तुत्य, वर्णनीय, [ आणि ] गाऊन प्रख्यात करण्यास योग्य असा [पराक्रम] तो तुमच्या आंगीं आहे. [ तर ] हे द्यावापृथिवी हो, तुम्ही माझें हें [ स्तोत्र ] ऐका.

12. This renowned, song-deserving and praiseworthy [power] is yours, O gods, that the Rivers send forth Truth that is eternal, [and] the Sun expands Truth that is self-existent. Know then, ye Earth and Heaven, this my [ prayer ].

१२. ' हे देव हो, अंतरिक्षांतून उदकें पृथिवीवर पडतात, आणि तेजःपुंज सूर्य उगवून जिकडे तिकडे उजेड पाडितो, हा जो स्तुत्य आणि वर्णनीय पराक्रम तो तुमच्या आंगीं आहे. तर तुम्ही माझें रक्षण करण्यास समर्थ आहां असें असून करीत नाहीं. यास्तव हे द्यावापृथिवी हो, तुम्हीच माझी प्रार्थना ऐकून घ्या ' असा या मंत्राचा भावार्थ आहे, आणि तो सायणांस अनुसरून आहे.

परंतु हा मंत्र कठिण आहे. ' हितं ' म्हणजे ' स्थापितं ' हें बरोबरच आहे, आणि ' तत् ' शब्दाबरोबर ' बलं ' किंवा अशाच एकाद्या शब्दाचा अध्याहार करणें यांतहि विशेष ओढाताण नाहीं. पण ' हितं ' याच्या बरोबर ' युष्मासु ' किंवा ' युष्मे ' पदाची दृढतर अपेक्षा होते, तें पद मंत्रांत नाहीं. शिवाय ' ऋतम्' म्हणजे उदक आणि 'सत्यम्' म्हणजे ' तेज ' असे अर्थ करावे लागतात.

' ऋत ' शब्दाचा अर्थ ' उदक ' असा सायणांनीं पुष्कळ ठिकाणीं केला आहे. तो निराधार आहे असें म्हणवत नाहीं. ' ऋत ' शब्द ऋग्वेदांत जेथें जेथें आला आहे ते सर्व मंत्र वाचून पाहातां ' ऋत ' शब्दाचा अर्थ कितीएक ठिकाणीं ' उदक ' असा केला असतां चांगला बसतो इतकेंच नव्हे, पण तसा केल्याशिवाय निर्वाहच नाहीं. उदाहरणार्थ, भाषेमध्यें कितीएक मंत्र उतरून घेतले आहेत आणि त्यांत ' ऋत ' शब्दाचा अर्थ उदक असाच केला पाहिजे असें सायणभाष्यावरून वगैरे दाखविलें आहे तें पहा.

'ऋत' शब्दाचा उदक हा अर्थ निघण्टूंत दिला आहे, यावरून फार प्राचीन काळापासून तो अर्थ चालत आला आहे हें उघड आहे. पाश्चिमात्य विद्वान् हा अर्थ टाकून देतात, आणि ' सत्य,' 'सत्यधर्म' इत्यादिक जे त्या शब्दाचे साधारण अर्थ, ते घेतात. परंतु ' ऋत '

k 4

**अग्ने तव त्यदुक्थ्यं देवेष्वस्त्याप्यम् ।**
**स नः सत्तो मनुष्वदा देवान्यक्षि विदुष्टरो वित्तं मे अस्य रोदसी ॥ १३ ॥**

अग्ने । तव । त्यत् । उक्थ्यम् । देवेषु । अस्ति । आप्यम् ।
सः । नः । सत्तः । मनुष्वत् । आ । देवान् । यक्षि । विदुःऽतरः ।
वित्तम् । मे । अस्य । रोदसी इति ॥ १३ ॥

---

इत्यस्य ते रश्मय ऋतस्य सदनात् उदकस्य स्थानात् आदित्यमण्डलादाववृत्रन् । आवर्तन्ते । अर्वाञ्च आगच्छन्ति । आदित् अनन्तरमेव यदार्वाग्गच्छन्ति तदानीमेव घृतेनोदकेन पृथिवी व्युद्यते । विविधं क्लिद्यते । इति सायणभाष्यम् । तच्चोपपन्नम् । येन ह्युदकेन पृथिवी क्लिद्यते तस्य अन्तरिक्षाद् आगन्तुं युक्तत्वात् ॥ रुद्रा ऋतस्य सदनेषु वावृधः ( ऋ. २. ३४. १३ ) इत्येतत् सायणः रुद्रा रुद्रपुत्रा मरुतः...... ऋतस्य उदकस्य सदनेषु निवासभूतेषु मेघेषु वावृधुः । वर्धन्ते । इति व्याख्यातवान् । तदपि युज्यते । मरुतो हि अन्तरिक्षप्रदेशेषु वर्धन्त इति ( ऋ. ३. ५३. १३; ५. ५९. ६ इत्यादिषु मन्त्रेषु) प्रसिद्धिः न तु ऋतस्य यज्ञस्य सदनेषु स्थानेषु वेदिषु तेषां जन्म वृद्धिर्वा संभाव्यते ॥ ऋतस्य योना अशयत् दमूनाः ( ऋ. ३. १. ११ ) इत्यत्रापि अग्निः ऋतस्योदकस्य योनौ स्थानेन्तरिक्षे......अशयत् शेते इति सम्यक् सायणः ॥

इदमेतावता सिद्धम् । ऋतशब्दस्य उदकवाचित्वं कथं प्राप्तमिति सत्यप्यनधिगतोत्तरे प्रश्ने भवति सोर्थस्तस्य शब्दस्येति सत्यम् इति ॥

---

## भाषायाम्.

१३. हे अग्ने, तव त्यत् ( =प्रसिद्धम् ) उक्थ्यं (=प्रशस्यं=स्तुत्यम्) आप्यं (=बन्धुभावो ) देवेषु अस्ति (=इन्द्रादिषु देवेषु वर्तते ) स [ त्वम् ] ( =अतः कारणात् ) विदुष्टरः ( =अतिशयेन विद्वान् होता त्वं ) मनुष्वत् नः सत्तः ( =मनुगृहे यथा निषण्णोभूस्तथास्माकं गृहे निषण्णः सन् ) देवान् आयक्षि ( =देवान् यष्ट्वा अस्मदाभिमुख्यान् कुरु ) । हे रोदसी ( =द्यावापृथिव्यौ ), मे ( =मम ) अस्य [ स्तोत्रस्य ] ( =इदमुच्चार्यमाणं सूक्तं ) वित्तं ( =जानीतम् ) ॥

---

याचा उदक हा अर्थ कसा होऊं लागला हें सांगणें जरी कदाचित् कठिण असेल तरी तितक्यावरून तो अर्थ खोटा समजणें हें योग्य होणार नाहीं.

'ऋत' म्हणजे 'मेघोदक' असा अर्थ होणें यांत अशक्य कांहीं नाहीं. 'तीर्थ' म्हणजे पाण्याकडे उतरून जावयाचा जो घाट पाहिऱ्यांनीं बांधलेला

१३. हे अग्नी, देवांशीं तुझा उत्तम बांधवसंबंध आहेच, यास्तव परमविद्वान् जो तूं तो मनूच्या घरीं केल्याप्रमाणें आमच्या घरीं आसनारूढ होऊन देवांचें यजन कर आणि त्यांस येथें आण. तर हे द्यावापृथिवी हो, तुम्ही माझें हें [ स्तोत्र ] ऐका.

13. Thou, O Agni, hast thy well-known praiseworthy relationship with the gods. Be seated then, a most learned priest that thou art, and worship the gods hither in our house as thou didst in that of Manu. Know then, ye Earth and Heaven, this my [prayer].

---

असतो तो; नंतर त्याच शब्दाचा अर्थ घांट उतरून खालीं गेल्यावर ज्या पाण्यांत आपण स्नान करितों तें पाणी, अथवा कोणतेंहि पवित्र पाणी ( मग तेथें घाट असो नसो ) असा होऊं लागला. आणि नंतर गुरूचे अथवा मूर्तीचे वगैरे पाय धुऊन जें पाणी पितात तें असा अर्थ होऊं लागला; कारण कीं तें मळीण पाणी पवित्र असें आपण मानूं लागलों. नंतर शाक्त लोकांच्या ग्रंथांत 'तीर्थ' हें कशाचें नांव आहे हें लक्ष्यांत आणिलें म्हणजे 'तीर्थ' शब्दाचा साधारण अर्थ आणि शाक्तांप्रमाणें विशेष अर्थ यांत फार अंतर आहे असें दिसतें आणि एकाच शब्दाचे हे दोन अर्थ कसे झाले याविषयीं साधारण पाहणारांस आश्चर्य वाटतें. त्याप्रमाणेंच सत्य धर्माची ( ऋताची ) प्रवृत्ति होण्यासाठीं म्हणून जें आकाशांतून पडतें तें पाणी असा 'ऋत' शब्दाचा अर्थ कां होऊं नये? हीच नाहीं तर अशासारिखीच कांहीं तरी दुसरी व्युत्पत्ति असली पाहिजे.

वृत्तानुरोधेंकरून प्रथम पादांत 'उक्थिअं' आणि चवथ्या पादांत 'सूरिअ:' असें म्हणावें लागतें.

---

१३. 'हे अग्नी, तूं देवांचा बंधु आहेस आणि ते तुजवर फार लोभ करितात आणि तुजशीं सख्यभावानें असतात. यास्तव तूं त्यांजला बोलाविशील तर ते येतील. तर पूर्वीच्याकाळीं मनूच्या घरीं जसा विद्वान् होत्याप्रमाणें बसून देवांला घेऊन येत होतास तसा आमचे घरीं वसून त्यांस घेऊन ये.'

'बांधवसंबंध'='आप्यम्.' अग्नि हा देवांचा मित्र अथवा बंधु होय असें पुष्कळ ठिकाणीं सांगितलें आहे.

'मनूच्या घरीं केल्याप्रमाणें'='मनुष्वत्.' मनु हा सर्व मनुष्यांचा आदिपुरुष तोच एक अतिप्राचीन उपासक अथवा ऋषि होय असें मागाहून मानण्यांत आलें, आणि या मंत्रांत जशी उपमा दिली आहे त्याप्रमाणें उपमा देण्यांत येऊं लागल्या. सू. ४६, मं. १३ आणि त्याजवरील टीप पहा.

वृत्तानुरोधेंकरून पहिले दोन चरण खालीं दाखविल्याप्रमाणें म्हणावे लागतात:—

अग्ने तव त्यदुक्थिअं।<br>
देवेषु अस्ति आपिअम्॥

सत्तो होता मनुष्वदा देवाँ अच्छा विदुष्टरः ॥
अग्निर्हव्या सुषूदति देवो देवेषु मेधिरो वित्तं मे अस्य रोदसी १४
सत्तः । होता । मनुष्वत् । आ । देवान् । अच्छ । विदुःऽतरः ।
अग्निः । हव्या । सुसूदति । देवः । देवेषु । मेधिरः । वित्तम् । मे ।
अस्य । रोदसी इति ॥ १४ ॥
ब्रह्मा कृणोति वरुणो गातुविदं तमीमहे ।
व्यूर्णोति हृदा मतिं नव्यो जायतामृतं वित्तं मे अस्य रोदसी ॥
॥ १५ ॥ २२ ॥
ब्रह्म । कृणोति । वरुणः । गातुऽविदम् । तम् । ईमहे ।
वि । ऊर्णोति । हृदा । मतिम् । नव्यः । जायताम् । ऋतम् । वित्तम् ।
मे । अस्य । रोदसी इति ॥ १५ ॥ २२ ॥

---

## भाषायाम्.

१४. विदुष्टरः (=विद्वत्तरो) होता (=देवानाम् आह्वातृभूतो) देवेषु मेधिरो देवः (=देवानां मध्ये मेधावी देवभूतः) अग्निः सत्तः (=निषण्णः सन्) मनुष्वत् (=मनुनामकस्य मनुष्याणामादिपुरुषभूतस्य प्रसिद्धस्योपासकस्य गृहे यथाकरोत् तथा) देवान् अच्छ हव्या आ सुषूदति (=देवान् प्रति हव्यानि प्रेर्य तान् देवान् आनयतु)। हे रोदसी (=हे द्यावापृथिव्यौ), मे (=मम) अस्य [स्तोत्रस्य] (=इदमुच्चार्यमाणं स्तोत्रं) वित्तं (=युवां जानीतम्)॥

१५. वरुणः (=एतन्नामको देवो) ब्रह्म कृणोति (=स्तोत्रं करोति=उपासकैः कारयति)। गातुविदं (=मार्गदर्शकं) तम् ईमहे (=वयं याचामहे)। [स] मतिं हृदा वि ऊर्णोति (=हृदयेन=बुद्ध्या=मनसा स्तोत्रं प्रकाशयति=उपासकहृदयेभ्यः स्तोत्रं प्रादुर्भावयति)। [अतः कारणात् हे ऋत्विजः], नव्यः ऋतं जायतां (=वरुणार्थमतिशयेन नवम् अकृतपूर्वं कर्म=हविरर्पणादिरूपं क्रियताम्)। हे रोदसी (=द्यावापृथिव्यौ), मे (=मम) अस्य [स्तोत्रस्य] (=इदमुच्चार्यमाणं स्तोत्रं) वित्तं (=जानीतम्)॥

यथा नवं स्तोत्रं देवानां प्रीतिकरं तथा नवं कर्मापि प्रीतिकरं भवतीति 'प्र तव्यसीं नव्यसीं धीतिमग्नये वाचो मतिं सहसः सूनवे भरे' (ऋ. १. १४३. १) इत्यादिश्रुतेः स्पष्टम्॥

१४. मोठा विद्वान् होता [ आणि ] सकळ देवांमध्यें बुद्धिमान् देव [ असा जो ] अग्नि [तो] मनूच्या येथें [करीत असे त्या]प्रमाणें [आमच्या येथें] बसून हवि देवांप्रत अर्पण करो. हे द्यावापृथिवी हो, तुम्ही माझें हें [स्तोत्र] ऐका.

14. May Agni, the most learned priest, [ Agni ] the wisest god among the gods, take his seat and send forth sacrifices towards the gods as he did in the house of Manu. Know, ye Earth and Heaven, this my [ prayer ].

१५. वरुण स्तोत्र करवितो. त्या मार्गदर्शकाची आम्ही प्रार्थना करितों. [तो मनुष्यांकडून] मनापासून भक्तिभाव प्रगट करितो. [ यास्तव त्याच्या प्रीत्यर्थ ] अगदी नवीन उपासना होओ. हे द्यावापृथिवी हो, तुम्ही हें माझें [स्तोत्र] ऐका.

15. Varuṇa causes the hymn. We pray to that guide. He manifests piety with the heart. May there be his service entirely new. Know, ye Earth and Heaven, this my [ prayer ].

---

१४. या मंत्राचा भावार्थ उघडच आहे आणि वरील मंत्रांत जें सांगितलें आहे त्याहून विशेष यांत कांहीं नाहीं.

या सूक्ताचा कर्ता कूपांत पडला असतां त्याणें हें सूक्त रचिलें अशी जी कथा, ती खरी असती तर कूपामध्यें अग्नि पेटवून ऋषीनें यज्ञ कसा केला असता ? यावरून कांहीं संकटसमयावरून हें सूक्त रचिलेलें तर खरेंच, पण ऋषि कूपांत पडला इत्यादि कथा निराधार असावी असें वाटतें.

१५. या ऋचेचा भावार्थः—‘ स्तोत्र करण्याची प्रेरणा वरुण देव करीत असतो. यास्तव स्तोत्ररूप सन्मार्ग दाखविणारा जो वरुण, त्याची आपण प्रार्थना करूं. मनांतील भक्ति वरुणच स्तोत्रद्वारा प्रगट करवितो. यास्तव त्या वरुणाप्रीत्यर्थ आपण पूर्वी कोणी न केलेली अशी उपासना करूं.’ या ऋचेंत वरुणाची प्रार्थना आहे कीं त्याणें तरी येऊन ऋषीचें संकट दूर करावें.

‘ मनापासून भक्तिभाव प्रगट करवितो ’=‘ वि ऊर्णोति हृदा मतिम्.’ म्हणजे मनापासून भक्ति करावी आणि स्तोत्रांच्या द्वारें मनःपूर्वक ती बोलून दाखवावी अशी प्रेरणा मनुष्यांला करितो.

**असौ यः पन्थां आदित्यो दिवि प्रवाच्यं कृतः ।**
**न स देवा अतिक्रमे तं मर्तासो न पश्यथ वित्तं मे अस्य रोदसी १६**

असौ । यः । पन्थाः । आदित्यः । दिवि । प्रऽवाच्यम् । कृतः ।
न । सः । देवाः । अतिऽक्रमे । तम् । मर्तासः । न । पश्यथ । वित्तम् । मे । अस्य । रोदसी इति ॥ १६ ॥

## भाषायाम्.

१६. असौ आदित्यः ( =आदित्यानां संबन्धी ) यः पन्थाः ( =मार्गो ) दिवि ( =द्युलोके ) प्रवाच्यं कृतः ( =प्रवचनस्य=स्तोत्रस्य विषयो यथा भवति तथा कृत्वा स्थापितः=दिवि वर्तते कविभिश्च भूयोभूयः स्तूयते ) स हे देवाः, [ युष्माभिः ] नातिक्रमे ( =नातिक्रमितुं=नातिक्रमणाय ) [ योग्यो भवति ] ( =युष्माभिर्नातिक्रमितुं शक्यः ) [ अपि च ] हे मर्तासः ( =मरणधर्माणो मनुष्याः ), तं [ यूयं ] न पश्यथ ( =युष्माकमपि दृश्यो न भवति ) । हे रोदसी ( =द्यावापृथिव्यौ ), मे ( =मम ) अस्य [ स्तोत्रस्य ] ( =इदमुच्चार्यमाणं स्तोत्रं ) [ युवां ] वित्तं ( =जानीतम् ) ॥

'अगदी नवीन उपासना होओ '= 'नव्यो जायताम् ऋतम्.' म्हणजे ज्या प्रकारची उपासना अजून कोणीहि कधीं केली नाहीं अशी नवीन उपासना आपण वरुणाप्रीत्यर्थ करूं. नवीन स्तोत्र करून म्हटलें म्हणजे देवाला जसा विशेष संतोष होतो, तसाच उपासना करण्याचा प्रकार नवा असला म्हणजे देव अधिक प्रसन्न होतात अशा बुद्धीचीं वाक्यें वेदांत आढळतात. ऋ. १. १४३. १ पहा. 'नव्यः ' हें ' नवीयः' याऐवजीं संक्षिप्त रूप आहे. 'वसु' ( चांगलें ) यापासून 'वसीयः' असें रूप होऊन त्यापासून संक्षिप्त रूप जसें 'वस्यः' असें होतें ( ऋ. १. १०९. १ ) तसेंच 'नवीयः' यापासून 'नव्यः' होत असतें.

तिसरा आणि चौथा हे चरण

वि ऊर्णोति हृदा मतिं ।
नवीओ जायतामृतम् ॥

असे म्हटले म्हणजे श्लोकवृत्ताला बरोबर जमतात.

१६. हा जो आदित्यांचा मार्ग द्युलोकांत स्तवनविषय करून स्थापिला [ आहे ] त्याचा, हे देवांनो, तुम्हांस अतिक्रम करतां येत नाहीं, [ आणि ] हे मर्त्यांनो, तो तुम्हांला दिसत नाहीं. [तर] हे द्यावापृथिवी हो, तुम्ही हें माझें [स्तोत्र] ऐका.

16. This path of Aditi's sons which is placed in Heaven, and is an object of praise, is not, O gods, to be transgressed by you; [and] you, mortals, do not see it. Know [then], ye Earth and Heaven, this my [prayer].

---

१६. 'वरुण, अर्यमा, भग, मित्र, इंद्र, सविता ( सू. १४, मं. ३ ) इत्यादि जे अदितीचे महान् पुत्र त्यांचा मार्ग द्युलोकांत आहे तो सोडून भलत्याच मार्गानें जाऊं म्हणाल तर, हे आदित्य देव हो, तुम्ही जाऊं शकत नाहीं. आणि त्या मार्गाचें वर्णन मर्त्य जन नित्य करितात आणि तो त्यांस दिसतो असें ते समजतात तरी, वस्तुतः तो त्यांस दिसत नाहीं. तर हे आदित्य देव हो, याशिवाय तुम्हांविषयीं आम्हांस कांहीं ठाऊक नाहीं. तथापि माझें संकट तुम्ही दूर करा. आणि तुम्ही न कराल तर द्यावापृथिवीं-नीं तरी ही माझी प्रार्थना ऐकावी.'

आदित्य देवांनीं येऊन ऋषीचें संकट निवारावें अशी प्रार्थना या ऋचेंत केली आहे. वरची ऋचा जशी वरुणाविषयींची, तशी ही आदित्यांविषयींची आहे.

' आदित्यांचा '=' आदित्यः.' ' आदित्य ' शब्द याप्रमाणें विशेषणार्थीं योजितात याविषयीं ऋ. १०. ३६. ४ आणि १०. ७७. ८ हे मंत्र आणि त्यांजवरील सायणभाष्य पहा.

वृत्तानुरोधेंकरून दुसऱ्या चरणांत ' प्रवाचिअं ' असें म्हणावें लागतें.

त्रितः कूपेऽवहितो देवान्हवत ऊतये ।
तच्छुश्राव बृहस्पतिः कृण्वन्नंहूरणादुरु वित्तं मे अस्य रोदसी १७

त्रितः । कूपे । अवऽहितः । देवान् । हवते । ऊतये ।
तत् । शुश्राव । बृहस्पतिः । कृण्वन् । अंहूरणात् । उरु । वित्तम् । मे ।
अस्य । रोदसी इति ॥ १७ ॥

---

## भाषायाम्.

१७. त्रितः (=एतन्नामक उपासकः) कूपे अवहितः (=स्थापितः) [सन्] ऊतये (=रक्षणाय) देवान् हवते (=आह्वयति)। तत् (=आह्वानं) बृहस्पतिः (=एतत्संज्ञो देवः) शुश्राव (=श्रुतवान्), अंहूरणात् उरु कृण्वन् (=दुरितात् मोक्षं कुर्वन्=दुरिताच्च तं मुमोच)। [अतः कारणात्] हे रोदसी (=द्यावापृथिव्यौ), [युवां] मे (=मम) अस्य [स्तोत्रस्य] (=इदमुच्चार्यमाणं स्तोत्रं) वित्तं (=जानीतम्)॥

१७. त्रिताला कूपांत टाकिलें [ तेव्हां ] तो रक्षणासाठीं देवांचा धांवा करिता झाला तो बृहस्पतीनें ऐकिला, आणि [ तो त्रिताला ] संकटापासून मुक्त करिता झाला. तर हे द्यावापृथिवी हो, तुम्ही हें माझें [स्तोत्र] ऐका.

17. Trita was plunged into a well. He calls the gods for help. Bṛihaspati heard that [ call ] and liberated him from the distress. Know then, ye Earth and Heaven, this my [ prayer ].

---

१७. तेरावी आणि चवदावी ह्या ऋचा जशा अग्नीविषयीं आहेत, पंधरावी जशी वरूणाविषयीं, आणि सोळावी जशी आदित्यांविषयीं, तशी ही सत्रावी ऋचा 'बृहस्पति' या नांवाच्या देवाविषयीं आहे. ( बृहस्पति ही कोणती देवता याविषयीं पुढें पहा ). मंत्रकर्त्या ऋषीचा अभिप्राय असा दिसतो कीं, 'पूर्वीच्या काळीं त्रित म्हणून कोणीएक उपासक कूपांत पडला असतां त्याणें त्या संकटसमयीं बृहस्पतीचा धांवा केला तो ऐकून बृहस्पति देवानें त्याची त्या संकटापासून मुक्ति केली. त्याप्रमाणें मी आतां बृहस्पति देवाचा धांवा करीत असतांहि तो येत नाहीं. तर हे द्यावापृथिवी हो, तुम्ही तरी माझी ही प्रार्थना ऐका.'

हें सूक्त त्रित ऋषि विहिरींत पडला असतां त्याणें केलें अशी जी कथा आहे, तिचें बीज या ऋचेंत आहे. परंतु 'त्रित कूपांत पडला आणि त्याणें धांवा केला तेव्हां बृहस्पतीनें त्याचें रक्षण केलें' असें म्हटलें आहे इतक्यावरूनच हें सूक्त त्रितानें केलें असें म्हणण्यास सबळ कारण नाहीं. आम्हांला वाटतें कीं बृहस्पतीनें त्रित नांवाच्या ऋषीला पूर्वी रक्षिलें त्याचें उदाहरण या ऋचेंत दिलें आहे, आणि जसें त्याणें त्रिताला संकटसमयीं रक्षिलें तसें माझेंहि तो संरक्षण करो असा भावार्थ जाणविला आहे. आणि मागाहून या सूक्ताचा कर्ता कोण असावा याविषयीं संहिताकारांस, अनुक्रमणिकाकारांस वगैरे विचार पडला तेव्हां या सत्राव्या ऋचेंत त्रिताचें नांव आहे इतक्यावरून त्रित ऋषीचें हें सूक्त असें मानिलें. आणि त्रित या सूक्ताचा द्रष्टा म्हणावा तर १०१ पासून ११५ पर्यंत जीं कुत्स ऋषीचीं सूक्तें त्यांच्या मध्यें हें एकच सूक्त दुसऱ्या ऋषीचें कसें आलें? आणि कुत्स ऋषीच्या या पंधरा सूक्तांचे शेवटचा उपसंहारमंत्र "तन्नो मित्रो वरूणो मामहन्ताम्" इत्यादि आहे त्याप्रमाणें ह्या १०५ व्या सूक्ताचाहि पण उपसंहार आहे; तर हेंहि सूक्त कुत्स ऋषीचें असावें अशी शंका उत्पन्न झाली तेव्हां त्रिताचें नव्हे तर कुत्साचें

**अरुणो मा सकृद्वृकः पथा यन्तं ददर्श हि ।**
**उज्जिहीते निचाय्या तष्टेव पृष्ट्यामयी वित्तं मे अस्य रोदसी १८**

अरुणः । मा । सकृत् । वृकः । पथा । यन्तम् । ददर्श । हि ।
उत् । जिहीते । निऽचाय्य । तष्टाऽइव । पृष्टिऽआमयी । वित्तम् । मे ।
अस्य । रोदसी इति ॥ १८ ॥

---

## भाषायाम्.

१८. अरुणः (=आरक्तवर्णो) वृकः (=अरण्यश्वा) पथा यन्तं (=मार्गेण गच्छन्तं) मा (=मां) सकृत् ददर्श हि (=एकवारमपश्यत्) । निचाय्य [च] (=मां दृष्ट्वा च) पृष्ट्यामयी तष्टेव (=तक्षणात् पार्श्वास्थिषु जातक्लेशो वर्धकिरिव) उज्जिहीते (=उद्गच्छति=उत्थितोभूत्) । हे रोदसी (=द्यावापृथिव्यौ), [युवां] मे (=मम) अस्य [स्तोत्रस्य] (=इदमुच्चार्यमाणं स्तोत्रं) वित्तं (=जानीतम्) ॥

दुर्बोधैषा सायणेनैवं व्याख्याता । अरुणवर्णो लोहितवर्णो वृकोऽरण्यश्वा सकृदेकवारं पथा यन्तं मार्गेण गच्छन्तं मा मां ददर्श हि । दृष्टवान् । हि पादपूरणम् । निचाय्य दृष्ट्वा च मां जिघृक्षुः सन् उज्जिहीते । उद्गच्छति स्म । तत्र दृष्टान्तः । तष्टेव पृष्ट्यामयी यथा तक्षणजनितपृष्ठक्लेशस्तष्टा वर्धकिस्तदपनोदनायोर्ध्वाभिमुखो भवति तद्वत् । हे द्यावापृथिव्यौ मदीयमिदं दुःखं वित्तम् । जानीतम् । यद्वा । वृक इति विवृतज्योतिष्कश्चन्द्रमा उच्यते । अरुण आरोचमानः कृत्स्नस्य जगतः प्रकाशकः । मासकृत् मासार्द्धमासर्त्वयनसंवत्सरादीन् कालविशेषान् कुर्वन् । तिथिविभागज्ञानस्य चन्द्रगत्यधीनत्वात् । स चन्द्रमा आकाशमार्गे यन्तं गच्छन्तं नक्षत्रगणं ददर्श । हिरवधारणे । नक्षत्रगणमेव ददर्श न कूपपतितं मामित्यनादरो द्योत्यते । यदि मां पश्येत् उद्धरेत्कूपात् । निचाय्य नक्षत्रगणं दृष्ट्वा चोज्जिहीते । येन नक्षत्रेण संयुज्यते तेन सहोद्गच्छति । न मामभिगच्छतीत्यर्थः । अन्यत्पूर्ववत् ॥ अत्र मासकृदिति यास्क एकं पदं मन्यते शाकल्यस्तु पदद्वयम् । तस्मिन्पक्षेऽयमर्थः दक्षप्रजापतेर्दुहितृभूताः स्वभार्या अश्विन्याद्यास्तारकाः पुनःपुनर्ददर्श । मां सकृदेव पश्यतीति सकृद्दृष्ट्वा चोज्जिहीते । ताराभिः सहोर्ध्वमेव गच्छति । न मां कूपादुत्तारयति । अत इदमनुचितम् । हे द्यावापृथिव्यौ मदीयमिमं वृत्तान्तं जानीतम् ॥ अत्र निरुक्तम् । वृकश्चन्द्रमा भवति विवृतज्योतिष्को वा विकृतज्योतिष्को वा विक्रान्तज्योतिष्को वा । अरुण आरोचनो मासकृन्मासानां चार्द्धमासानां च कर्ता भवति चन्द्रमा वृकः पथा यन्तं ददर्श नक्षत्रगणमभिजिहीते निचाय्य येन येन योक्ष्यमाणो भवति चन्द्रमास्तक्ष्णुवन्निव पृष्ठरोगी । नि० ५. २० । इति ॥

१८. आरक्तवर्णाचा लांडगा मी मार्गानें जात असतांना मला एक वेळ पाहता झाला. आणि पाहून, बरगड्या दुखत असलेल्या सुताराप्रमाणें, वर उठला. तर हे द्यावापृथिवी हो, तुम्ही हें माझें [स्तोत्र] ऐका.

18. For a tawny wolf once saw me as I was going by the road. He on seeing me rose up, as does a carpenter feeling pain in his ribs. Know then, ye Earth and Heaven, this my [ prayer ].

असें अनुक्रमणिकेंत लिहिलें आहे!

'त्रिताला कूपांत टाकिलें'='त्रितः कूपे अवहितः.' त्रित ऋषीविषयीं ऋग्वेदांत जेथें जेथें उच्चार आला आहे (सू. ५२, मं. ५ याजवरील आमची टीप पहा) ते मंत्र पुनः पाहतां त्यांत कोठें त्रित कूपांत पडला अथवा त्याला कोणी कूपांत ढकलून दिलें असें सांगितलेलें नाहीं. तो पुरातन एक उपासक असे आणि तो देवभक्त असे इतकेंच सांगितलें आहे.

'बृहस्पति' हा कोण याविषयीं सायणाचार्य इतकेंच सांगतात कीं "मोठे जे देव त्यांचा पाळणारा बृहस्पति या नांवाचा एक देव." परंतु मोठ्या देवांचें पालन करणारा म्हणून त्याचें नांव बृहस्पति असें पडलें नाहीं. तर 'स्तुतीचा पति' म्हणजे 'प्रार्थनेचा प्रभु' या अर्थी तसें त्याचें नांव पडलें आहे. वाऱ्याची देवता जशी वायु, पावसाची देवता जशी इन्द्र, पापपुण्याची देवता जशी वरूण, तशी स्तोत्राची देवता बृहस्पति म्हणून मानण्यांत आली. बृहस्पतीला 'ब्रह्मणस्पति' असेंहि नांव आहे. 'ब्रह्म' म्हणजे स्तोत्र, त्याचा 'पति' म्हणून 'ब्रह्मणस्पति.' भाविक मनुष्यांची देवांविषयीं जी भक्ति तद्रूपीच ही देवता समजावयाची आहे. म्हणूनच बृहस्पतीस देवयजक, होता, स्तोता असें नांव दिलेलें आढळतें. 'बृहस्पति' हा देवांकडेस मनुष्यांच्या पक्षानें बोलणारा मध्यस्थ, आणि अधार्मिक जनांपासून धार्मिक जनांचें संरक्षण करणारा होय असें सांगितलें आहे. व मनुष्यांचें जें स्तोत्र तद्रूपीच ही देवता असल्यामुळें यास देवांचा पुरोहित असेंहि म्हटलें आहे. आणि त्यावरूनच इंद्रादि देवांचा पुरोहित अथवा गुरु बृहस्पति या नांवाचा महाविद्वान् कोणाएक आहे असें पुराणादिक ग्रंथांत मागाहून अनेक कथारूपानें प्रसिद्ध झालें आहे. सू. १४, मं. ३ आणि सू. ८९, मं. ६ यांजवरील टिपा पहा.

वृत्तसुखासाठीं 'त्रितः कूपे अवहितः' असा पहिला चरण वाचावा लागतो.

१८. या ऋचेचा अर्थ आम्हीं सायणांस अनुसरूनच केला आहे. शब्दशः अर्थ स्पष्टच आहे, पण भावार्थ काय आहे तें नीट समजत नाहीं. 'वृक'

एनाङ्गूषेण वयमिन्द्रवन्तोऽभि ष्याम वृजने सर्ववीराः ।
तन्नो मित्रो वरुणो मामहन्तामदितिः सिन्धुः पृथिवी उत द्यौः ॥
॥ १९ ॥ २३ ॥ १५ ॥

एना । आङ्गूषेण । वयम् । इन्द्रऽवन्तः । अभि । स्याम । वृजने । सर्वऽवीराः ।
तत् । नः । मित्रः । वरुणः । ममहन्ताम् । अदितिः । सिन्धुः । पृथिवी । उत । द्यौः ॥ १९ ॥ २३ ॥ १९ ॥

## भाषायाम्.

१९. एना आङ्गूषेण (=अनेनाघोषणयोग्येन स्तोत्रेण हेतुना) इन्द्रवन्तः (=प्रीतेनेन्द्रेण तद्वन्तः=प्रीतेन्द्रेण कृतसाहाय्याः) सर्ववीराः (=सर्वैरपि नो योद्धृभिः पुत्रादिभिः सहिता) वयं वृजने (=संग्रामे) अभि साम (=शत्रून् अभिभवेम)। तत् (=एतच्च) मित्रः, वरुणः, अदितिः (=एतन्नाम्नी देवानां माता), सिन्धुः (=समुद्राभिमानिनी देवता) पृथिवी उत द्यौः (=पृथिवी द्युलोकश्च) [इत्येते] नः मामहन्ताम् (=अस्मभ्यम्=अस्मदर्थं पूजयन्तु=ददतु)॥

म्हणजे लांडगा, पण येथें साधारण प्रसिद्ध लांडगा समजावयाचा कीं काय ? आणि मला त्याणें एक वेळ मार्गांत पहिलें हें सांगण्याचें प्रयोजन येथें काय आहे, आणि लांडगा पाहून उठला, पण पुढें काय झालें तें सांगितलें नाहीं; त्यापेक्षां मला पाहून तो उठला हें कशासाठीं सांगितलें ?

यास्कानें या ऋचेचा काय अर्थ केला आहे तो, भाषेंत सायणभाष्य उतरून घेतलें आहे त्यांत आहे तो पहा.

'वरगड्या दुखत असलेल्या सुताराप्रमाणें '=' तष्टेव पृष्ट्यामयी.' म्हणजे लांकडें तासून तासून थकलेला जो सुतार त्याच्या पाठींत दुखूं लागलें म्हणजे तो जसा उठतो तसा हळू उठला असा भावार्थ दिसतो.

तिसरा आणि चवथा हे चरण
उज्जिहीते निचायिआ
तष्टेव पृष्टिआमयी ॥
असे म्हटले पाहिजेत, म्हणजे अनुष्टुप् वृत्ताला जमतात.

१९. या स्तोत्राच्या योगानें इन्द्र ज्यांस प्रसन्न झाला आहे असे आम्ही आमच्या सर्व वीरांसहित संग्रामांत विजयी होऊं असें घडो. आणि हें दान मित्र, वरुण, अदिति, समुद्र, पृथिवी आणि द्यु आम्हांला देओत.

19. With this loud hymn may we, befriended by Indra, be victorious in battle with all our heroes. And may Mitra, Varuṇa, Aditi, the Sea, Earth and Heaven confirm this unto us.

---

१९. हा या सूक्ताचा उपसंहार आहे, आणि ऋषि म्हणतो, 'हें जें सूक्त आतां आम्हीं मोठ्यानें म्हटलें त्याच्या योगानें इंद्र प्रसन्न होओ, आणि त्याच्या साहाय्यानें आम्हांला युद्धांत जय येओ, आणि आमचे जे पुत्रपौत्रादिक योद्धे त्यांतून कोणी न पडतां तेहि आम्हांबरोबर विजयी होओत; आणि मित्र, वरुण, अदिति, सिंधु, पृथिवी आणि द्यू हे तें दान आम्हांला देओत.' या उपसंहारावरून पहातां कूपांत पडलेल्या मनुष्यानें हें सूक्त रचिलें असेल असें वाटत नाहीं.

आमच्या पुत्रपौत्रादिकांसहित आम्ही युद्धांत विजयी होऊं असें कर अशी जी प्रार्थना तिजकडे लक्ष्य देण्यासारिखें आहे.

---

## सूक्तम् १०६.

आङ्गिरसः कुत्स ऋषिः। विश्वे देवा देवता। अन्त्या त्रिष्टुप्। शिष्टा जगत्यः॥

**इन्द्रं मित्रं वरुणमग्निमूतये मारुतं शर्धो अदितिं हवामहे।**
**रथं न दुर्गाद्वसवः सुदानवो विश्वस्मान्नो अंहसो निष्पिपर्तन॥१॥**

इन्द्रम्। मित्रम्। वरुणम्। अग्निम्। ऊतये। मारुतम्। शर्धः। अदितिम्। हवामहे।
रथम्। न। दुःऽगात्। वसवः। सुऽदानवः। विश्वस्मात्। नः। अंहसः। निः। पिपर्तन॥ १॥

**त आदित्या आ गता सर्वतातये भूत देवा वृत्रतूर्येषु शंभुवः।**
**रथं न दुर्गाद्वसवः सुदानवो विश्वस्मान्नो अंहसो निष्पिपर्तन॥२॥**

ते। आदित्याः। आ। गत। सर्वऽतातये। भूत। देवाः। वृत्रऽतूर्येषु। शम्ऽभुवः।
रथम्। न। दुःऽगात्। वसवः। सुऽदानवः। विश्वस्मात्। नः। अंहसः। निः। पिपर्तन॥ २॥

---

### भाषायाम्.

१. [वयम्] इन्द्रं, मित्रं, वरुणम्, अग्निं, मारुतं शर्धः (=मरुतां गणम्) अदितिं [च] ऊतये (=अस्मद्रक्षणाय) हवामहे (=आह्वयामहे)। हे सुदानवः (=शोभनदाना) वसवः (=देवाः), रथं दुर्गात् न (=रथम् उच्चावचस्थलादिव), नः विश्वस्मात् अंहसः (=सर्वस्मात् पापात्=भयात्) निष्पिपर्तन (=निर्गमय्य पालयत)॥ रथं नेत्यत्र गन्तुमशक्यान्निम्नोन्नतात्स्थानात्सारथयो यथा रथं पालयन्ति तद्वदिति सायणाचार्याः॥

२. हे आदित्याः (=अदितेः पुत्राः सवितृवरुणाद्यात्मका देवाः), ते [यूयं] (=यूयमपि) सर्वतातये (=सर्वसुखाय=सर्वमप्यभिलषितमस्मभ्यं दातुम्) आ गत (=आगच्छत)। हे देवाः, वृत्रतूर्येषु (=संग्रामेषु) शंभुवः (=सुखस्य भावयितारः=सुविजयस्य कर्तारो) भूत (=भवत)। हे सुदानवः (=शोभनदाना)

## सूक्त १०६.

ऋषि–आंगिरसकुळांतील पुरुष कुत्स. देवता–विश्वे देव. वृत्त–जगती, शेवटची ऋचा मात्र त्रिष्टुभ्.

१. इन्द्र, मित्र, वरुण, अग्नि, मरुद्गण [ आणि ] अदिति यांस आम्ही रक्षणासाठीं बोलावितों. [ तर ] हे कल्याणकारक उदार [ देव ] हो, खडकाळ जागेंतून रथाला पार पाडिल्याप्रमाणें तुम्ही सर्व संकटांतून आम्हांस पार पाडा.

२. आणि हे आदित्य हो, तुम्हीहि आम्हांला सर्व सुखोपभोग देण्यासाठीं या. हे देवांनो, तुम्ही संग्रामांत आमचे विजयदाते व्हा. हे कल्याणकारक उदार [ देव ] हो, खडकाळ जागेंतून रथाला पार पाडिल्याप्रमाणें तुम्ही सर्व संकटांतून आम्हांस पार पाडा.

## HYMN 106.

To *Vis've Devas* ( i.e. *All the Gods*). By *Kutsa* of the family of *Angiras*. Metre—*Jagatî* except the last verse in which it is *Trishṭubh*.

1. We invoke Indra, Mitra, Varuṇa, Agni, the troop of Maruts, [and] Aditi, for help. Ye wealth-bestowing good [ gods ], carry us safely through all danger, as a car through a gorge.

2. And you Âdityas too, come to give us all happiness. Give us success, ye gods, in [ our ] fights with the enemy. Ye wealth-bestowing good [ gods ], carry us safely through all danger, as a car through a gorge.

---

१. हें सूक्त विश्वेदेवांविषयीं आहे. म्हणजे कोणत्या तरी एकच देवाविषयीं नसतां अनेक वेगवेगळ्या देवांविषयीं आहे.

'मरुद्गण'='मारुतं शर्धः.' सू. ३७, ३८, ३९, ६४, ८५, ८६, ८७, ८८ यांत ज्यांचें वर्णन केलें आहे ते देव.

'अदिति.' म्हणजे कोण देवता याविषयीं सू. ८९, मं. १० आणि सू. ७२, मं. ९ यांजवरील आमची टीप पहा.

हे कल्याणकारक उदार देव हो, इ०. हा सगळा उत्तरार्ध पालवपदार्थी आहे आणि प्रत्येक मंत्राच्या शेवटीं येत जाईल.

२. वरच्या मंत्राप्रमाणेंच यांतहि युद्धांत आमचें संरक्षण करा आणि आम्हांस विजयी करा अशी आदित्यांस

**अवन्तु नः पितरः सुप्रवाचना उत देवी देवपुत्रे ऋतावृधा ।**
**रथं न दुर्गाद्वसवः सुदानवो विश्वस्मान्नो अंहसो निष्पिपर्तन ॥३**

अवन्तु । नः । पितरः । सुऽप्रवाचनाः । उत । देवी इति । देवपुत्रे इति देवऽपुत्रे । ऋतऽवृधा ।
रथम् । न । दुःऽगात् । वसवः । सुऽदानवः । विश्वस्मात् । नः । अंहसः । निः । पिपर्तन ॥ ३ ॥

---

वसवः (=देवाः), रथं दुर्गात् न (=रथम् उच्चावचस्थलादिव), नः विश्वस्मात् अंहसः (=सर्वस्मात् पापात्=भयात्) निष्पिपर्तन (=निर्गमय्य पालयत) ॥

---

## भाषायाम्.

३. सुप्रवाचनाः (=सुखेन प्रवक्तुं स्तोतुं योग्याः) पितरः (=एतन्नामका देवस्वभावभाग्जनाः) उत (=अपि च) ऋतावृधा (=ऋतावृधौ=ऋतेन सत्यभूतेन यज्ञेन प्रवृद्धे) देवपुत्रे (=देवा इन्द्रावरुणादयः पुत्रा ययोस्ते) देवी (=देव्यौ=द्यावापृथिवीरूपे) नः (=अस्मान्) अवन्तु (=रक्षन्तु)। हे सुदानवः (=शोभनदाना) वसवः (=देवाः), रथं दुर्गात् न (=रथम् उच्चावचस्थलादिव), नः विश्वस्मात् अंहसः (=सर्वस्मात् पापात्=भयात्) निष्पिपर्तन (=निर्गमय्य पालयत) ॥

---

आणि दुसऱ्या सामान्य देवांस प्रार्थना आहे.

ऋग्वेदांत युद्धसंबंधाचीं किती सूक्तें आहेत याचा विचार केला तर असें वाटेल कीं, आमचे वाडवडील नित्यशः लढाई करण्यांत आणि शत्रूंला आपल्या वश करण्यांतच जणुं गुंतले असत. हें सर्व सूक्त त्याच मासल्याचें आहे असें म्हटल्यास चालेल.

ही ऋचा आधुनिक वृत्ताप्रमाणें म्हटली तर पहिल्या पादांत 'आ गत सर्वतातये' असें पाहिजे, आणि 'आ गत' असाच मूळचा व्याकरणशुद्ध पाठ असतां छंदासाठीं म्हणून 'आ गता' असें दीर्घ केलें आहे, आणि दुसऱ्या पादांत 'भूत देवा' या स्थळीं 'भूता देवा' असें असण्याची अवश्यकता असतां तसें म्हणत नाहीं, यावरून हें वृत्त

## पोंच ता. १ पासून ता. ३० एप्रिलपर्यंत.

| | रु. आ. |
|---|---|
| श्रीमंत भीमराव रावजी इनामी जहागीरदार. ... ... | ६– ० |
| राजे कृष्ण बानजी. ... ... ... | ६– ६ |
| राजे प्रमाथी भूषणदेवराव. ... ... ... | ६– ७ |
| रा. बा. मुकुंदराय मणीराय. ... ... ... | १२–१२ |
| रा. रा. महादेव विष्णु काणे. ... ... ... | ६– ६ |
| ,, ,, सी. एम. रंगस्वामी ऑपोथेकरि. ... ... ... | ६– ६ |
| ,, ,, वामनराव रामचंद्र ओक. ... ... ... | १२– १२ |
| ,, ,, मोरो हरी तेंडोलकर. ... ... ... | ६– ६ |
| ,, ,, यशवंत सखाराम वकील. ... ... ... | ६– ६ |
| ,, ,, केशव गोविंद जोशी वकील. ... ... ... | १९– २ |
| ,, ,, केशवराव अमृत हर्णे. ... ... ... | ६– ६ |
| ,, ,, मगीनदास वृजभुकणदास वकील. ... ... ... | ६– ० |
| ,, ,, आत्माराम परशेराम. ... ... ... | ६– ० |
| ,, ,, दुर्लभ गंगासा. ... ... ... | १– २ |
| ,, ,, गजानन दाजी निसाळ. ... ... ... | ०– ८॥ |
| ,, ,, रघुनाथ वामन वैद्य. ... ... ... | ६– ६ |
| ,, ,, गंगाधर शिवराम घडभडे. ... ... ... | १२–१२ |
| ,, ,, जनार्दन दामोदर कोलटकर. ... ... ... | ६– ० |
| ,, ,, वामन गणेश दांडेकर. ... ... ... | ६– ० |
| ,, ,, बाबाजी यशवंत कार्के. ... ... ... | ६– ० |
| ,, ,, विनायकराव चिंतामण जोमळेकर. ... ... ... | ६– ६ |
| ,, ,, विष्णु मोरेश्वर महाजनी. ... ... ... | ६– ६ |
| ,, ,, लालाजी अंबाजी धुपे. ... ... ... | ६– ६ |
| पंडित रामनारायण हींडर. ... ... ... | १२–१२ |
| बाबु उमेशचंद्र बानर्जी. ... ... ... | ८– ० |
| रेव्हरंड डी. श्वीटन. ... ... ... | १२–१२ |
| सेक्रेटरी गुजराथ व्हरन्याक्युलर सोसिटी. ... ... ... | २३–१४ |
| नेटिव जनरल लायब्ररी मळेगांव. ... ... ... | ६– ६ |
| सिटी लायब्ररी अहमदनगर. ... ... ... | ३–१४ |
| वारटन लायब्ररी लुनावाडा. ... ... ... | ४–१२॥ |

Registered No. 110 of 1878.

# NOTICE.

The second Valuem of the Vedârthayatna will be finished with the last hymn ( 121 ) of the first Ashṭaka of the Regveda Samhitâ, that is, in about four or five more parts.

# विशेष सूचना.

पहिल्या अष्टकाचे शेवटील सूक्त ( १२१ ) संपलें म्हणजे सुमारें आणखी ४ किंवा ५ अंक झाले म्हणजे हा वेदार्थयत्नाचा दुसरा भाग संपेल.

# सूचना.

| | रु. | आ. |
|---|---|---|
| वर्षाची वर्गणी, आगाऊ | ६ | ० |
| मुंबईबाहेर राहणारांस टपाल हंशिलाबद्दल दरवर्षाचे | ० | ६ |

All communications to be addressed to the Manager Mr. Mahâdev Nârâyan Pandit, No. 29 *Moroba Popatji's Oart, Kalka Devi Road, Bombay.*

ग्रंथकर्त्याच्या नांवचा वगैरे सर्व प्रकारचा पत्रव्यवहार मुंबई मोरोबा पोपटजीची वाडी घर नंबर २९, या पत्त्यावर रा. रा. महादेव नारायण पंडित "म्यानेजर वेदार्थयत्न" यांच्याशीं ठेवावा.

**विशेष सूचना.**–आमच्या कितीएक वर्गणीदारांकडे गेल्या वर्षाची बाकी येणें आहे ती त्यांणीं मेहेरबानी करून लवकर पाठवून द्यावी.

तिकिटें पाठविणें झाल्यास अर्ध्या आण्याच्या दराचीं असून दर रुपयास अर्धा आणा वर्ताळा असावा. नाटपेड पत्र घेतलें जाणार नाहीं.

THE

# VEDÂRTHAYATNA

OR

## AN ATTEMPT TO INTERPRET THE VEDAS.

# वेदार्थयत्न.

## ऋग्वेदसंहिता

पदांसहित व

तिचें मराठी आणि इंग्रजी भाषांतर.

पुस्तक २. अंक १२. मे सन १८७८. मासिक भाग २६.
Vol 2 May 1878 No 26

मुंबई:
"निर्णयसागर" छापखान्यांत छापिलें.

माझे

सर्व आर्य बंधु व भगिनी

यांस

हें भाषांतर

सादर समर्पण केलें आहे.

भाषांतरकर्ता.

३. सुश्लोक पितर आम्हांस रक्षोत, आणि यज्ञापासून आनंद पावणाऱ्या दोघी देवपुत्र देवी [ आम्हांस रक्षोत ]. हे कल्याणकारक उदार [ देव ] हो, खडकळ जागेंतून रथाला पार पाडिल्याप्रमाणें तुम्ही सर्व संकटांतून आम्हांस पार पाडा.

3. May the fathers, whose praises are sweet to sing, and the two divine parents of the gods who are delighted with the true religion of sacrifice, preserve us. Ye wealth-bestowing good [ gods ], carry us safely through all danger, as a car through a gorge.

आधुनिक काळीं जसें म्हणतात त्याहून वैदिक काळीं म्हणण्यांत कांहीं भेद असे हें उघड आहे.

'आम्हांला सर्व सुखोपभोग देण्यासाठीं'='सर्वतातये.' 'सर्वताति' शब्दाचा अर्थ या मंत्रांत सायणाचार्य 'युद्ध' असा करितात परंतु त्याचे सर्व प्रयोग ऋग्वेदसंहितेंत आलेले पहातां दुसऱ्या ठिकाणीं 'युद्ध' हा अर्थ सायणांनीं केलेला नाहीं. ते 'सकळ इष्टलाभ' असाच बहुतकरून अर्थ करितात आणि क्वचित् यज्ञ असाहि करितात.

३. 'ज्यांचा धांवा करण्यास आवडतो आणि जे धांवा केल्यावरोवर ऐकून येतात ते पितर आणि त्याप्रमाणेंच सकळ देवांचे आईबाप अशा ज्या द्यावापृथिवी 'त्या आमचें संरक्षण करोत,' असा भावार्थ.

'पितर'='पितरः.' म्हणजे जे पुण्यवंत मनुष्य यज्ञ करून म्हणजे भक्तिपूर्वक देवांची सेवा करून देवांचे योग्यतेस पोंहचले ते पूर्वकाळचे मनुष्य ( ऋ. १०. १५. ४ याजवरील सायणभाष्य पहा ) देवांला जसा यज्ञ करून त्यांची सेवा करीत तशीच पितरांची सेवा करण्याचा प्रचार मागाहून पडला. देवांचा धांवा करून रक्षण करण्याविषयीं, संपत्ति देण्याविषयीं आणि पुत्रपौत्र देण्याविषयीं वगैरे प्रार्थना केलेली वेदांत सांपडते तशीच पितरांची केलेली आढळते. ह्या पितरांची आणखी अशी प्रार्थना केलेली असते कीं त्यांणीं देवांला मनुष्यांवर प्रसन्न करावें आणि त्यांजकडून मनुष्यांचें कल्याण करवावें.

'देवपुत्र देवी'='देवपुत्रे देवी.' म्हणजे देव हे ज्यांचे पुत्र होत, त्या देवी ='द्यावापृथिवी', देवांचीं मातापितरें. द्यावापृथिवींला देवांचीं मातापितरें हें विशेषण पुष्कळ ठिकाणीं वेदांत दिलेलें आढळतें. ऋ. १. १५९. १ इत्यादि उदाहरणें आहेत. द्यावापृथिवी म्हणजे पृथिवी आणि द्युलोक. द्युलोक म्हणजे ज्या प्रदेशांत सूर्य, नक्षत्रें, असंख्य कोटि तारे इत्यादि आहेत तो अपरिमेय प्रदे-

**नराशंसं वाजिनं वाजयन्निह क्षयद्वीरं पूषणं सुम्नैरीमहे ।**
**रथं न दुर्गाद्वसवः सुदानवो विश्वस्मान्नो अंहसो निष्पिपर्तन ४**

नराशंसम् । वाजिनम् । वाजयन् । इह । क्षयत्ऽवीरम् । पूषणम् । सुम्नैः । ईमहे ।
रथम् । न । दुःऽगात् । वसवः । सुऽदानवः । विश्वस्मात् । नः । अंहसः । निः । पिपर्तन ॥ ४ ॥

**बृहस्पते सदमिन्नः सुगं कृधि शं योर्यत्ते मनुर्हितं तदीमहे ।**
**रथं न दुर्गाद्वसवः सुदानवो विश्वस्मान्नो अंहसो निष्पिपर्तन ॥५**

बृहस्पते । सदम् । इत् । नः । सुऽगम् । कृधि । शम् । योः । यत् । ते । मनुःऽहितम् । तत् । ईमहे ।
रथम् । न । दुःऽगात् । वसवः । सुऽदानवः । विश्वस्मात् । नः । अंहसः । निः । पिपर्तन ॥ ५ ॥

---

## भाषायाम्.

४. नराशंसं ( =नरैः शंसनीयं=स्तुत्यं ) वाजिनं ( =बलवन्तं ) क्षयद्वीरं ( =वीराणां प्रभवन्तं ) पूषणम् ( =एतन्नामकं देवम् ) इह ( =अत्र काले ) सुम्नैर्वाजयन् ( =सुम्नैः स्तोत्रैर्वाजयन्तः=उपह्वयन्तो ) [ वयम् ] ईमहे ( =याचामहे=अभीष्टं प्रार्थयामहे ) । हे सुदानवः (=शोभनदाना) वसवः (=देवाः), रथं दुर्गात् न ( =रथम् उच्चावचस्थलादिव), नः विश्वस्मात् अंहसः ( =सर्वस्मात् पापात्=भयात् ) निष्पिपर्तन ( =निर्गमय्य पालयत ) ॥

५. हे बृहस्पते ( =ब्रह्मणस्पते ), सदम् इत् ( =सदैव ) नः ( =अस्माकं ) सुगं कृधि ( =सुखं कुरु ) । यत् ते शं योः ( =यत्तव सुखं कल्याणं च ) मनुर्हितं (=मनुष्याणामनुकूलम् ) [ अस्ति ] तत् ईमहे ( =वयं प्रार्थयामहे)। हे सुदानवः ( =शोभनदाना ) वसवः ( =देवाः ), रथं दुर्गात् न ( =रथम् उच्चावचस्थलादिव ), नः विश्वस्मात् अंहसः (=सर्वस्मात् पापात्=भयात्) निष्पिपर्तन (=निर्गमय्य पालयत) ॥

४. बळवान्, वीरांचा प्रभु [ आणि ] मनुष्यांनीं स्तविण्यास योग्य जो पूषा त्याचा स्तोत्रांनीं धांवा करून त्याला आम्ही प्रार्थीत आहों. [ तर ] हे कल्याणकारक उदार [ देव ] हो, खडकाळ जागेंतून रथाला पार पाडिल्याप्रमाणें तुम्ही सर्व संकटांतून आम्हांस पार पाडा.

4. Invoking with hymns Pûshâ the object of men's praise, the mighty, the lord of heroes, we ask [ for his gifts ]. Ye wealth-bestowing good [ gods ], carry us safely through all danger as a car through a gorge.

५. हे बृहस्पती, तूं आम्हांस नित्य सुख दे. मनुष्यांचें हित करणारी जी तुझी कृपा [ आणि ] अनुग्रहबुद्धि ती आम्ही याचितों. [ तर ] हे कल्याणकारक उदार देव हो, खडकाळ जागेंतून रथाला पार पाडिल्याप्रमाणें तुम्ही सर्व संकटांतून आम्हांस पार पाडा.

5, O Bṛihaspati, ever grant us happiness; that favour and blessing of thine which is beneficial unto men, we implore. Ye wealth-bestowing good [ gods ], carry us safely through all danger, as a car through a gorge.

---

श. आणि मित्र, सविता, पूषा इत्यादि सूर्यविभूतिरूप देव, आणि रात्रिरूप जो वरुण देव, अंतरिक्षांत असलेले वायुरूप मरुत्, पाऊस देणार जो इंद्र देव अंतरिक्षांत आपला अधिकार चालवितो, हे आणि इतर देव पृथिवी आणि द्युलोक यांच्यामध्यें पूर्वेकडेस उगवून पश्चिमेकडे जातात म्हणून त्यांला 'द्यावापृथिवींचे पुत्र' म्हणणें यांत कांहीं नवल नाहीं. त्यांला जसें अदितीचे पुत्र म्हणणें सयुक्तिक आहे ( सू. ८९, मं. ३ याजवरील टीप पहा ) तसेंच ते द्यावापृथिवींचे पुत्र होत हेंहि योग्यच आहे.

ह्या मंत्रांत मनुष्यांचे वाडवडील 'पितर,' आणि देवांचे वडील, 'द्यावापृथिवी,' यांस प्रार्थना केली आहे.

---

४. या सूक्ताचे प्रत्येक मंत्रांत निरनिराळ्या देवाचा धांवा केला आहे, त्याप्रमाणें या मंत्रांत 'पूषा' म्हणून जो सूर्यरूपी देव त्याचा धांवा केलेला आहे.

'वीरांचा प्रभु'='क्षयद्वीरम्.' 'क्षि' धातूपासून 'क्षयत्' हें रूप आहे. 'भ-

इन्द्रं कुत्सो वृत्रहणं शचीपतिं काटे निबाळ्ह ऋषिरह्वदूतये ।
रथं न दुर्गाद्वसवः सुदानवो विश्वस्मान्नो अंहसो निष्पिपर्तन ॥६

इन्द्रम् । कुत्सः । वृत्रऽहनम् । शचीऽपतिम् । काटे । निऽबाळ्हः । ऋषिः । अह्वत् । ऊतये ।
रथम् । न । दुःऽगात् । वसवः । सुऽदानवः । विश्वस्मात् । नः । अंहसः । निः । पिपर्तन ॥ ६ ॥

## भाषायाम्.

६. काटे निबाळ्हः (=कूपे निपातितः) कुत्स ऋषिः (=एतन्नामा कविः) वृत्रहणं (=शत्रूणां हन्तारं) शचीपतिं (=पराक्रमकर्मणां पतिम्) इन्द्रम् ऊतये (=रक्षणाय) अह्वत् (=आह्वयत्)। हे सुदानवः (=शोभनदाना) वसवः (=देवाः), रथं दुर्गात् न (=रथम् उच्चावचस्थलादिव), नः विश्वस्मात् अंहसः (=सर्वस्मात् पापात्=भयात्) निष्पिपर्तन (=निर्गमय्य पालयत)॥

रद्वाज' म्हणजे जसा 'अन्न आणणारा' (वाजं भरन्) असा अर्थ आहे, तसा 'क्षयद्वीर' म्हणजे वीरांवर अधिकार चालविणारा (वीरान् क्षयन् ईशानः) असा अर्थ आहे.

'मनुष्यांनीं स्तविण्यास योग्य'='नराशंसम्.' 'नराशंस' हें बहुतकरून अग्नीचें विशेषण असतें. परंतु क्वचित् 'पूषा'चेंहि विशेषण असतें (ऋ. १०. ६४. ३ पहा).

'पूषा' देव हा कोण याविषयीं ४२ वें सूक्त पहा.

५. वरचा मंत्र जसा 'पूषा' देवाविषयीं आहे, तसा हा मंत्र 'बृहस्पति' देवाविषयीं आहे. 'ब्रह्मणस्पति' म्हणून जी स्तोत्राची देवता ती, आणि 'बृहस्पति' हे एकच. सू. ६२ मं. ३, सू. ८९ मं. ६, सू. ९० मं. ९ इत्यादि पहा. सू. १८ मं. ४, सू. ४० मं ३, ५ आणि त्यांजवरील सायणभाष्य पहा.

६. कूपांत पाडिलेला कुत्स ऋषि शत्रुमारक [ आणि ] पराक्रमशाली इन्द्राला साहाय्यासाठीं हाक मारिता झाला. [ तर ] हे कल्याणकारक उदार [ देव ] हो, खडकळ जागेंतून रथाला पार पाडिल्याप्रमाणें तुम्ही सर्व संकटांतून आम्हांस पार पाडा.

6. The sage Kutsa who was thrown into a well, invoked for aid, Indra the killer of enemies and the Lord of exploits. Ye wealth-bestowing good [ gods ], carry us safely through all danger as a car through a gorge.

६. कुत्स ऋषि म्हणजे येथें या सूक्ताचा कर्ता जो कुत्स ऋषि तोच घ्यावयाचा असें दिसतें. परंतु कुत्स कूपांत पडला असतां बाहेर येण्याकरितां हें सूक्त रचिलें असें मात्र दिसत नाहीं, कारण तसें असतें तर त्या गोष्टीला अनुसरून कांहीं तरी संबंध या सूक्ताच्या दुसऱ्या मंत्रांत आला असता, तसा आलेला नाहीं. आणि कुत्स ऋषि कूपांत पडला होता अशी कथा दुसऱ्या सूक्तांत कोठें सांगितलेली प्रसिद्ध नाहीं. कदाचित् कूपांत पडला ह्या शब्दाचा अर्थ अक्षरशः करावयाचा नाहीं, तर संकटांत पडला, दुःखांत सांपडला असा लाक्षणिक घ्यावयाचा असेल काय ?

देवैर्नो देव्यदितिर्नि पातु देवस्त्राता त्रायतामप्रयुच्छन् ।
तन्नो मित्रो वरुणो मामहन्तामदितिः सिन्धुः पृथिवी उत द्यौः ॥
॥ ७ ॥ २४ ॥

देवैः । नः । देवी । अदितिः । नि । पातु । देवः । त्राता । त्रायताम् । अप्रऽयुच्छन् ।
तत् । नः । मित्रः । वरुणः । ममहन्ताम् । अदितिः । सिन्धुः । पृथिवी । उत । द्यौः ॥ ७ ॥ २४ ॥

---

## भाषायाम्.

७. देवैः [ सहिता ] देवी अदितिः ( =एतन्नाम्नी देवानां माता ) नः नि पातु ( =अस्मान् नितरां पालयतु ) । त्राता ( =रक्षिता ) देवः [ सविता ] अप्रयुच्छन् ( =अप्रमाद्यन् ) [ सन् ] [ नः ] त्रायतां ( =पालयतु ) । तत् ( =एतच्च ) मित्रः, वरुणः, अदितिः, सिन्धुः (=समुद्राभिमानिनी देवता ), पृथिवी उत द्यौः ( पृथिवी द्युलोकश्च ) [ इत्येते ] नः ममहन्ताम् ·(=अस्मभ्यम्=अस्मदर्थं पूजयन्तु=ददतु ) ॥

---

७. देवांसहित अदिति देवी आम्हांस रक्षो. तारण करणारा [ सविता ] देव दुर्लक्ष्य न करितां [आमचें] संरक्षण करो. आणि हें दान मित्र, वरुण, अदिति, समुद्र, पृथिवी, आणि द्यु हे आम्हांला देओत.

7. May the goddess Aditi with the gods protect us. May divine[Savitâ], the preserver, save [ us ] without neglect. And may Mitra, Varuṇa, Aditi, the Sea, Earth, and Heaven confirm this unto us.

---

७. येथें या सूक्ताचा उपसंहार झाला. आणि पहिल्या अर्धांत सवित्यास अनुलक्षून प्रार्थना केली आहे. जसा वरचा मंत्र इंद्राविषयीं आहे तसा हा सविता या देवाविषयीं होय, मात्र शेवटीं कुत्स ऋषीच्या चालीप्रमाणें पूर्वीच्या सूक्ताला जोडिलेलें पालवपद येथेंहि जोडिलें आहे.

'तारण करणारा देव' म्हणजे येथें सविता देव समजावयाचा. 'सविता देव' याला 'त्राता देव' म्हणजे तारण करणारा देव असें वेदांत म्हणतात. तसेंच 'भग' या देवतेस सुद्धा 'त्राता देव' असें विशेषण दिलेलें आहे. आणि प्रस्तुत मंत्रांतहि भगच समजल्यास कदाचित् अडचण नाहीं. भगास त्राता म्हटलें आहे याविषयीं ऋ. ३. ५६. ६ आणि ६. ५०. १ हे मंत्र पहा.

## सूक्तम् १०७.

आङ्गिरसः कुत्स ऋषिः । विश्वे देवा देवता । त्रिष्टुप् छन्दः ॥

**यज्ञो देवानां प्रत्येति सुम्नमादित्यासो भवता मृळयन्तः ।**
**आ वोऽर्वाची सुमतिर्ववृत्यादंहोश्चिद्या वरिवोवित्तरासत् ॥ १ ॥**

यज्ञः । देवानाम् । प्रति । एति । सुम्नम् । आदित्यासः । भवत । मृळयन्तः ।
आ । वः । अर्वाची । सुऽमतिः । ववृत्यात् । अंहोः । चित् । या । वरिवोवित्ऽतरा । असत् ॥ १ ॥

**उप नो देवा अवसा गमन्त्वङ्गिरसां सामभिः स्तूयमानाः ।**
**इन्द्र इन्द्रियैर्मरुतो मरुद्भिरादित्यैर्नो अदितिः शर्म यंसत् ॥ २ ॥**

उप । नः । देवाः । अवसा । आ । गमन्तु । अङ्गिरसाम् । सामऽभिः । स्तूयमानाः ।
इन्द्रः । इन्द्रियैः । मरुतः । मरुत्ऽभिः । आदित्यैः । नः । अदितिः । शर्म । यंसत् ॥ २ ॥

---

## भाषायाम्.

१. [ अयं ] यज्ञो देवानां सुम्नं प्रत्येति (=सुखं प्राप्नोतु=तान् सुखिनः करोतु)। [ अपि च ] हे आदित्यासः (=आदित्याः=इन्द्रावरुणादयोदितेः पुत्राः), [ यूयं नः ] मृळयन्तो भवत (=सुखयन्तो भवत)। वः सुमतिः (=युष्माकमनुग्रहात्मिका बुद्धिः) अर्वाची आ ववृत्यात् (=अस्मदभिमुखी सती आगच्छतु) या (=सुमतिः) अंहोश्चित् वरिवोवित्तरा असत् ( =दारिद्र्यहतस्यापि जनस्य अतिशयेन धनदात्री भवेत् ) ॥

अथवा येनागमनेन सा सुमतिर्दरिद्रस्यापि ममातिशयेन धनदात्री भविष्यति सागच्छत्विति योज्यम् ॥

अंहुशब्दं ग्रास्मानादयः दारिद्र्यशब्दसमानार्थकं मन्यन्ते। सायणस्तु दारिद्र्यं प्राप्त इत्यर्थकं मन्यते। इदमेव साधीय इति वयम् ॥

२. अङ्गिरसाम् (=एतन्नामकानाम् अस्मद्रूपाणामुपासकानां) सामभिः (=गायनैः) स्तूयमानाः ( =स्तुता ) देवा अवसा ( =रक्षणेन सह ) उप नः आ गमन्तु ( =अ-

## सूक्त १०७.

ऋषि–कुत्स (पूर्वसूक्ताचा जो तोच). देवता– पूर्वसूक्ताप्रमाणेंच विश्वे देव. वृत्त–त्रिष्टुभ्.

१. [ ह्या ] यज्ञापासून देव आनंद पावोत. हे आदित्य हो, तुम्ही आमचे कल्याणकर्ते व्हा. तुमची कृपा आम्हांकडेस वळो, कीं जी दरिद्री मनुष्यालाहि अतिशय धन देणारी होत असते.

२. [ आम्हां ] अंगिरसांच्या गायनांनीं स्तविलेले जे देव ते रक्षणासहित इकडे येओत. इन्द्र आपल्या मित्रांसहित, मरुत् हे आपल्या मित्रांसहित, [ आणि ] अदिति आदित्यांसहित [ येऊन ] आम्हांला सुख देओत.

## HYMN 107.

To *Vis've Devas* (i. e. *All* the *Gods*). By *Kutsa* of the family of the *Angirases* (author of the previous hymn). Metre—*Trishṭubh.*

1. May [ this ] sacrifice give pleasure to the gods. May ye, Âdityas, become propitious to us. May your favour turn itself towards us, which can be an excellent giver of wealth even to the wretched.

2. Praised by the hymns of the Angirases may the gods come hither with [their] protection. May Indra in concert with those belonging to Indra, the Maruts in concert with those belonging to the Maruts, and Aditi in concert with the Âdityas grant us happiness.

---

१. हेंहि सूक्त कुत्स ऋषीचेंच आहे असें मानितात आणि तें 'विश्वे देव' यांविषयीं आहे. म्हणजे तें एकाच देवतेविषयीं नाहीं, तर त्यांत कितीएक देवांची प्रार्थना आहे.

'आदित्य' म्हणजे 'अदिति' देवीचे पुत्र, हे कोण कोण समजावयाचे त्याविषयीं पूर्वीं आलेंच आहे. त्यांत इंद्र, मित्र, वरुण, पूषा, भग, अर्यमा हे मुख्य देव आहेत.

२. ह्या सूक्ताचा कर्ता, अंगिरस्कुळांतील कुत्स ऋषि एकटाच आहे. तरी तें आपण अंगिरस्कुळांतील कुटुंबांत असलेले सर्व जण मिळून म्हणत आहों असें समजून आंगिरसांच्या (म्हणजे अंगिरस्कुळांत जन्मलेल्या मनुष्यांच्या) या स्तुतीनें स्तुत होत असलेले देव येओत असें ऋषि म्हणतो. आंगिरस

**तन्न इन्द्रस्तद्वरुणस्तदग्निस्तदर्यमा तत्सविता चनो धात् ।**
**तन्नो मित्रो वरुणो मामहन्तामदितिः सिन्धुः पृथिवी उत द्यौः ॥**
**॥ ३ ॥ २९ ॥**

तत् । नः । इन्द्रः । तत् । वरुणः । तत् । अग्निः । तत् । अर्यमा । तत् । सविता । चनः । धात् ।
तत् । नः । मित्रः । वरुणः । ममहन्ताम् । अदितिः । सिन्धुः । पृथिवी । उत । द्यौः ॥ ३ ॥ २९ ॥

स्माकं समीप आगच्छन्तु ) । [ अपि च ] इन्द्रः इन्द्रियैः ( =इन्द्रः स्वभूतैर्मित्रैः सह ), मरुतः मरुद्भिः ( =मरुतो मारुतैः=मरुतो देवाः स्वकीयैर्मित्रैः सह ) [ तथा ] अदितिः आदित्यैः ( =अदितिनाम्नी देवानां माता स्वकीयैः पुत्रैर्मित्रावरुणादिभिः सह ) नः शर्म यंसत् ( =अस्मभ्यं सुखं ददातु ) ॥

## भाषायाम्.

३. तत् ( =अस्मात् कारणात् ) इन्द्रो नः ( =अस्मभ्यं ), तत् (=अस्मात् कारणात् ) वरुणः, तत् ( =अस्मात् कारणात् ) अग्निः, तत् ( =अतः कारणात् ) अर्यमा, तत् ( =अतः कारणात् ) सविता चनो धात् (=अन्नं विदधातु=प्रयच्छतु ) । तत् (=एतच्च ) मित्रः, वरुणः, अदितिः ( एतन्नाम्नी देवानां माता ), सिन्धुः (=समुद्राभिमानिनी देवता ), पृथिवी उत द्यौः (=पृथिवी द्युलोकश्च ) [ इत्येते ] नः ममहन्ताम् (=अस्मभ्यम्=अस्मदर्थं पूजयन्तु=ददतु ) ॥

नांवाचें प्राचीन एक उपासककुळ होय हें वेदांत प्रसिद्ध आहे.

'इंद्र आपल्या मित्रांसहित '=' इन्द्र इन्द्रियैः.' म्हणजे जे देव इंद्राचे बरोबर नित्य असतात आणि त्याजबरोबर जिकडे तिकडे जातात ते. वरुण, मरुत्, इत्यादि देव इंद्राबरोबर नित्य असतात अशी प्रसिद्धि आहे.

३. यास्तव इन्द्र, यास्तव वरुण, यास्तव अग्नि, यास्तव अर्यमा [ आणि ] यास्तवच सविता आम्हांला अन्न देओत. आणि हें दान मित्र, वरुण, अदिति, समुद्र, पृथिवी आणि द्यु आम्हांला देओत.

3. Therefore may Indra, therefore may Varuṇa, therefore may Agni, therefore may Aryamâ, [ and ] therefore may Savitâ grant us food. And may Mitra, Varuṇa, the Sea, Earth and Heaven confirm this unto us.

---

३. 'यास्तव' म्हणजे ह्या प्रकारेंकरून स्तुति केली आहे म्हणून असा अर्थ. उपसंहार करतांना 'तत्' याचा आणि ह्याच अर्थाच्या दुसऱ्या अव्ययांचा प्रयोग वेदांत पुष्कळ आढळतो. त्यांचा अर्थ 'यास्तव,' 'तर आतां,' 'अत एव,' 'तर' इत्यादि शब्दांनीं करावा लागतो.

यांत जे देव आले आहेत त्यांविषयीं पूर्वीं जागजागीं सांगितलेंच आहे.

'आम्हांला अन्न देओत'=' नश्चनो धात्.' 'चनस्' शब्द 'धा' धातूच्या संबंधानेंच येत असतो. आणि त्याचा अर्थ सायणाचार्य सर्वत्र 'अन्न' असाच करितात. हा शब्द आजपर्यंत झालेल्या भाषांतरांत दोन वेळ आला आहे (सू. ३, मं. ६ आणि सू. २६, मं १०) आणि तेथें दुसऱ्या कितीएक पंडितांच्या मतानुसार 'तृप्ति,' 'संतोष' असा केला आहे. परंतु पुनर्विचाराअंतीं सायणांचाच अर्थ विशेष साधार आणि सयुक्तिक दिसतो.

## सूक्तम् १०८.

आङ्गिरसः कुत्स ऋषिः । इद्राग्नी देवता । त्रिष्टुप् छन्दः ॥

**य इन्द्राग्नी चित्रतमो रथो वामभि विश्वानि भुवनानि चष्टे ।**
**तेना यातं सरथं तस्थिवांसाथा सोमस्य पिबतं सुतस्य ॥ १ ॥**

यः । इन्द्राग्नी इति । चित्रऽतमः । रथः । वाम् । अभि । विश्वानि । भुवनानि । चष्टे ।
तेन । आ । यातम् । सऽरथम् । तस्थिऽवांसा । अथ । सोमस्य । पिबतम् । सुतस्य ॥ १ ॥

---

### भाषायाम्.

१. हे इन्द्राग्नी, चित्रतमः ( =अतिशयेन चायनीयः=मनोरमतमो ) यो वां रथो विश्वानि भुवनानि अभिचष्टे ( =सकलानि भूतजातानि आभिमुख्येन पश्यति ) तेन सरथं तस्थिवांसा ( =समानं रथं यथा तथा स्थितवन्तौ युवाम् ) आ यातम् ( =आगच्छतम् ) । अथ ( =अनन्तरं च ) सुतस्य सोमस्य पिबतम् ( =अस्माभिरभिषुतं सोमं भक्षयतम् ) ॥

## सूक्त १०८.

ऋषि—आङ्गिरसकुळांतील कुत्स (पूर्वसूक्ताचा जो तोच). देवता—इन्द्राग्नी (म्हणजे इन्द्र आणि अग्नि हे मिळून). वृत्त—त्रिष्टुभ्.

१. हे इन्द्राग्नी हो, सकळ भुवनें पाहत असतो [असा] जो तुमचा परम सुंदर रथ, त्या एकाच रथांत तुम्ही दोघे बसून या, आणि [हा आम्हीं] काढून ठेविलेला सोमरस प्या.

## HYMN 108.

To *Indra* and *Agni*. By *Kutsa* of the family of the *Angirases*. Metre—*Trishṭubh*.

1. Be seated together, O Indra and Agni, in that your most beautiful chariot which sees all the worlds, and come you hither thereby. And drink of the Soma extracted [for you].

---

१. हेंहि सूक्त कुत्स ऋषीचेंच आहे. आणि इंद्र आणि अग्नि हें जें देवद्वय त्याजविषयीं आहे.

'सकल भुवनें पहात असतो'= 'विश्वानि भुवनानि अभिचष्टे.' म्हणजे ज्या तेजःपुंज रत्नखचित आणि सुवर्णमय रथांत बसून तुम्ही पूर्वेकडून पश्चिमेकडे फिरत असतां त्या रथानें. वेदांतील बहुतकरून सर्व देव रथांत बसून सूर्याप्रमाणें भ्रमण करणारे होत असें मानिलेलें आढळतें. त्याचें कारण असें आहे कीं, ते देव म्हणजे बहुशः सूर्यादिक जे पूर्वेपासून पश्चिमेकडेस जात असणारे सृष्ट पदार्थ तद्रूपच आहेत. आणि तशा प्रकारचे जे नाहींत असें असतांहि ते सुद्धा रथांत बसून फिरतात असें जें आलें आहे, त्याचें कारण इतकेंच आहे कीं सविता, इंद्र, वरुण इत्यादि देवांविषयींची जी वर्णन करण्याची चाल पडली तिच्याप्रमाणेंच या दुसऱ्या देवांविषयीं बोलूं लागले म्हणून सर्वच रथांत बसून भ्रमण करितात असें समजण्याचा प्रघात पडला.

**यावदिदं भुवनं विश्वमस्त्युरुव्यचा वरिमता गभीरम् ।**
**तावाँ अयं पातवे सोमो अस्त्वरमिन्द्राग्नी मनसे युवभ्याम् ॥ २ ॥**

यावत् । इदम् । भुवनम् । विश्वम् । अस्ति । उरुऽव्यचा । वरिमता । गभीरम् ।
तावान् । अयम् । पातवे । सोमः । अस्तु । अरम् । इन्द्राग्नी इति । मनसे । युवऽभ्याम् ॥ २ ॥

**चक्राथे हि सध्र्य१ङ्नाम भद्रं सध्रीचीना वृत्रहणा उत स्थः ।**
**ताविन्द्राग्नी सध्र्यञ्चा निषद्या वृष्णः सोमस्य वृषणा वृषेथाम् ३**

चक्राथे इति । हि । सध्र्यक् । नाम । भद्रम् । सध्रीचीना । वृत्रऽहनौ । उत । स्थः ।
तौ । इन्द्राग्नी इति । सध्र्यञ्चा । निऽसद्य । वृष्णः । सोमस्य । वृषणा । आ । वृषेथाम् ॥ ३ ॥

---

## भाषायाम्.

२. इदं विश्वं भुवनम् (=इदं सकलं जगद्) यावद् अस्ति (=यत्प्रमाणं भवति) उरुव्यचा वरिमता (=विस्तीर्णव्यापकेन वरिम्णा उरुत्वेन=विस्तीर्णेनोरुत्वेन) [यावद्] गभीरम् (=अगाधं) [चास्ति] तावान् (=तत्प्रमाणः) अयं सोमः पातवे अस्तु (=अयमस्माभिः समर्प्यमाणः सोमो युवयोः पानाय भवतु), [अपि च स] हे इन्द्राग्नी, युवभ्यां (=युवाभ्यां) मनसे अरम् (=अन्तःकरणाय पर्याप्तो भवतु=युवयोर्मनसोन्विच्छं पर्याप्तो भवतु) ॥

३. हि (=यस्मात् कारणात्) [युवां युवयोर्] भद्रं नाम (=कल्याणं नामधेयं) सध्र्यक् चक्राथे (=संगतम्=इन्द्राग्नी इति द्वन्द्वरूपेण वर्तमानं कृतवन्तौ स्थः) उत (=अपि च) हे वृत्रहणौ (=वृत्रघ्नौ=वृत्रस्य हन्तारौ), सध्रीचीना स्थः (=सध्रीचीनौ=सह गच्छन्तौ भवथः)। तौ हे इन्द्राग्नी (=तौ युवां हे इन्द्राग्नी=अतः कारणात् हे इन्द्राग्नी, युवां) सध्र्यञ्चा निषद्य (=संगतावेव बर्हिष्युपविश्य) हे वृषणा (=वृषणौ=सेचनसमर्थौ=सामर्थ्योपेतौ), वृष्णः सोमस्य (=सामर्थ्योपेतस्य सोमस्य=तादृशं सोमम्) आ वृषेथाम् (=स्वकीय उदरं आसिञ्चेथाम्) ॥

२. हें सकल भुवन जेवढें [ आणि ] विस्तीर्ण विशाळतेनें जितकें खोल आहे, तितका हा सोमरस [तुमच्या] प्राशनार्थ होओ. हे इन्द्राग्नी, तो तुमच्या मनाला पुरण्यासारिखा होओ.

३. कारण कीं तुम्हीं [ आपलें ] कल्याणकारक नांव जुळें केलें आहे, आणि हे वृत्रनाशक हो, तुम्ही दोघे मिळून जोडी आहां. तर हे इन्द्राग्नी हो, तुम्ही जोडीनें बसून, हे वीर्यवंत देव हो, हा वीर्यवंत सोम [ आपल्या पोटांत ] ओतून घ्या.

2. As great as is all this universe [ and ] deep with its vast extension, so much may this Soma be [ for you ] to drink; may it, O Indra and Agni, be agreeable to your desire.

3. For you have associated your blessed names in one name; and, O killers of Vṛitra, you are associated together. Sit down, therefore, you Indra and Agni, as associated together, and pour down, you strong ones, the strong Soma [into your stomachs.]

---

२. मंत्राचें तात्पर्य असें आहे कीं, 'हा आम्हीं अर्पिलेला सोम थोडा आहे, तरी हें सकल भुवन जितकें लांब, रुंद आणि खोल आहे तितका हा सोम होओ आणि तुम्हांस संतृप्त करो.'

या ऋचेवरून असें समजावयाचें आहे असें वाटतें कीं, 'आपण देवांला थोडासाच जरी सोम अर्पण केला तरी आपला भाव आणि भक्ति यांस पाहून देव तो पुष्कळ आहे असें समजून स्वीकारून घेतात, अथवा आपल्या प्रभावानें तो जितका पाहिजे तितका वाढवितात,' अशी ऋषीची समजूत आहे.

'विशाळतेनें'=' वरिमता.' 'वरिमन्' हें नाम आणि 'उरूव्यच्' हें या मंत्रांत विशेषण होय. 'वरिमन्' हें 'उरु' या विशेषणापासून भावार्थी नाम होय.–'प्राशनार्थ,' तुम्हांस पिण्याला.

३. भावार्थः–' हे इंद्राग्नी हो, तुम्हीं आपलें कल्याणकारक 'इंद्राग्नी' हें नांव जुळें म्हणजे 'इंद्र आणि अग्नि' या दोहोंचें मिळून 'इंद्राग्नी' असें केलें आहे. आणि तुम्हां दोघांला मिळून लोक एकत्र एका नांवानें बोलावितात, आणि तुम्ही वृत्रहननादिक जे पराक्रम तेहि एकत्रच करितां. तर या आमच्या यज्ञांत तुम्ही एकत्र बसून सामर्थ्यवान् असे जे तुम्ही ते हा आमचा सामर्थ्यवान् सोम पिऊन टाका.'

'जुळें केलें आहे' म्ह० 'इन्द्र'

समिद्धेष्वग्निष्वानजाना यतस्रुचा बर्हिरु तिस्तिराणा ।
तीव्रैः सोमैः परिषिक्तेभिरर्वागेन्द्राग्नी सौमनसाय यातम् ॥ ४ ॥

सम्ऽइद्धेषु । अग्निषु । आनजाना । यतऽस्रुचा । बर्हिः । ऊम् इति । तिस्तिराणा ।
तीव्रैः । सोमैः । परिऽसिक्तेभिः । अर्वाक् । आ । इन्द्राग्नी इति । सौमनसाय । यातम् ॥ ४ ॥

## भाषायाम्.

४. अग्निषु समिद्धेषु (=सम्यक् प्रदीप्तेषु सत्सु) आनजाना (=आनजानौ=अज्यमानौ=हविःसेचनेन व्यज्यमानौ) यतस्रुचा (=यतस्रुचौ=ययोरर्थे स्रुचः प्रयताः सन्ति तादृशौ) उ (=उत=अपि च) बर्हिः तिस्तिराणा (=बर्हिः तिस्तिराणौ=बर्हिर्याभ्यामास्तीर्णमस्ति तादृशौ युवां) तीव्रैः (=सत्वरं मादकारिभिः) परिषिक्तेभिः (=पात्रेषु स्थापितैः) सोमैः (=सोमरसैः=एतादृशान् सोमान् दृष्ट्वा) हे इन्द्राग्नी, [युवां] सौमनसाय (=अस्मान्प्रति सुमनसौ भवितुम्=अनुग्रहं कर्तुम्) अर्वाक् आ यातम् (=अस्मदभिमुखं यथा तथागच्छतम्) ॥

हे इन्द्राग्नी, युवयोरर्थेऽग्निं प्रदीप्य घृतप्रोक्षणं कृतमस्ति, स्रुचः प्रयताः सन्ति बर्हिश्च आस्तीर्णमस्ति इमे च शीघ्रमादकारिणः सोमा युवयोरर्थे पात्रेषु प्रसिक्ताः सन्ति। अतः कारणात् एतत् सर्वं दृष्ट्वा युवामायातम् आगत्य च अस्मान्प्रत्यनुग्रहं कुरुतमिति भावगतमृषेः ॥

आणि 'अग्नि' असें न म्हणतां 'इन्द्राग्नी' असें लोक म्हणतात.(जसें 'सूर्याचन्द्रमसौ,' 'मातापितरौ,' 'अग्नीषोमौ,' 'इन्द्रावरुणौ' इत्यादि).

'जोडी आहां' म्हणजे तुमचें नांव 'इन्द्राग्नी' असें लोक एकत्र घेतात व तुम्ही एकत्र राहतां व एकत्र येतां इत्यादि.

'वृत्रनाशक.' हें येथें दोघांचेंहि विशेषण आहे हें लक्ष्यांत ठेविलें पाहिजे. बहुतकरून वृत्रनाशक म्हणजे वृत्रघ्न हें विशेषण जरी इंद्राला लाविलेलें आढळतें, तथापि केव्हां केव्हां दुसऱ्या देवांलाहि लाविलेलें असतें. येथें तर इंद्राच्या साहचर्यानें अग्नीलाहि लागलें आहे यांत नवल नाहींच.

'वीर्यवंत सोम'=' वृष्णः सोमस्य.' म्हणजे जो प्राशन केल्यानें प्राशन करणाऱ्याचे आंगीं अतिशय शक्ति येते तो. सोमप्राशनानें मोठें बळ प्राप्त होतें याविषयीं पूर्वी पुष्कळ ठिकाणीं सांगितलेंच आहे.

४. हे अग्नि प्रदीप्त केले आहेत, हें तुम्हांसाठीं घृत शिंपडलें आहे, ह्या पळ्या तुम्हांकरितां आम्हीं पुढें सरसावीत आहों, आणि हे दर्भ तुम्हांसाठीं हांथरले आहेत. तर सत्वर माद उत्पन्न करणारे जे हे सोमरस तुम्हांसाठीं आम्ही पात्रांत ओतीत आहों त्यांच्या योगानें, हे इन्द्राग्नी हो, तुम्ही या आणि आम्हांला प्रसन्न व्हा.

4. The fires being kindled, may you, O Indra and Agni, who are embellished, to whom the sacrificial ladles are held forth, and for whom the kus'a grass is spread out, come hither by means of the quickly intoxicating Soma-libations poured out, and be gracious to us.

४ भावार्थः–'हे इंद्राग्नी, तुम्हांसाठीं अग्नि आम्हीं प्रदीप्त करून तूप शिंपडलें आहे, आणि तुम्हांसाठीं दर्भ हांथरले आहेत आणि पळींत घालून हवि अग्नींत टाकीत आहों. आणि हे लवकर अंमल आणणारे सोमरस अनेक पात्रांत तुम्हांसाठीं ओतीत आहों, तर हें सर्व पाहून तुम्ही आम्हांप्रत या आणि आम्हांला प्रसन्न व्हा.

'घृत शिंपडलें आहे'='आनजाना' =' आनजानौ.' कर्मणि आत्मनेपद. अक्षरशः 'आनजाना' याचा अर्थ 'घृत ज्यांच्या साठीं शिंपडलें आहे असे [ इन्द्राग्नी ].' 'सुशोभित केलेले' असाहि अर्थ होईल.

'पळ्या तुम्हांकरितां आम्ही पुढें सरसावीत आहों'='यतस्रुचौ.' बहुव्रीहि. ज्यांच्या साठीं स्रुचा पुढें केल्या आहेत ते.

'तुम्हांसाठीं दर्भ हांथरले आहेत'= 'बर्हिः तिस्तिराणा'. तिस्तिराणा=तिस्तिराणौ. कर्मणि आत्मनेपद.

'आणि आम्हांला प्रसन्न व्हा'= 'सौमनसाय.' या शब्दाचा अक्षरशः अर्थ 'प्रसन्नतेसाठीं,' 'प्रसादासाठीं' असा होतो.

यानी॑न्द्राग्नी च॒क्रथु॑र्वी॒र्या॑णि॒ यानि॑ रू॒पाण्यु॒त वृष्ण्या॑नि ।
या वां॑ प्र॒त्नानि॑ स॒ख्या शि॒वानि॒ तेभि॒: सोम॑स्य पिबतं सु॒तस्य॑ ॥
॥ ५ ॥ २६ ॥

यानि॑ । इ॒न्द्रा॒ग्नी॒ इति॑ । च॒क्रथु॑: । वी॒र्या॑णि । यानि॑ । रू॒पाणि॑ । उ॒त । वृष्ण्या॑नि ।
या । वा॒म् । प्र॒त्नानि॑ । स॒ख्या । शि॒वानि॑ । तेभि॑: । सोम॑स्य । पि॒ब॒त॒म् । सु॒तस्य॑ ॥ ५ ॥ २६ ॥

यदब्र॑वं प्रथ॒मं वां॑ वृणा॒नो॒३॑ऽयं सोमो॒ असु॑रैर्नो वि॒हव्य॑: ।
तां स॒त्यां श्र॒द्धाम॒भ्या हि या॒तमथा॒ सोम॑स्य पिबतं सु॒तस्य॑ ॥६॥

यत् । अब्र॑वम् । प्र॒थ॒मम् । वा॒म् । वृ॒णा॒नः । अ॒यम् । सोम॑: । असु॑रैः । न॒: । वि॒ऽहव्य॑: ।
ताम् । स॒त्याम् । श्र॒द्धाम् । अ॒भि । आ । हि । या॒त॒म् । अथ॑ । सोम॑स्य । पि॒ब॒त॒म् । सु॒तस्य॑ ॥ ६ ॥

---

## भाषायाम्.

५. हे इन्द्राग्नी, यानि वीर्याणि ( =वृत्रवधादिरूपाणि ) यानि रूपाणि ( =निरूप्यमाणानि प्राणिनामुत्पत्त्यादीन्याश्चर्याणि ) उत वृष्ण्यानि ( =बलपूर्णानि कृत्यानि ) चक्रथुः ( =कृतवन्तौ स्थः ) [ अपि च ] या ( =यानि ) वां ( =युवयोः ) प्रत्नानि शिवानि सख्या ( =पुरातनानि कल्याणानि सख्यानि=सखित्वानि ) [ सन्ति ] तेभिः ( =तैः सह आगत्य ) [ युवां ] सुतस्य सोमस्य पिबतम् ( =अभिषुतमिमं सोमं भक्षयतम् ) ॥

६. वां वृणानः ( =युवां संभजनार्थं गृह्णानः ) [ अहम् ] अयम् ( =अस्माभिरभिषूयमाणः ) सोमः ( =सोमरसो ) नः असुरैः ( =अस्माकमृत्विग्भिः ) विहव्यः ( =विशेषेण होतव्यो=विशेषेणार्पयितव्यो ) [ भवतीति ] यत् प्रथमम् अब्रवं (=यदवदं) तां सत्यां श्रद्धां (="श्रद्धया=आदरातिशयेन कृतामुक्तिम्" ) अभि[लक्ष्य] आ यातं हि (=आगच्छतं खलु) । अथ (=अनन्तरं) सुतस्य (=अभिषुतस्य) सोमस्य ( =सोमं ) पिबतम् ॥

५. हे इन्द्राग्नी हो, तुम्हीं जे [ पूर्वी ] पराक्रम, जे चमत्कार [ आणि ] पुरुषार्थ केले आहेत, [ आणि ] तुमचीं जीं प्राचीन काळचीं कल्याणकारक सख्यें, त्यांसहित [येऊन] [हा] सिद्ध केलेला सोमरस प्या.

5. O Indra and Agni, with those exploits, miracles and acts of bravery which you have performed [ before ], and with your beneficent friendly offices of former times, [ come hither and ] drink of [this] Soma extracted [ for you ].

६. तुम्हां दोघांला निवडून मी जें [ आदरपूर्वक ] प्रथम बोललों [ कीं ] हा सोमरस आमच्या ऋत्विजांनीं तुम्हांस अर्पण करावयाचा, त्या [ माझ्या ] खऱ्या आदराकडे लक्ष्य देऊन तुम्ही दोघेहि या आणि [हा] सिद्ध केलेला सोमरस प्या.

6. As selecting you two [ for worship ] I promised at first that this [ our ] Soma should be offered to you by our priests, so having regard to that true, faithful and hospitable promise, come ye both and drink of [this] Soma extracted [ for you ].

---

५. मंत्राचें तात्पर्य असें दिसतें कीं, 'आम्हीं तयार केलेला सोमरस प्या, आणि तुम्हीं जे पराक्रम आणि मोठमोठीं कृत्यें पूर्वींच्या काळीं केलीं आणि जी तुम्ही पूर्वी उपासकाशीं मैत्री करीत होतां ती आतां आमच्याशीं करा.

'पराक्रम' म्ह० वृत्रवधादि, असें सायणाचार्य म्हणतात तें बरोबर आहे.

'चमत्कार'='रूपाणि.' ( सायणाचार्यांच्या म्हणण्याप्रमाणें ) गाई, घोडे इत्यादिकांस निर्माण केलें तीं कृत्यें. 'सख्यें' म्ह० स्नेह, मैत्रीभाव.

या मंत्रावरून वेदमंत्रांचे कर्ते जे कुत्स ऋषीसारखे कवि ते आपणापूर्वी कांहीं काळ होऊन गेला आणि आपण आलोकडे झालों आहों असें समजत असत हें उघड होतें. जर आपण अनादि आहों आणि आपलीं सूक्तेंहि अनादि आहेत असें ते मानिते, तर इंद्राग्नीनें पूर्वी पराक्रम केले त्यांसहित आतां त्यांनीं यावें अशी प्रार्थना या मंत्रांत आली नसती.

६. भावार्थः—' हे इंद्राग्नी, या उपासनेच्या आरंभीं मी म्हटलें कीं आम्हीं तयार केलेला हा उत्तम सोम तुम्हांस अर्पण करावयाचा आहे. असें जें आम्हीं मोठ्या आदरानें आणि प्रेमानें म्हटलें त्याजकडेस चित्त देऊन तुम्ही या आणि हा आमचा सोमरस प्या.'

**यदिन्द्राग्नी मदथः स्वे दुरोणे यद्ब्रह्मणि राजनि वा यजत्रा ।**
**अतः परि वृषणावा हि यातमथा सोमस्य पिबतं सुतस्य ॥ ७ ॥**

यत् । इन्द्राग्नी इति । मदथः । स्वे । दुरोणे । यत् । ब्रह्मणि । राज-
नि । वा । यजत्रा ।
अतः । परि । वृषणौ । आ । हि । यातम् । अथ । सोमस्य । पिब-
तम् । सुतस्य ॥ ७ ॥

---

## भाषायाम्.

७. हे इन्द्राग्नी, यद् (=यद्यपि) [युवां] स्वे दुरोणे (=स्वकीये गृहे) मद-
थः (=हृष्यथः=सोमपानेन हृष्टौ भवथः), यद् (=यद्यपि) ब्रह्मणि (=ब्राह्मणस्य
गृहे) [यद्] वा (=अथवा यद्यपि) हे यजत्रा (=यजत्रौ=पूजनीयौ), राजनि (=रा-
ज्ञः क्षत्रियस्य गृहे) [मदथः सोमपानेन हृष्टौ भवथः] अतः परि (=तस्मात्स्थला-
त्) हे वृषणौ (=वीर्यवन्तौ देवौ), [युवाम्] आ यातं हि (=आगच्छतं खलु)
अथ (=अपि च) सुतस्य (=अभिषुतस्य) सोमस्य (=अभिषुतं सोमं) पिबतम् ॥
स्वगृहे ब्राह्मणस्य गृहे वा क्षत्रियस्य वा गृहे उत्कृष्टतमं सोमं पिबन्तावपि तानि
सर्वाणि स्थलानि त्यक्त्वास्माकं गृहं प्रत्यागच्छतमस्माकमेव सोमं पिबतं चेति भावः ॥

---

'तुम्हां दोघांला निवडून '=' वां वृ-
णानः.' म्हणजे सर्व देवतांत तुम्हां दो-
घांस पूज्य दैवत असें समजून तुमचें
आवाहन करून. 'कीं हा सोमरस आम-
च्या ऋत्विजांनीं तुम्हांस अर्पण करा-
वयाचा '=' अयं सोमः असुरैः नः वि-
हव्यः.' हें वाक्य कठिण आहे. यांत
'असुरैः' या शब्दाचा साधारण अर्थ
'देव' हा जो वेदांत येतो तो येथें घ्या-
वयाचा नाहीं, 'ऋत्विज' असा करावा
लागतो. कसेंहि असलें तरी प्रथम चर-
णांत 'यद् अब्रवम्' असें जें आहे
त्याचें कर्म 'अयं सोमः' इत्यादि द्वितीय
चरण होय यांत आम्हांस संशय दिसत
नाहीं.

'आणि हा सिद्ध केलेला सोमरस
प्या '=' अथा सोमस्य पिबतं सुतस्य.'
हे शब्द पालवपदाप्रमाणें पुढें सूक्ताचे
शेवटापर्यंत येत जातील.

७. हे इन्द्राग्नी हो, तुम्ही जरी आपल्या घरीं आनंद करीत असाल, जरी ब्राह्मणाच्या येथें अथवा, हे पूजनीय देव हो, राजाच्या येथें [ आनंद करीत असाल ] तरी, हे वीर्यवंत [देव] हो, तुम्ही तेथून या, आणि [हा] सिद्ध केलेला सोमरस प्या.

7. Whether, O Indra and Agni, you are enjoying yourselves in your home, whether with a Brâhmaṇ or, you worshipful ones, with a king, come hither thence, you mighty gods, and drink of the Soma extracted [ for you ].

---

७. मंत्राचें तात्पर्य असें आहे कीं, इंद्राग्नी हे आपल्या घरीं अथवा एकाद्या ब्राह्मणाच्या घरीं किंवा कोणा एकाद्या क्षत्रियाच्या घरीं, म्हणजे या तिहींतून कोणत्याहि ठिकाणीं असले. तरी, त्यांणीं मंत्रकर्त्याचा सोम पिण्यास तेथून यावें.

या मंत्रांत ब्राह्मण आणि क्षत्रिय यांचा उच्चार करून त्यांमध्यें परस्पर थोडा भेद दर्शविला आहे. पण वैश्य आणि शूद्र यांचा उच्चार नाहीं. आणि ब्राह्मण व क्षत्रिय यांजमधील भेद तरी यावरून समजतच नाहीं. मात्र ते वेगवेगळे होते इतकें दिसून येतें.

देवांची उपासना करण्याच्या कामीं, म्हणजे सूक्तें वगैरे रचण्याच्या कामीं जे कुशळ ते ब्राह्मण, आणि राज्य करण्यांत जे गुंतलेले ते क्षत्रिय, इतकाच भेद विवक्षित दिसतो. राजे, आणि जे राजे नव्हेत ते, इतकाच भेद म्हटला तरी चालेल. ब्राह्मण म्हणजे केवळ ब्राह्मणकुळांत जन्म घेतल्यानेंच ब्राह्मण, अथवा राजाच्या कुळांत जन्म घेतल्यानेंच राजा अथवा क्षत्रिय होतो, मग राज्य असो नसो, असा अर्थ 'ब्रह्म' (=ब्राह्मण) आणि 'राजा' (=क्षत्रिय) या शब्दांचा वेदांत होत नाहीं. याला एक प्रमाण असें आहे कीं, 'राजा' हा जो क्षत्रियवाचक शब्द वेदांत आहे त्याचा अर्थ वेदांत नित्य 'राज्य करणारा,' म्हणजे खरोखर 'राज्य करण्याच्या कामीं गुंतलेला' असाच होतो, केवळ राजाचे कुळांत जन्मलेला असा होत नाहीं. 'राजा' शब्द पुष्कळ ठिकाणीं आला आहे, पण राज्यहीन राजकुळांत जन्मलेला मनुष्य असा अर्थ होत नाहीं.

'आनंद करीत असाल'=' मदथः.' म्हणजे सोम पिऊन चैन करीत असाल.

'सिद्ध केलेला सोम'=' सुतस्य सोमस्य.' म्हणजे नुस्ती सोमवल्ली नव्हे, तर त्यापासून गाळून काढलेला सोमरस असा अर्थ आहे.

'ब्राह्मणाच्या येथें' आणि 'राजाच्या येथें' या अर्थीं 'ब्रह्मणि' आणि

**यदिन्द्राग्नी यदुषु तुर्वशेषु यद्द्रुह्युष्वनुषु पूरुषु स्थः ।**
**अतः परि वृषणावा हि यातमथा सोमस्य पिबतं सुतस्य ॥ ८ ॥**

यत् । इन्द्राग्नी इति । यदुषु । तुर्वशेषु । यत् । द्रुह्युषु । अनुषु । पूरुषु । स्थः ।
अतः । परि । वृषणौ । आ । हि । यातम् । अथ । सोमस्य । पिबतम् । सुतस्य ॥ ८ ॥

---

## भाषायाम्.

८. हे इन्द्राग्नी, यद् (=यद्यपि) यदुषु (=एतन्नामकानां मनुष्याणां गृहे), तुर्वशेषु (=एतन्नामकानां मनुष्याणां गृहे), यद् (=यद्यपि) द्रुह्युषु (=एतन्नामकानां मनुष्याणां गृहे) अनुषु (=एतन्नामकानां मनुष्याणां गृहे) [यद् वा] पूरुषु (=एतन्नामकानां मनुष्याणां गृहे) [युवां] स्थः (=भवथः), अतः परि (=तेभ्यः स्थलेभ्यः) हे वृषणौ (=वीर्यवन्तौ देवौ), [युवाम्] आ यातं हि (=आगच्छतं खलु) अथ (=अपि च) सुतस्य (=अभिषुतस्य) सोमस्य (=अभिषुतं सोमं) पिबतम् ॥

---

'राजनि' हीं सप्तमीचीं रूपें योजिलीं आहेत तिकडेस लक्ष्य देण्यासारिखें आहे. पुढच्या मंत्रांतहि 'यदुषु,' 'तुर्वशेषु,' 'द्रुह्युषु,' 'अनुषु,' 'पूरुषु,' हीं सप्तमीचीं रूपें याच अर्थी आहेत. वेदांत 'अमुका-च्या घरीं,' 'अमुक मनुष्याच्या येथें' असें म्हणावयाचें असलें तर 'घर' अशा अर्थाचें पद घालावयास नको. त्या मनुष्याचें नांव सप्तम्यंत केलें म्हणजे पुरे.

८. हे इन्द्राग्नी हो, तुम्ही जरी यदूंच्या घरीं अथवा तुर्वशांच्या घरीं, तुम्ही जरी द्रुह्यूंच्या घरीं किंवा अनूंच्या [ अथवा ] पूरूंच्या घरीं असलां तरी, हे वीर्यवंत देव हो, तुम्ही तेथून या आणि [हा] सिद्ध केलेला सोमरस प्या.

8. Whether, O Indra and Agni, you be with the Yadus, with the Turvas'as, whether with the Druhyus, with the Anus [or] with the Pûrus, come hither thence, you mighty gods, and drink of the Soma extracted [ for you ].

---

८. 'यदु' इ०. यदु, तुर्वश, द्रुह्यु, अनु आणि पूरु हीं त्या त्या नांवाच्या लोकांचीं नांवें आहेत. यदुकुळ, तुर्वशकुळ, इत्यादि. या पांचहि कुळांचीं नांवें येथें दिलेलीं पुराणांत व महाभारतांत आढळतात तींच हीं आहेत यांत संशय नाहीं.

'यदूंच्या घरीं.' म्हणजे यदु म्हणून जो एक प्रसिद्ध उपासक होऊन गेला त्याच्या वंशजांच्या येथें. त्याप्रमाणें 'तुर्वशांच्या घरीं' म्हणजेहि तुर्वश नांवाचा जो प्रसिद्ध भक्त होऊन गेला त्याच्या वंशजांच्या येथें. 'यदु' आणि 'तुर्वश' हे कोण होते त्याविषयीं सू. ३६, मं. १८ आणि त्याजवरील आमच्या टिपा पहा.

'द्रुह्यूंच्या घरीं'='द्रुह्युषु.' म्हणजे द्रुह्यु नांवाचा एक मनुष्य, त्याच्या वंशजांच्या येथें. 'द्रुह्यु' हा कोण होता याविषयीं विशेष इतिहास टाऊक नाहीं. ऋ. ७. १८. १२ यांत द्रुह्युला इन्द्रानें पाण्यांत बुडविलें असें सांगितलें आहे. ऋ. ८. १०. ५ यांत अशी देवांला अशी प्रार्थना आहे कीं ते द्रुह्यूच्या, अनूच्या, तुर्वशाच्या अथवा यदूच्या घरीं असले तरी तेथून यावें. दुसऱ्या एका मंत्रांत (ऋ. ८. १०. ५) द्रुह्यूच्या आंगीं अथवा पूरूच्या आंगीं जें बळ असेल तें आपणास देण्याविषयीं इंद्राला एका उपासकानें प्रार्थना केली आहे. ह्या दोन मंत्रांवरून 'द्रुह्यु' हा भक्त असे असें दिसतें. प्रथम सांगितलेल्या मंत्राप्रमाणें दुसऱ्या एका मंत्रांत (ऋ. ७. १८. १४ यांत) असें सांगितलें आहे कीं इंद्रभक्त जो प्रख्यात सुदास त्याजबरोबर लढून सहा हजार सहाशें सहासष्ट अनूच्या कुळांतील आणि द्रुह्यूच्या कुळांतील वीर पडून मेले, ( निगव्यवोऽनवो द्रुह्यवश्च षष्टिः शता सुषुपुः षट् सहस्रा । षष्टिर्वीरासः अधि षट् दुवोयु ). यावरून 'द्रुह्यु' आणि त्याचे वीर हे प्रथम इंद्राचे भक्त नसून शत्रु असत, परंतु मागाहून ते भक्तांमध्यें दाखल झाले असें दिसतें.

'अनूंच्या घरीं'='अनुषु.' म्हणजे अनूचे जे वंशज अथवा अनुयायी, त्यांच्या येथें. 'अनु' याजविषयीं ऋ-

**यदिन्द्राग्नी अवमस्यां पृथिव्यां मध्यमस्यां परमस्यामुत स्थः ।**
**अतः परि वृषणावा हि यातमथा सोमस्य पिबतं सुतस्य ॥ ९ ॥**

यत् । इन्द्राग्नी इति । अवमस्याम् । पृथिव्याम् । मध्यमस्याम् । परमस्याम् । उत । स्थः ।
अतः । परि । वृषणौ । आ । हि । यातम् । अथ । सोमस्य । पिबतम् । सुतस्य ॥ ९ ॥

---

## भाषायाम्.

९. हे इन्द्राग्नी, यद् ( =यद्यपि ) [ युवाम् ] अवमस्यां ( =संनिकृष्टायामस्यां ) पृथिव्यां ( =विस्तीर्णे लोके ) [ स्थः ] मध्यमस्यां [ पृथिव्याम् ] ( =" अन्तरिक्षलोके " ) उत ( =अथवा ) परमस्यां [ पृथिव्याम् ] ( =उत्कृष्टे लोके=" द्युलोके " ) स्थः ( =वर्तेथे), अतः परि ( =तस्मात् स्थलात् ) हे वृषणौ ( =वीर्यवन्तौ देवौ ), [ युवाम् ] आ यातं हि ( =आगच्छतं खलु ) अथ ( =अपि च ) सुतस्य ( =अभिषुतस्य ) सोमस्य ( =अभिषुतं सोमं ) पिबतम् ॥

---

ग्वेदांत जें सांगितलें आहे तें येणेंप्रमाणें:– अश्वी देवांची एका मंत्रांत ( ऋ. ८. १०. ५ यांत ) अशी प्रार्थना केली आहे कीं त्यांनीं अनूच्या येथून निघून यावें. ऋ. ७. १८. १४ या मंत्रांत अनूच्या कुळांतील वीर सुदासाबरोबर लढून मेले असें वरच्या टिपेंत सांगितलेंच आहे. 'याशिवाय अनु अथवा अनूचे वंशज यांविषयीं कांहीं सांगितलेलें नाहीं. कितीएक पाश्चिमात्य विद्वान् अनु म्हणून एक अनार्य कुळांतील मनुष्य आणि 'अनवः' म्हणजे अनार्य जनांचें एक कुळ असा अर्थ करितात, पण त्याला काय आधार आहे तें समजत नाहीं.

'पूरूच्या घरीं'=' पूरुषु.' वर ऋ. ६. ४६. ८ या मंत्रांतून पूरूच्या आंगीं आहे तसलें बळ मला दे असें जें उतरून घेतलें आहे त्याशिवाय ' पूरु ' या उपासकाविषयीं अथवा त्याच्या वंशजांविषयीं किंवा अनुयायींविषयीं कांहीं इतिहास टाऊक नाहीं.

९. हे इन्द्राग्नी हो, तुम्ही जरी विस्तीर्ण भुवनाच्या अधोभागीं, मध्यभागीं अथवा शिरोभागीं असलां तरी, हे वीर्यवंत देव हो, तुम्ही तेथून या, आणि [हा] सिद्ध केलेला सोमरस प्या.

9. Whether, O Indra and Agni, you be in the nethermost, in the middle or in the highest world, come hither thence, you mighty gods, and drink of the Soma extracted [ for you ].

---

९. ' विस्तीर्ण जें हें त्रिभुवन त्याच्या कोणत्याहि भागांत तुम्ही असलां तरी तेथून निघून या आणि आमचा हा सोमरस प्या.'

'विस्तीर्ण भुवनाच्या अधोभागीं'= ' अवमस्यां पृथिव्याम्.' म्हणजे या भूलोकावर. सायणाचार्य म्हणतात कीं, 'पृथिवी' असा जो या मंत्रांत शब्द आहे तो 'लोक' अशा अर्थी आहे, केवळ पृथिवीलोक या अर्थी नाहीं. आणि तसेंच विवक्षित दिसतें खरें. भुवनाचा अधोभाग म्हणजे पृथिवी, मध्यभाग म्हणजे अंतरिक्ष आणि शिरोभाग म्हणजे द्युलोक अथवा स्वर्ग असा भावार्थ आहे.

**यदि॑न्द्राग्नी पर॒मस्यां॑ पृथि॒व्यां म॑ध्य॒मस्या॑मव॒मस्या॑मु॒त स्थः ।**
**अत॒: परि॑ वृषणा॒वा हि या॒तमथा॒ सोम॑स्य पिबतं सु॒तस्य॑ ॥१०॥**

यत् । इ॒न्द्रा॒ग्नी इति॑ । प॒र॒मस्या॑म् । पृ॒थि॒व्याम् । म॒ध्य॒मस्या॑म् । अ॒व॒म-स्या॑म् । उ॒त । स्थः ।
अत॑: । परि॑ । वृ॒ष॒णौ॒ । आ । हि । या॒तम् । अथ॑ । सोम॑स्य । पि॒ब॒-त॒म् । सु॒तस्य॑ ॥ १० ॥

**यदि॑न्द्राग्नी दि॒वि ष्ठो यत्पृ॑थि॒व्यां यत्पर्व॑ते॒ष्वोष॑धीष्व॒प्सु ।**
**अत॒: परि॑ वृषणा॒वा हि या॒तमथा॒ सोम॑स्य पिबतं सु॒तस्य॑ ॥ ११ ॥**

यत् । इ॒न्द्रा॒ग्नी इति॑ । दि॒वि । स्थः । यत् । पृ॒थि॒व्याम् । यत् । पर्व॑तेषु । ओष॑धीषु । अ॒प्ऽसु ।
अत॑: । परि॑ । वृ॒ष॒णौ॒ । आ । हि । या॒तम् । अथ॑ । सोम॑स्य । पि॒ब॒-त॒म् । सु॒तस्य॑ ॥ ११ ॥

---

## भाषायाम्.

१०. अत्र सायणः । पूर्ववद्व्याख्येयम् । एतावांस्तु विशेषः । पूर्वं भूम्यादिषु त्रिषु लोकेषु याविन्द्राग्नी तावागच्छतमित्युक्तम् । इदानीं तु द्युप्रभृतिष्ववरोहक्रमेण वर्तमानेषु त्रिषु लोकेषु याविन्द्राग्नी वर्तेते तावागच्छतामिति प्रार्थ्यत इति ॥

११. हे इन्द्राग्नी, यद् ( यद्यपि ) दिवि स्थः ( =द्युलोके भवथः ) यत् पृथिव्यां ( =यद्यपि भूलोके ) [ भवथः] यत् पर्वतेषु ( =यद्यपि मेघेषु=मेघोपलक्षितेषु आन्तरिक्षेषु प्रदेशेषु ) [ अथवा ] ओषधीषु अप्सु ( =तिलमाषव्रीह्यादिषु उदकेषु च ) [ स्थः ] [ तदपि ] अतः परि (=तस्मात् स्थलात् ) हे वृषणौ ( =वीर्यवन्तौ देवौ), आ यातं हि ( =आगच्छतं खलु ) अथ ( =अपि च ) सुतस्य सोमस्य ( =अस्माभिरभिषुतस्य सोमरसस्य=इमम् अभिषुतं सोमं ) पिबतम् ॥

१०. हे इन्द्राग्नी हो, तुम्ही जरी विस्तीर्ण भुवनाच्या शिरोभागीं, मध्यभागीं अथवा अधोभागीं असाल तरी, हे वीर्यवंत देव हो, तुम्ही तेथून या, आणि [हा] सिद्ध केलेला सोमरस प्या.

११. हे इन्द्राग्नी हो, तुम्ही जरी द्युलोकीं असाल, जरी पृथिवीवर, जरी पर्वतांत, वनस्पतींत अथवा उदकांत [असाल तरी], हे वीर्यवंत देव हो, तुम्ही तेथून या, आणि [हा] सिद्ध केलेला सोमरस प्या.

10. Whether, Indra and Agni, you be in the highest, in the middle or in the nethermost world, come hither thence, you mighty gods, and drink of the Soma extracted [ for you ].

11. Whether, Indra and Agni, you be in Heaven, whether on earth, whether in mountains, in plants or in waters, come hither thence, you mighty gods, and drink of the Soma extracted [ for you ].

---

१०. वरच्या ऋचेंत आणि या ऋचेंत भेद नाहीं, मात्र वरचींत पृथिवी, अंतरिक्ष आणि द्युलोक असा क्रम आहे, आणि यांत द्युलोक, अंतरिक्ष आणि पृथिवी असा उलट क्रम आहे. प्रार्थना एकच.

११. या ऋचेंतहि वरच्याप्रमाणेंच, इंद्र आणि अग्नि हे जेथें असतील तेथून त्यांनीं येण्याविषयीं प्रार्थना आहे.

‘ पर्वतांत ’=‘ पर्वतेषु.’ म्हणजे पर्वतासारिखे दिसणारे जे मेघ ते ज्यांत असतात असे अंतरिक्षांचे प्रदेश त्यांत.

यदिन्द्राग्नी उदिता सूर्यस्य मध्ये दिवः स्वधया मादयेथे ।
अतः परि वृषणावा हि यातमथा सोमस्य पिबतं सुतस्य ॥१२॥

यत् । इन्द्राग्नी इति । उत्ऽइता । सूर्यस्य । मध्ये । दिवः । स्वधया । मादयेथे इति ।

अतः । परि । वृषणौ । आ । हि । यातम् । अथ । सोमस्य । पिबतम् । सुतस्य ॥ १२ ॥

एवेन्द्राग्नी पपिवांसा सुतस्य विश्वास्मभ्यं सं जयतं धनानि ।
तन्नो मित्रो वरुणो मामहन्तामदितिः सिन्धुः पृथिवी उत द्यौः ॥ ॥ १३ ॥ २७ ॥

एव । इन्द्राग्नी इति । पपिऽवांसा । सुतस्य । विश्वा । अस्मभ्यम् । सम् । जयतम् । धनानि ।

तत् । नः । मित्रः । वरुणः । ममहन्ताम् । अदितिः । सिन्धुः । पृथिवी । उत । द्यौः ॥ १३ ॥ २७ ॥

---

## भाषायाम्.

१२. हे इन्द्राग्नी, यत् ( =यद्यपि ) [ युवां ] सूर्यस्य उदिता ( =सूर्यस्योदितौ= सूर्यस्योदये=सूर्यस्योदयाचले ) दिवो मध्ये (=द्युलोकस्य मध्यस्थाने ) [ वा ] स्वधया मादयेथे (= "हविर्लक्षणेन अन्नेन तृप्तौ भवथः") [तदपि] अतः परि (=तस्य स्थानस्य सकाशात् ) हे वृषणौ ( =वीर्यवन्तौ देवौ ), आ यातं हि (=आगच्छतं खलु ) अथ ( =अपि च ) सुतस्य सोमस्य (=अस्माभिरभिषुतस्य सोमरसस्य=इममभिषुतं सोमं ) पिबतम् ॥

'स्वधया मादयेथे' इत्यत्र तु पाश्चिमात्याः सायणमुज्झित्वा 'यथेच्छं सुखिनौ भवथः' इति भाष्यमिच्छन्ति । दृष्टेषु पुनः सर्वेषु स्वधयारूपयुक्तेषु मन्त्रान्तरेषु पाश्चिमात्यानां व्याख्यानं नालमाधारबद्धमिति भातीति कृत्वा वरं सायणस्यैवानुसरणमिति वयम् ॥

१३. हे इन्द्राग्नी, एव ( =एवं=पूर्वोक्तप्रकारेण ) सुतस्य पपिवांसा ( =अभिषुतस्य सोमस्य=सोमरसं पपिवांसौ=पीतवन्तौ ) [ युवाम् ] अस्मभ्यम् ( =अस्मदर्थं ),

१२. हे इन्द्राग्नी हो, तुम्ही जरी सूर्योदय होतो त्या स्थळीं [ अथवा ] द्युलोकाच्या मध्यभागीं हवि भक्षण करून सुख पावत असाल तरी, हे वीर्यवंत देव हो, तुम्ही तेथून या, आणि [हा] सिद्ध केलेला सोमरस प्या.

१३. या प्रकारेंकरून सोमरस पिऊन, हे इन्द्राग्नी हो, तुम्ही आम्हांला सर्व प्रकारचीं धनें जिंकून द्या. आणि हें मित्र, वरुण, अदिति, समुद्र, पृथिवी आणि द्यु हे आम्हांस दान देओत.

12. Whether, O Indra and Agni, you be enjoying offerings where the sun rises, or in the middle of heaven, come hither thence you mighty gods, and drink of the Soma extracted [ for you ].

13. Thus having drunk of the Soma, conquer for us, O Indra and Agni, all kinds of booties. And may Mitra, Varuṇa, Aditi, the Sea, Earth and Heaven grant this unto us.

---

१२. यांत अशी प्रार्थना आहे कीं ‘ इंद्राग्नी उदयाचळीं असोत अथवा द्युलोकाच्या मध्यभागीं असोत, तेथून त्यांनीं येऊन आमचा सोमरस प्यावा.’

‘ सूर्योदय होतो त्या स्थळीं ’=‘उदिता सूर्यस्य.’ उदिता हें रूप उदितौ या सप्तमीच्या अर्थी येथें घातलें आहे.

‘ हवि भक्षण करून सुख पावत असाल ’=‘ स्वधया मादयेथे.’ याचा अर्थ कितीएक पाश्चिमात्य विद्वान् ‘ इच्छेप्रमाणें आनंद पावत असाल ’ असा करितात. पण ‘ स्वधया ’ हें रूप ‘ मद् ’ धातूच्या रूपाशीं संबद्ध योजिलेलें ज्या ज्या मंत्रांत आढळतें ते सर्व मंत्र वाचून पाहतां सायणाचा अर्थ सोडण्यास सबळ कारण दिसून येत नाहीं, यास्तव आम्हीं सायणांस अनुसरून येथें अर्थ केला आहे.

१३. येथें या सूक्ताचा उपसंहार झाला. ऋषि म्हणतो, ‘ हे इंद्राग्नी हो, या प्रकारेंकरून आम्हीं तुमची स्तुति करून तुम्हांला सोमरस अर्पण केला आहे तो तुम्ही प्या आणि आम्हांवर प्रसन्न व्हा, आणि लढाईच्या प्रत्येक प्रसंगीं आम्हांस जय देऊन आमच्या शत्रूचीं अनेक प्रकारचीं धनें आमच्या हातीं येतील असें करा. आणि हें जें आतां आम्हीं वरप्रदान मागितलें तें मित्र, वरुण, अदिति, सिंधु, पृथिवी, आणि द्युलोक हे आम्हांला देओत.’

कुत्स ऋषीचें हें एक सूक्त येथें संपलें. यावरून पाहतां प्राचीन जे आपले

## सूक्तम् १०९.

आङ्गिरसः कुत्स ऋषिः । इन्द्राग्नी देवता । त्रिष्टुप छन्दः ।

**वि ह्यख्यं मनसा वस्य इच्छन्निन्द्राग्नी ज्ञास उत वा सजातान् ।**
**नान्या युवत्प्रमतिरस्ति मह्यं स वां धियं वाजयन्तीमतक्षम् ॥ १॥**

वि । हि । अख्यम् । मनसा । वस्यः । इच्छन् । इन्द्राग्नी इति । ज्ञासः । उत । वा । सऽजातान् ।

न । अन्या । युवत् । प्रऽमतिः । अस्ति । मह्यम् । सः । वाम् । धियम् । वाजऽयन्तीम् । अतक्षम् ॥ १ ॥

---

विश्वा धनानि (=सर्वाणि धनानि) सं जयतं (=सम्यग् जयतं=युद्धे शत्रून् जित्वा तेभ्यो हरतम्)। तद् (=एतच्च यदस्माभिः प्रार्थितं तत्) नः (=अस्मभ्यं) मित्रः, वरुणः, अदितिः (=एतन्नाम्नी देवानां माता) सिन्धुः (=समुद्राभिमानिनी देवता) पृथिवी उत द्यौः (=द्युलोकश्च) मामहन्तां (=पूजयन्तु=ददतु)॥

---

### भाषायाम्.

१. हे इन्द्राग्नी, वस्यः इच्छन्=(वसीयो वाञ्छन् =अतिशयेन प्रशस्तं धनमिच्छन्) [अहं] मनसा (=बुद्ध्या=निश्चयेन) [युवां] ज्ञासः उत वा सजातान् (=ज्ञातीन् अथवा बान्धवान्=ज्ञातिरूपेण बान्धवरूपेण वा) व्यख्यं हि (=व्यज्ञासिषं=जानामि)। मह्यं (=ममार्थे) युवत् अन्या (=युवयोरपेक्षयान्या) प्रमतिः (=प्रकृष्टा मतिर्यस्याः सा देवता) नास्ति। सः (=एतादृशः) [अहं] वाजयन्तीम् (=अन्नमिच्छन्तीं) वां (=युवयोः संबन्धिनीं) धियं (=स्तुतिम्) अतक्षम् (=अकरवम्)॥

---

आर्य पूर्वज ते कसे होते, ते देवांची उपासना कशी करीत तें दिसून येतें; म्हणजे ते घंटा वगैरे वाजवून मूर्तींतील देवास जागृत न करितां, आणि अभिषेक न करितां, आणि षोडशोपचारांची पूजाहि न करितां, केवळ ऋचांच्या योगानें स्तुति करून सोम अर्पण करीत. ते पुष्कळ देवांस अथवा अनेक दिव्य विभूतींस भजत, पण त्यांच्या ते मूर्ति करीत नसत.

## सूक्त १०९.

ऋषि—आंगिरसकुळांतील पुरुष कुत्स. देवता—इन्द्राग्नी. वृत्त—त्रिष्टुभ्.

१. हे इन्द्राग्नी हो, उत्तम धनाची मला इच्छा झाली म्हणजे मी [ तुम्हांस] मनापासून [माझे ] नातलग अथवा बांधव असें मानीत असतों. तुम्हांशिवाय माझी काळजी करणारा दुसरा कोणी नाहीं. म्हणून मी [हें] धनाची इच्छा करणारें स्तोत्र तुम्हांसाठीं रचिलें आहे.

## HYMN 109.

To *Indra and Agni*. By *Kutsa* of the family of Angiras. Metre—*Trishtubh.*

1. When longing for the highest good, I sincerely regard you, O Indra and Agni, [ as my ] kinsmen and brothers. There is no patron for me other than you. I have, therefore, made for you [this] prayer which longs for riches.

---

१. हेंहि सूक्त कुत्स ऋषीनेंच केलेलें असून इंद्राग्नी या देवांच्या पूर्वोक्त जोडप्याविषयीं आहे. यांत ऋषि म्हणतो, 'हे इंद्राग्नी हो, उत्तम वस्तूचा लाभ मला व्हावा अशी जेव्हां मला वांछा होते, तेव्हां तिजला पूर्ण करणारे तुम्हांशिवाय दुसरे कोणी नाहींत, म्हणून तुम्हांलाच मी आपले आप्त इष्ट असें समजतों; कारण कीं मुलाची इच्छा पूर्ण करणारे आईबाप तुम्हांशिवाय मला दुसरे कोणी नाहींत. कां तर माझ्या कल्याणाची इच्छा करणार तुम्हांशिवाय दुसरा कोणी नाहीं. यास्तव धनाच्या इच्छेनें हें स्तोत्र तुमच्याच नांवानें रचिलें आहे.'

'उत्तम धनाची इच्छा झाली म्हणजे मी '=' वस्यः इच्छन्.' अक्षरशः अर्थ 'फार चांगल्या द्रव्याची इच्छा करणारा [ मी ]' असा आहे.

'काळजी करणारा '=' प्रमतिः.' ऋ. १०. १००. ५ इत्यादि मंत्रांवरील सायणभाष्यावरून आम्हीं येथें केलेला अर्थ सिद्ध होतो. ऋ. १. २९. २ याजवरीलहि भाष्य पहा.

'रचिलें आहे '=' अतक्षम्.' या शब्दावरून ही ऋचा फारच मोठ्या महत्वाची आहे. ऋषि 'हें स्तोत्र माझ्या दृष्टीस पडलें ' असें म्हणत नाहीं, मी 'रचिलें ' असें स्पष्ट म्हणत आहे. यावरून तो आपलीं सूक्तें ईश्वरप्रणीत आहेत असें समजत नाहीं, तर आपणच तीं केलीं आहेत असें स्पष्ट सांगतो. 'अतक्षम्,' या पदाचा अर्थ 'मी केलें'

**अश्रवं हि भूरिदावत्तरा वां विजामातुरुत वा घा स्यालात् ।**
**अथा सोमस्य प्रयती युवभ्यामिन्द्राग्नी स्तोमं जनयामि नव्यम् २**

अश्रवम् । हि । भूरिदावत्ऽतरा । वाम् । विऽजामातुः । उत । वा । घ । स्यालात् ।
अथ । सोमस्य । प्रऽयती । युवऽभ्याम् । इन्द्राग्नी इति । स्तोमम् । जनयामि । नव्यम् ॥ २ ॥

## भाषायाम्.

२. हि (=यस्मात् कारणात्) वां (=युवां ) विजामातुः (=गुणहीनजामातुरपि ) उत वा घ स्यालात् (=अथवा कन्याभ्रातुरपि ) भूरिदावत्तरा ( =अतिशयेन धनस्य दातारौ ) अश्रवम् ( =अशृणवम्=श्रुतवानस्मि=यद् धनं गुणरहितो जामाता ददाति यद्वा कन्याया भ्राता ददाति तस्मादपि युवाम् अधिकं प्रयच्छथ इति शृणोमि )। अथ ( =अतः कारणात् ) हे इन्द्राग्नी, सोमस्य प्रयती ( =सोमरसस्य प्रयत्या= प्रदानेन=सोममर्पयित्वा) युवभ्यां ( =युवाभ्यां=युवयोरर्थे ) नव्यं स्तोमम् (=अभिनवं स्तोत्रम्=एतत्सूक्तरूपं ) जनयामि ( =रचयामि ) ॥

विजामातुः इत्यत्र श्रुताभिरूप्यादिभिर्गुणैर्विहीनो जामाता यथा कन्यावते बहु धनं प्रयच्छति कन्यालाभार्थं ततोप्यतिशयेन दाताराविन्द्राग्नी इत्यर्थः । ......स्यालः कन्याभ्राता स यथा भगिनीप्रीत्यर्थं बहु धनं प्रयच्छति ततोप्यतिशयेन दाताराविन्द्राग्नी इति सायणः ॥

असा सायणांनींहि स्पष्ट केला आहे (' अकार्ष '). ' तक्ष् ' म्हणजे ' तासणें;' त्यावरून सुतार जसा लाकूड तासून कांहीं तरी वस्तु उत्पन्न करितो तसें कांहीं तरी उत्पन्न करणें, रचणें असा अर्थ होतो. मी जें हें सूक्त रचिलें आहे तें देवांस मान्य होओ अशीं वाक्यें ऋग्वेदांत पुष्कळ सांपडतात, परंतु हें ईश्वरप्रणीत स्तोत्र माझ्या दृष्टीस पडलें असें कोठें सांगितलेलें नाहीं. यावरून प्राचीन ऋषि वेदसूक्तें रचीत नसत, वेदसूक्तें कोणीं रचिलेलीं नव्हत, तीं ईश्वरप्रणीत होत आणि ऋषि केवळ त्यांचे द्रष्टे होत, म्हणजे ऋषींच्या दृष्टीस मात्र तीं पडत असत, असें जें समजतात तें निराधार आहे, असें म्हणण्यास कांहीं अडचण दिसत नाहीं.

२. कारण कीं तुम्ही गुणहीन जांवयापेक्षां आणि मेहुण्यापेक्षांहि मोठे द्रव्यदाते आहां असें मी ऐकिलें आहे. म्हणून तुम्हांस सोम अर्पण करून, हे इन्द्राग्नी हो, हें नवें स्तोत्र मी तुम्हांसाठीं रचीत आहें.

2. For I have heard you are more liberal givers than a deficient son-in-law or the brother of a bride. Hence together with an offering of Soma, I compose, O Indra and Agni, a new hymn for you.

२. 'हे इंद्राग्नी हो, एकादा कुरूप अथवा म्हातारा मनुष्य बायकोच्या आप्तांला पुष्कळ धन देऊन बायको करितो त्यापेक्षांहि तुम्ही पुष्कळ द्रव्य देणारे आहां, आणि एकादा मनुष्य आपल्या कुरूप बहिणीसाटीं पुष्कळ धन देऊन तिला चांगल्या स्थळीं देतो त्यापेक्षांहि पुष्कळ धन देणारे आहां. यास्तव तुम्ही मला धन द्यावें म्हणून मी तुम्हांला सोमरस अर्पण करून हें अगदी नवें स्तोत्र तुम्हांप्रीत्यर्थ रचीत आहें.' 'पुष्कळ धन' म्हणजे बायकोसाटीं किती रुपये बायकोच्या बापाला वगैरे द्यावयाचे याविषयीं कल्पना करणें कठिण नाहीं. सांप्रतकाळींहि असे म्हातारे भाट्ये आणि वाणी लोक पुष्कळ आहेत कीं ज्यांणीं आपल्या बायकोकरितां पंचवीस हजार आणि तीस हजार रुपये दिलेले आहेत.

'जांवयापेक्षां आणि मेहुण्यापेक्षां.' म्ह. लग्नाच्या वेळीं जांवई नवरीच्या बापास अथवा ( बाप नसेल तेव्हां ) नवरीमुलीच्या भावास जो पैसा देतो त्यापेक्षांहि इन्द्राग्नी आपल्या भजकांस अधिक द्रव्य देतात. 'मेहुण्यापेक्षां' या अर्थाचा शब्द मूळांत 'स्यालात्' असा आहे. तेव्हां 'साला' हा जो पोराटोराच्या तोंडांतला शब्द तो किती पुरातन आहे पहा !

'सोम अर्पण करून' = 'सोमस्य प्रयती.' 'प्रयति' म्ह. 'देणें,' 'अर्पण.' येथें 'प्रयती' ही तृतीया आहे. आम्हीं येथें केलेला अर्थ सायणाला व यास्काला अनुसरून आहे. या मंत्रावरून उघड होतें कीं वैदिक युगांत बाप आपल्या मुलीचे आणि भाऊ आपल्या बहिणीचे फारच पैसे घेत असत; म्हणजे लोक आपल्या मुली आणि बहिणी पुष्कळ द्रव्य घेऊन वाईट अथवा म्हाताऱ्या मनुष्यास देत असत. आणि हें ज्यापेक्षां निर्विवाद आहे, त्यापेक्षां कृतयुगादिक जीं पुरातन युगें त्यांत सर्व लोक पुण्याचरणकर्ते असत आणि कलियुगींच मात्र पापकर्ते आहेत ह्या आधुनिक समजुतीस कांहीं आधार नाहीं असें होतें.

'मेहुण्यापेक्षां' = 'स्यालात्.' स्याल म्हणजे मुलीचा भाऊ, तो जसा मुलगी वाईट असली म्हणजे तिला नवरा मिळावा म्हणून पुष्कळ द्रव्य लग्नसमयीं देतो त्यापेक्षां असा अर्थ. यावरून

मा छेद्म रश्मीँरिति नाधमानाः पितॄणां शक्तीरनुयच्छमानाः ।
इन्द्राग्निभ्यां कं वृषणो मदन्ति ता ह्यद्री धिषणाया उपस्थे ॥३॥

मा । छेद्म । रश्मीन् । इति । नाधमानाः । पितॄणाम् । शक्तीः । अनुऽयच्छमानाः ।
इन्द्राग्निऽभ्याम् । कम् । वृषणः । मदन्ति । ता । हि । अद्री इति । धिषणायाः । उपऽस्थे ॥ ३ ॥

---

## भाषायाम्.

३. रश्मीन् मा छेद्मेति (=पुत्रपौत्रादिसंततिरूपं रश्मिं वयं मा विच्छिन्नं कुर्म इति =वयमेव यस्यान्तस्तथास्माकं कुलं मा भूदिति ) नाधमानाः ( =नाथमानाः=याचमानाः ) [अपि च] पितॄणां शक्तीः अनुयच्छमानाः ( =स्वकीयानां पितॄणां वीर्याणि संततानि कुर्वन्तः=स्वपितॄणां कुलं पुत्रपौत्रादीनां जननेन प्रवर्धयितुमिच्छन्तः ) [ पुरुषा ] इन्द्राग्निभ्यां कम् ( =इन्द्राग्न्योरेवार्थे ) वृषणः मदन्ति ( =वीर्यवतो=बलवतः सोमरसान् स्तुवन्ति=सोममभिषूय प्रकृष्टोयं सोमः पीयतां भो इन्द्राग्नी इति तं प्रशंसन्ति )। अद्री ( =" शत्रून् विदारयन्तौ " ) ता ( =तौ ) [ इन्द्राग्नी ] धिषणाया उपस्थे ( =अधिषवणचर्मणः समीपे ) [ सोमपानार्थं ] [ भवन्ति ] ॥

सायणस्त्वेवं व्याख्यातवान् । रश्मीन् रश्मिशब्दो रज्जुवाची । यथा रश्मयो दीर्घा अविच्छिन्ना भवन्ति । एवमविच्छिन्नान्पुत्रपौत्रादीन् मा छेद्म । मा विच्छिन्नान्कुर्मेति बुद्ध्या नाधमाना इन्द्राग्न्योः सकाशात्तथाविधान्पुत्रादीन्याचमानाः । तदनन्तरं पितॄणां शक्तीः शक्त्युत्पादकान्वीर्योत्पादकांस्तान्पुत्रादीननुयच्छमाना अनुक्रमेण नियतान् कुर्वन्तो वृषणः सेक्तारः पुत्रोत्पादनसमर्थाः । सपत्नीका इत्यर्थः । एवंभूता यजमाना इन्द्राग्निभ्यां कं सुखं यथा भवति तथा मदन्ति । स्तुवन्ति । हि यस्मादद्री शत्रून्दृणन्तौ हिंसन्तौ विदारयन्तौ ताविन्द्राग्नी धिषणायाः स्तुत्या उपस्थ उपस्थाने समीपे भवतः । तस्मात् तत्सांनिध्याय स्तुवन्तीति भावः । यद्वा निपातानामनेकार्थत्वात् हि शब्दो यदेत्यर्थः । यदा ताविन्द्राग्नी उद्दिश्याद्री अभिषवसाधनभूता ग्रावाणो धिषणाया उपस्थे । धिषणाधिषवणचर्म । तस्योपरिष्टादिन्द्राग्न्यर्थं सोममभिषुण्वन्ति । तदा तदा यजमानाः स्तुवन्तीति योजनीयम् ॥

३. आपणाकडून [ संततीच्या ] दोऱ्या न तुटोत अशी प्रार्थना करणारे [ आणि ] [ आपल्या ] वाडवडिलांच्या अवलादीची पुढें वृद्धि करूं इच्छिणारे [ जन ] इंद्र आणि अग्नि यांच्या करितां वीर्यवन्त [सोमरस] [ काढून ] त्यांची प्रशंसा करीत असतात. कारण कीं ते दोघेहि शूर [ देव ] सोमचर्माजवळ [उभे राहत असतात].

3. Those that pray that they may not break the continuity of their descent [and] who desire to perpetuate the puissance of their fathers, offer to Indra and Agni manly Soma with praises of it. For the two great [ gods ] are ever present near the Soma-receiving skin.

---

वरदक्षिणा पुष्कळ देण्याचीहि चाल पूर्वीं असे असें सिद्ध होतें.

'नवें स्तोत्र रचितों '=' नव्यं स्तोमं जनयामि.' यावरून हे वेदमंत्र अनादि नाहींत, तर हे ह्यांच्या कर्त्यांनें नवीन रचिले आहेत असें त्यांचे कर्ते ऋषीच कबूल करितात असें झालें. पुरातन काळचे ऋषि जुनीं दुसऱ्यांनीं केलेलीं सूक्तें म्हणून ' ब्रह्मकर्म ' करीत नसत, तर नवीं नवीं सूक्तें रचून तीं आराध्य देवतांस अर्पण करीत.

---

३. भावार्थः—'आपला वंश खुंटूं नये, तर पुत्रपौत्रादि संतति उत्पन्न होऊन पुढें सतत चालावा, अशा प्रार्थना करणारे जे लोक असतात ते इंद्र आणि अग्नि या देवांलाच भजून त्यांजकरितां वीर्यशक्तीनें परिपूर्ण असा सोमरस काढितात आणि त्या सोमरसाची त्या देवांसमक्ष प्रशंसा करितात; कारण कीं अशी प्रशंसा केली म्हणजे इंद्र आणि अग्नि हे देव सोमरसाच्या समीप प्राप्त होतात.' हें आमच्या भाषांतराचें तात्पर्य आहे. सायणाचार्य किंचित् निराळा अर्थ करितात तो भाषेंत उतरून घेतला आहे तो पहा.

एकंदरींत हा मंत्र कठिण आहे. 'रश्मीन्, शक्तोः, अनुयच्छमानाः, वृषणः, मदन्ति आणि अद्री,' यांतून प्रत्येक शब्दाच्या संबंधानें कांहींना कांहीं तरी काठिन्य आहे. परंतु पहिले दोन चरण पुढच्या दोहोंपेक्षां कांहीं सोपे आहेत.

' आपणाकडून संततीच्या दोऱ्या न तुटोत'=' मा छेद्म रश्मीन्.' म्हणजे आपलें जें कुळ तीच कोणी एक दोरी तिचा शेवट आमच्या पुढें नाहीं असें

**युवाभ्यां देवी धिषणा मदायेन्द्राग्नी सोममुशती सुनोति ।**
**तावश्विना भद्रहस्ता सुपाणी आ धावतं मधुना पृङ्क्तमप्सु ॥ ४ ॥**

युवाभ्याम् । देवी । धिषणा । मदाय । इन्द्राग्नी इति । सोमम् । उशती । सुनोति ।

तौ । अश्विना । भद्रऽहस्ता । सुपाणी इति सुऽपाणी । आ । धावतम् । मधुना । पृङ्क्तम् । अप्ऽसु ॥ ४ ॥

---

## भाषायाम्.

४. हे इन्द्राग्नी, युवाभ्यां मदाय (=युवयोरर्थे हर्षाय=युवयोर्हर्षाय) देवी धिषणा (=वाग्देवी=मन्त्ररूपा देवी) उशती (=युवां कामयमाना) सोमं सुनोति (=अभिषुणोति)। तौ (=एतादृशौ युवां=याभ्यां धिषणा सोममभिषुणोति तादृशौ युवाम्=अतः कारणाद् युवां) हे अश्विना (=अश्विनौ=आरूढाश्वौ) भद्रहस्ता (=वरदहस्तौ) सुपाणी (=शोभनपाणी) [इन्द्राग्नी], मधुना आ धावतं (=मधु=माधुर्यं गृहीत्वा शीघ्रमागच्छतं) [तच्च माधुर्यम्] अप्सु (=वसतीवरीषु) पृङ्क्तं (=ताभिः संयोजयतं=तासु स्थापयतम्)॥

अथवा तावश्विना भद्रहस्ता सुपाणी इत्यत्र अश्विनावेव देवौ भवताम् अश्विनौ हि यज्ञं सोमं वा मधुना पृङ्क्त इति श्रूयते मन्त्रान्तरेभ्यः॥

---

होऊं नये; आमच्या पुढेंहि पुत्रपौत्राच्या द्वारें वंशाची दोरी चालू असावी, तुटूं नये असें तात्पर्य.

'वाडवडिलांच्या अवलादीची पुढें वृद्धि करूं इच्छिणारे'=' पितॄणां शक्तीः अनुयच्छमानाः.' अक्षरशः अर्थ 'वडिलांचीं वीर्यें पुढें लांबविणारे.'

'वीर्यवन्त सोमरस'='वृषणः'. म्हणजे जो प्याल्यानें आंगीं सामर्थ्य येतें.

'वीर्यवान् सोमरस काढून त्याची प्रशंसा करितात'='वृषणः मदन्ति.' अक्षरशः अर्थ वीर्यवन्त [सोमरसांतें] स्तवितात; म्हणजे सोमरस काढून 'हा सोमरस उत्तम आहे तर हे इंद्राग्नी हो, हा तुम्ही प्या' अशी त्याची प्रशंसा करितात.

'शूर'='अद्री.' हा अर्थ सायणांस अनुरून केला आहे. परंतु त्याविषयीं सायणाचार्यांसहि संशय आहे असें त्यांच्या भाष्यावरून दिसून येतें.

'सोमचर्माजवळ'='धिषणायाः उपस्थे.' 'धिषणा' म्हणजे ज्या चामड्यांत सोमरस काढीत असत तें.

या ऋचेचा अर्थ करितांना आम्ही बहुतकरून सायणाचार्यांसच अनुसरलों आहों.

४. हे इन्द्राग्नी हो, तुम्हांला [ सोमपानापासून ] आनंद प्राप्त व्हावा म्हणून धिषणा देवी प्रीतीनें तुम्हांसाठीं सोमरस काढिते. तर हे अश्वारूढ [ इन्द्राग्नी ] हो, हे सुबाहू [ इन्द्राग्नी ] हो, हे वरदहस्त [ इन्द्राग्नी ] हो, तुम्ही माधुर्य घेऊन धांवत या, [आणि तें ] सोमोदकांत घाला.

4. O Indra and Agni, for your pleasure the goddess Dhishanâ, is lovingly pressing out the Soma. Therefore, come you both running, mounted on horses, you possessed of excellent arms, and possessed of liberal palms, bring sweetness with you, [ and ] mix [ it ] with the Soma-juice.

---

४. भावार्थः—' हे इंद्राग्नी हो, तुम्हीं सोम पिऊन आनंदी व्हावें म्हणून धिषणा देवी ( म्हणजे ही जी आमची उपासना तीच कोणी एक देवी ) मोठ्या प्रीतीनें तुम्हांसाठीं सोमरस काढीत आहे. तर तुम्ही धांवत या, आणि हा आमच्या उपासनारूप देवीनें तयार केलेला सोम गोड करा.'

' धिषणा देवी '=' देवी धिषणा.' ' धिषणा ' शब्दाचा मूळ अर्थ ' स्तुति ' अथवा ' सोमाहुति ' किंवा ' सोमपात्र.' त्यावरून ( म्हणजे उपासनेचा मुख्य प्रकार स्तुति अथवा सोम अर्पण करीत असत हाच असल्यावरून ) ' धिषणा' म्हणजे 'स्तुतिरूप देवी' असा अर्थ होऊं लागला. आणि वेदांत ज्या लहान लहान देवी सांगितल्या आहेत त्यांजपैकीं ' धिषणा देवी ' हीहि एक झाली आहे. हिला सायणाचार्यांच्या भाष्यांत ' माध्यमिका वाक् ' असें नांव आहे. सू. ९६, मं. १ याजवरील आमची टीप पहा.

' प्रीतीनें '=' उशती. ' अक्षरशः अर्थ, ' प्रीति करणारी अशी होत्साती ' असा आहे. म्हणजे, जशी एकादी स्त्री एकाद्या पाहुण्याकरितां कांहीं पक्वान्न प्रीतीनें सिद्ध करिते तशी.

' हे अश्वारूढ [ इंद्राग्नी ] हो '=' अश्विना.' हा अर्थ आम्हीं सायणांस अनुसरून केला आहे, पण ' अश्विनौ' शब्दाचा जो नेहमीचा अर्थ अश्वी देव असा आहे, तो येथें घेतला तर चांगला जुळेल. देवांस अर्पण करावयाचा सोम अथवा यज्ञहवि अश्वी देवांनीं येऊन मधुर करावें अशी प्रार्थना पुष्कळ स्थळीं वेदांत येते. सू. ३४, मं. ३ आणि सू. ४७, मं. ४ याजवरील टीप पहा. ऋ. २. ३७. ५ यांत अश्वी देवांला "हवींत गोडी उत्पन्न करा" ( पृङ्क्तं हवींषि मधुना ) अशी प्रार्थना केली आहे. ऋ. ४. ४५. ३ यांत अश्वी देवांला "माधुर्य आणण्याकरितां आपला रथ जुंपा" अशी प्रार्थना आहे ( प्रियं मधुने युञ्जाथां रथम् ).

**युवामिन्द्राग्नी वसुनो विभागे तवस्तमा शुश्रव वृत्रहत्ये ।**
**तावासद्या बर्हिषि यज्ञे अस्मिन्प्र चर्षणी मादयेथां सुतस्य॥५॥२८**

युवाम् । इन्द्राग्नी इति । वसुनः । विऽभागे । तवःऽतमा । शुश्रव ।
वृत्रऽहत्ये ।

तौ । आऽसद्य । बर्हिषि । यज्ञे । अस्मिन् । प्र । चर्षणी इति । माद-
येथाम् । सुतस्य ॥ ५ ॥ २८ ॥

**प्र चर्षणिभ्यः पृतनाहवेषु प्र पृथिव्या रिरिचाथे दिवश्च ।**
**प्र सिन्धुभ्यः प्र गिरिभ्यो महित्वा प्रेन्द्राग्नी विश्वा भुवनात्यन्या ६**

प्र । चर्षणिऽभ्यः । पृतनाऽहवेषु । प्र । पृथिव्याः । रिरिचाथे इति ।
दिवः । च ।

प्र । सिन्धुऽभ्यः । प्र । गिरिऽभ्यः । महिऽत्वा । प्र । इन्द्राग्नी इति ।
विश्वा । भुवना । अति । अन्या ॥ ६ ॥

---

## भाषायाम्.

५. हे इन्द्राग्नी, वसुनः विभागे (=धनस्य दाने) [तथा] वृत्रहत्ये (=शत्रुह-नने) युवां तवस्तमा शुश्रव (=युवामतिशयेन बलिनौ स्थ इत्यहं श्रुतवान्)। तौ (=तादृशौ) [युवाम्] (=अतः कारणाद्युवाम्) अस्मिन् यज्ञे बर्हिषि आसद्य (=आस्तीर्णकुशायां वेद्यामुपविश्य) हे चर्षणी (=सर्वस्य द्रष्टारौ=सर्वज्ञौ), सुतस्य प्र मादयेथाम् (=अभिषुतमिममस्माभिः प्राप्यमाणं सोमं पीत्वा तृप्तौ भवतम्)॥

६. पृतनाहवेषु (=संग्रामेषु) [युवां] महित्वा (=युवयोर्महत्त्वेन) चर्षणि-भ्यः (=सर्वेभ्योपि मनुष्येभ्यः) प्र रिरिचाथे (=अधिकौ भवथः) पृथिव्याः प्र [रिरिचाथे] दिवश्च प्र [रिरिचाथे] (=द्यावापृथिवीभ्यामप्यधिकतरौ भवथः) सिन्धुभ्यः प्र [रिरिचाथे] (=समुद्रेभ्योपि भूयांसौ भवथः) गिरिभ्यः (=पर्वते-भ्यः) प्र [रिरिचाथे] (=अधिकतरौ भवथः) [अपि च] हे इन्द्राग्नी, अन्या विश्वा भुवना (=अन्यानि विश्वानि भुवनानि=भूतजातानि) प्राति [रिरिचाथे] (=एते-भ्योधिकप्रवृद्धतरौ भवथः)॥

५. हे इन्द्राग्नी हो, तुम्ही संपत्ति मिळवून देण्याच्या कामीं [ आणि ] शत्रूला मारून टाकण्याच्या कामीं परम शक्तिमान् आहां [ असें ] मीं ऐकिलें आहे. तर तुम्ही दर्भासनावर बसून, हे सर्वज्ञ [ इन्द्राग्नी ] हो, या यज्ञांत सोमरस पिऊन तृप्त व्हा.

5. I have heard, O Indra and Agni, that you are the most powerful in the bestowal of riches [ and ] in the destruction of enemies. Therefore sit you down on the Kus'a grass and, observers [ of all ], enjoy yourselves with the Soma, in this sacrifice.

६. हे इन्द्राग्नी हो, युद्धप्रसंगीं तुम्ही [ आपल्या ] मोठेपणानें [ सकल ] मनुष्यांस, विस्तीर्ण भूलोकास, आणि तुम्ही द्युलोकास, तुम्ही सागरांस, तुम्ही पर्वतांस [ आणि ] तुम्ही दुसऱ्या सकल भूतांस मागें पाडीत असतां.

6. In battles mingled with war-cries you excel, O Indra and Agni, with your magnitude [ all ] men, excel the wide Earth and the Heaven; excel the seas, excel the mountains [ and ] excel all other beings.

---

ऋ. १. ११७. ६ हाहि मंत्र पहा. १८२. २ हाहि मंत्र पहा. हें सर्व सूक्तच इंद्राग्नीविषयीं आहे आणि हा चवथे ऋचेचा उत्तरार्धच अश्वी देवांविषयीं असल्याविषयीं सर्वानुक्रमणिकेंत सांगितलेलें नाहीं यामुळें सायणांनीं उत्तरार्धाचा अश्विदेवपर अर्थ केला नाहीं असें वाटतें.

'सोमोदकांत '=' अप्सु.' हा अर्थ सायणांस अनुसरून केला आहे.

---

५. यांत ऋषि म्हणतो, ' हे इन्द्राग्नी, तुम्ही उपासकांचे शत्रु नाहींसे करून टाकण्याच्या आणि उपासकांस धन मिळवून देण्याच्या कामीं अतिप्रबळ आहां, असें मी लोकांकडून ऐकिलें आहे. यास्तव हा यज्ञ तुम्हांकरितां आम्हीं केला आहे. तर ह्या दर्भासनावर बसा आणि हा आमचा सोम यथेच्छ पिऊन तृप्त व्हा.'

'तर तुम्ही '=' तौ [ युवाम्].' वर ४ थ्या मंत्रांत तरी ' तौ ' शब्द अशाच रीतीनें योजिलेला आहे.

' सर्वज्ञ '=' चर्षणी.' ' चर्षणि ' शब्दाचा अर्थ कितीएकांच्या मतें वादग्रस्त आहे. कितीएक पाश्चिमात्य ' चर् ' धातूपासून (' पर् ' पासून जसा 'पर्षणि' त्याप्रमाणें ) निर्वचन करून ' फिरणारा,' ' भटकणारा,' ' जिकडे तिकडे जात असणारा ' असा अर्थ करितात.

**आ भरतं शिक्षतं वज्रबाहू अस्माँ इन्द्राग्नी अवतं शचीभिः ।**
**इमे नु ते रश्मयः सूर्यस्य येभिः सपित्वं पितरो न आसन् ॥ ७॥**

आ । भरतम् । शिक्षतम् । वज्रबाहू इति वज्रऽबाहू । अस्मान् । इन्द्राग्नी इति । अवतम् । शचीभिः ।
इमे । नु । ते । रश्मयः । सूर्यस्य । येभिः । सऽपित्वम् । पितरः । नः । आसन् ॥ ७ ॥

---

## भाषायाम्.

७. हे वज्रबाहू ( =वज्रहस्तौ ) [ इन्द्राग्नी], आ भरतं शिक्षतं ( =धनमानयतम् अस्मभ्यं च तद् दत्तम् ) [ अपि च ] हे इन्द्राग्नी, शचीभिः ( =कर्मभिः=पराक्रमकर्मभिः ) अस्मान् अवतं ( =रक्षतम् ) । येभिः ( =यैः ) [ सूर्यस्य रश्मिभिः] [ सह ] नः पितरः ( =अस्माकं पूर्वपुरुषाः ) सपित्वम् आसन् ( =" समवेतत्वम् अध्यगच्छन् " ) ते सूर्यस्य रश्मयः (=किरणा) इमे नु ( =इमे सांप्रतं दृश्यमाना एत एव खलु ) ॥

येभिरित्यत्र सायण एवं व्याख्यातवान् । किंच सूर्यात्मन इन्द्रस्य येभी रश्मिभिर्यैरर्चिभिर्नोस्माकं पितरः पूर्वपुरुषाः सपित्वं सहप्राप्तव्यं स्थानमासन् । ब्रह्मलोकमगच्छन् । अर्चिरादिमार्गेण हि ब्रह्मलोकमुपासका गच्छन्ति । तथा च श्रूयते । तेर्चिषमभिसंभवन्त्यर्चिषोहरिति । यद्वा येभी रश्मिभिः सपित्वं समवेतत्वमध्यगच्छन् । ते रश्मय इमे नु इदानीमस्माभिर्दृश्यमाना एत एव खलु । सूर्यात्मन इन्द्रस्य ये रश्मयस्त एवाग्नेरपि । तथा च श्रूयते । अग्निं वा वादित्यः सायं प्रविशति । तस्मादग्निर्दूरान्नक्तं ददृश इति । तस्मात्सूर्यस्य रश्मीनां स्तवनेनेन्द्राग्न्योरुभयोरपि स्तुतिः सिद्धा । इति ॥

---

परंतु सायणाचार्य 'चक्ष्' धातूचें रूप समजून 'पहाणारा,' 'ज्ञानी' असा अर्थ करितात. नेहमीप्रमाणें प्रस्तुत स्थळीं आम्हीं सायणांस अनुसरलों आहों. या शब्दाची खरी व्युत्पत्ति कशीहि असो, पण सायणाचार्य जो 'पहाणारा,' 'ज्ञानी' असा अर्थ करितात तो सर्व स्थळीं जुळतो, आणि विवक्षित आहे असें दिसतें. सूक्त ३५, मं.९ याजवरील टिपा पहा.

६. 'हे इन्द्राग्नी हो, युद्धप्रसंगीं तुमचें मोठेपण ( म्हणजे बळ अथवा सामर्थ्य ) अति प्रचंड आहे. तें किती आहे त्याचें परिमाणच सांगतां येत नाहीं. तें सकळ मनुष्यांच्या सामर्थ्यापेक्षां, सकळ पृथिवीच्या, सकळ द्युलोकाच्या, सकळ

७. हे वज्रहस्त इन्द्राग्नी हो, तुम्ही [ संपत्ति ] आणा [ आणि आम्हांस] द्या; हे इन्द्राग्नी हो, तुम्ही आपल्या पराक्रमांनीं आम्हांस रक्षा. ज्यांच्याशीं आमचे पितर सायुज्यता पावले ते सूर्याचे किरण हे पहा येथें !

7. Bring and bestow [ riches ] upon us, you holders of the thunderbolt. O Indra and Agni, protect us with your deeds of valour. Lo, these are those rays of the sun, with which our ancestors attained to union.

---

समुद्रांच्या, सकळ पर्वतांच्या, आणि दुसऱ्या सर्व पदार्थांच्या सामर्थ्यापेक्षां मोठें आहे.'

'युद्धप्रसंगीं' =' पृतनाहवेषु.' म्हणजे 'उपासकांनीं इंद्राग्नींस युद्धांत साहाय्यार्थ बोलाविल्यानंतर ते आले म्हणजे' असा सायणाचार्य अर्थ करितात. पण इंद्राग्नीला स्वताहाचे वृत्रादिक शत्रु नाहींत असें नाहीं. त्यांजशीं युद्ध करीत असतां असा अर्थ चांगला संभवतो तो आम्हीं येथें समजत आहों.

---

७. या मंत्राचा पहिला भाग सोपाच आहे, पण उत्तरार्धाचा अर्थ बराच संदिग्ध आहे. काठिन्य चवथ्या चरणांतील 'येभिः सपित्वं पितरः नः आसन्' या शब्दांवरून झालें आहे. या शब्दांचा अर्थ सायणाचार्य सुद्धा निश्चयानें करीत नाहींत. दोन अर्थ सांगून त्यांतून एक घ्यावा असें सुचवितात. ( भाष्य पहा.) 'आसन्' क्रियापदाचा अर्थ 'अगच्छन्' असा केला आहे त्याविषयीं सायणांनीं दिलेल्या प्रमाणापेक्षां अधिक प्रमाणाची अपेक्षा आहे. उत्तरार्ध जरी 'सपित्वम्' आणि 'आसन्' यांच्या योगानें कठिण झाला आहे, तथापि इतकें तात्पर्य उघड दिसतें कीं, ज्या सूर्यकिरणाच्या संबंधानें आमचे वाडवडील पितृगणत्वाप्रत पावले, म्हणजे स्वर्गीं जाऊन देवत्वाप्रत पावले, तेच हे सूर्यकिरण आज आमच्या दृष्टीस पडत आहेत.

सायणाचार्य म्हणतात कीं सूर्य आणि इंद्र एकच अशा समजुतीनें कवि सूर्यकिरणाविषयीं येथें बोलत आहे. सूर्य आणि इंद्र यांचें एकत्व वेदांत केव्हां केव्हां सांगितलें आहे.

'ज्यांच्याशीं...सायुज्यता पावले'= 'येभिः सपित्वम् आसन्.' म्हणजे जे सूर्यकिरणात्मक झाले, जे सूर्यकिरणांत जाऊन मिळाले, जे सूर्यकिरण आणि आमचे वाडवडील हे एकच झाले. सूर्यकिरणाच्या द्वारें कोणत्याहि रीतीनें स्वर्ग मिळतो अथवा देवगणांत किंवा पितृगणांत

**पुरंदरा शिक्षतं वज्रहस्तास्माँ इन्द्राग्नी अवतं भरेषु ।**
**तन्नो मित्रो वरुणो मामहन्तामदितिः सिन्धुः पृथिवी उत द्यौः ॥**
॥ ८ ॥ २९ ॥

पुरम्ऽदरा । शिक्षतम् । वज्रऽहस्ता । अस्मान् । इन्द्राग्नी इति । अवतम् । भरेषु ।

तत् । नः । मित्रः वरुणः । ममहन्ताम् । अदितिः । सिन्धुः । पृथिवी । उत । द्यौः ॥ ८ ॥ २९ ॥

---

## भाषायाम्.

८. हे पुरंदरा ( =पुरंदरौ=असुराणां पुरां भेत्तारौ ) [ इन्द्राग्नी ], शिक्षतम् ( =अस्मभ्यं धनं दत्तम् ) । हे वज्रहस्ता ( =वज्रहस्तौ=हस्ते गृहीतवज्रौ ) इन्द्राग्नी, अस्मान् भरेषु ( =संग्रामेषु ) अवतं ( =रक्षतम् ) । तत् ( =तदेतत् इन्द्राग्निभ्यां सकाशाद् यद्धनं संग्रामे च यद्रक्षणं याचितं तच्च ) मित्रः, वरुणः, अदितिः, सिन्धुः ( =समुद्राभिमानी देवः ) पृथिवी उत द्यौः ( =पृथिवी द्युलोकश्च ) नः ममहन्ताम् ( =अस्मभ्यं रक्षन्तु=ददतु ) ॥

---

समावेश प्राप्त होतो अशाविषयीं सायणांनीं एक श्रुति दिली आहे. तरी ती समजूत वेदांत सांगितलेली प्रसिद्ध नाहीं. त्याविषयीं प्रमाणवाक्यें अपेक्षित आहेत. तशा समजुतीस उद्देशून ऋषीचा भावार्थ समजावयाचा इतकें मात्र खरें दिसतें.

वृत्तानुरोधानें तिसऱ्या चरणांत ‘ सूरिअस ’ असें म्हणावें लागतें.

८. हे वज्रहस्त पुरंदरांनो, [ तुम्ही ] [ आम्हांस ] [ धन ] द्या; हे इन्द्राग्नी हो, आम्हांस समरांगणांत रक्षा. आणि हें दान मित्र, वरुण, अदिति, समुद्र, पृथिवी आणि द्यू आम्हांला देओत.

8. Breakers of the enemies' cities, help us, you who are armed with the thunderbolt. Indra and Agni, protect us in battles. And may Mitra, Varuṇa, Aditi, the Sea, Earth and Heaven confirm this unto us.

---

८. भावार्थ उघडच आहे. ही ऋचा झाली म्हणजे हें सूक्त येथें संपलें. यांत ऋषि काय वरदान मागतो त्याजकडेस लक्ष्य देण्यासारिखें आहे. ऋषि संपत्ति मागतो, आणि युद्धांत आपलें रक्षण इंद्राग्नींनीं करून जय द्यावा असें प्रार्थितो. यावरून प्राचीन आर्य आतांच्या आर्यांहून आणि प्राचीन आर्य जसे होते असें आपण समजतों त्याहून किती भिन्न असत तें दिसून येतें.

'वज्रहस्त,' 'पुरंदर.' (म्ह०'वज्र आहे हातीं ज्याच्या,' आणि 'नगरांतें फोडून टाकणारा.') हीं विशेषणें बहुतकरून नेहमी इन्द्रास लाविलेलीं आढळतात. या ठिकाणीं इन्द्राला आणि अग्नीला लाविलीं आहेत हें लक्ष्यांत ठेवण्याजोगें आहे. इंद्राच्या बरोबर अग्नि येथें उक्त आहे म्हणून एकट्या इंद्राचीं विशेषणें दोघांला लाविलीं आहेत.

## सूक्तम् ११०.

आङ्गिरसः कुत्स ऋषिः । ऋभवो देवता । पञ्चमीनवम्यौ त्रिष्टुभौ । शिष्टा जगत्यः ॥

**ततं मे अपस्तदु तायते पुनः स्वादिष्ठा धीतिरुचथाय शस्यते ।**
**अयं समुद्र इह विश्वदेव्यः स्वाहाकृतस्य समु तृप्णुत ऋभवः॥१॥**

ततम् । मे । अपः । तत् । ऊम् इति । तायते । पुनरिति । स्वादिष्ठा । धीतिः । उचथाय । शस्यते ।
अयम् । समुद्रः । इह । विश्वऽदेव्यः । स्वाहाऽकृतस्य । सम् । ऊम् इति । तृप्णुत । ऋभवः ॥ १ ॥

### भाषायाम्.

१. ततं मे अपः ( =मम कर्म उपासनारूपं विस्तारितमनुष्ठितमस्ति ) । तद् उ तायते पुनः ( =तदेव कर्म पुनरनुष्ठीयते ), [ हे ऋभवः ], स्वादिष्ठा धीतिः (=अतिशयेन प्रीतिकरं स्तोत्रम् ) उचथाय ( =युष्मत्कर्तृकायै स्तुतये=यूयं यथा तत्स्तोत्रं श्रुत्वा साध्वेतत्स्तोत्रं साध्विति मम प्रशंसां कुरुथ तथा ) शस्यते ( =पठ्यते=मया गीयते ) । [ अपि च ] अयं समुद्रः ( =अयं पुरो दृश्यमानः सोमः ) विश्वदेव्यः ( =सकलदेवेभ्यः पर्याप्तः) इह ( =अत्र ) [ अर्पितोस्ति ] । [ अतः कारणात् ] हे ऋभवः ( =एतन्नामका देवाः ), स्वाहाकृतस्य ( =स्वाहाशब्देन सह प्रार्पितस्य ) [ अस्य सोमस्य=तादृशं सोमं पीत्वा ] सम् उ ( =एकत्रैव) तृप्णुत (=तृप्ता भवत) ॥

## सूक्त ११०.

ऋषि—आङ्गिरसकुळांतील पुरुष कुत्स (पूर्वसूक्ताचा जो तोच). देवता—ऋभु. वृत्त—पांचवी आणि नववी ह्या त्रिष्टुभ्, बाकी राहिलेल्या जगती.

१. माझें कर्म पूर्ण झालें आहे, तरी तें मी पुन: करीत आहें. परम मधुर स्तोत्र मी प्रशंसेसाठीं गात आहें. हा येथें अर्पण केलेला सोम सकळ देवांस पुरण्याजोगा आहे. [तर] हे ऋभूंनो, 'स्वाहा' म्हणून अर्पण केलेला [ हा ] सोम तुम्ही एकत्र पिऊन तृप्त व्हा.

## HYMN 110.

To the *Ribhus*. By *Kutsa* of the family of *Angiras*. Metre—*Jagatî*, except in verses 5 and 9, where it is *Trishṭubh*.

1. My work is performed. Still it is being performed again. The sweetest prayer is being sung that you may commend me. This Soma here [ is ] sufficient for all the gods. Ṛibhus, gratify yourselves together by [ drinking ] [this Soma] offered with [the exclamation] ' Svâhâ'.

---

१. हें सूक्त 'ऋभु' या नांवाच्या देवांविषयीं आहे. ऋभु देव तीन आहेत; 'ऋभु,' 'विभ्वा' आणि 'वाज.' ते सुधन्व्याचे पुत्र असें सांगितलेलें आढळतें. ते मोठे कारागीर आहेत व त्यांणीं इन्द्राचे पिवळे घोडे, अश्विदेवांचा रथ आणि बृहस्पतीची कामधेनु ह्यांस निर्माण केलें असें सांगितलें आहे. त्यांनीं आपल्या आईबापांस पुन: तरुण केलें; आणि देवांचा कारागीर आणि ऋभूंचा प्रतिस्पर्धी असा जो 'त्वष्टा' त्यानें केलेलें एकच सोमपात्र ('चमस') होतें त्यापासून चार 'चमस' निर्माण केले. या आणि अशाच दुसऱ्या कितीएक विचित्र कृत्यांवरून त्यांस अमरत्व प्राप्त झालें असें सांगितलें आहे. 'ऋभु' हे इन्द्राबरोबर फिरणाऱ्या देवगणांत असतात, आणि त्याजबरोबर संध्याकाळच्या यज्ञाला (तृतीय सवनाला) येत असतात, असें वर्णन वेदांत आढळतें. या देवांविषयीं २० वें सूक्त पहा. शिवाय या देवांविषयीं सूक्तें आहेत तीं येणेंप्रमाणें:—१. ११०, १११, १६१; ३. ६०, १-४; ४. ३३, ३४, ३५, ३६, ३७; ७. ४८. १-३; १०. १७६. १. शिवाय फुटकळ मंत्र दुसऱ्या देवांबरोबर ऋभूंस उद्देशून असलेले कितीएक आहेत.

या पहिल्या मंत्राचें तात्पर्य:—' मीं

**आभोगयं प्र यदिच्छन्त ऐतनापाकाः प्राञ्चो मम के चिदापयः ।**
**सौधन्वनासश्चरितस्य भूमनागच्छत सवितुर्दाशुषो गृहम् ॥ २ ॥**

आऽभोगयम् । प्र । यत् । इच्छन्तः । ऐतन । अपाकाः । प्राञ्चः । मम । के । चित् । आपयः ।
सौधन्वनासः । चरितस्य । भूमना । अगच्छत । सवितुः । दाशुषः । गृहम् ॥ २ ॥

## भाषायाम्.

२. [ हे ऋभवः ], आभोगयम् इच्छन्तः ( =हविरन्नं प्राप्तुमिच्छन्तः=देवत्वं प्रेप्सवः ) अपाकाः ( =अमूढाः=प्रज्ञाना ) मम केचित् प्राञ्च आपयः ( =मम केनचित् प्रकारेण आप्तभूताः पूर्वपुरुषा ) [ एतादृशा यूयं ] यद् ( =यदा ) प्र ऐतन ( =महत् चरितमाचरितुमुपाक्रामत ) [ तदा ] हे सौधन्वनासः ( =आङ्गिरसस्य सुधन्वनः पुत्रा =ऋभवः ), चरितस्य भूमना ( =युष्माकं सुचरितस्य, बहुत्वेन ) दाशुषः सवितुः ( =महोदारस्य=अमरत्वस्य दातुः एतादृशस्य सवितृदेवस्य ) गृहं ( =स्थानम् ) अगच्छत ( =प्राप्नुत ) ॥

हे मम पूर्वपुरुषभूता ऋभवः, यदा आप्तहविष्कं देवत्वं जिगमिषवो यूयं सुचरितमाचरितुं प्रवृत्तास्तदा महान्ति चरितानि पित्रोः पुनर्यौवनदानादिरूपाणि कृत्वा सूर्यलोकं गता इति भावः ॥

ऋभूंप्रीत्यर्थ उपासना केलीच आहे; तरीहि पुनः करीत आहें, आणि जें ऐकून, हे ऋभू हो, तुम्ही माझी वाहवा कराल असें परम मधुर स्तोत्र मी तुम्हांप्रीत्यर्थ म्हणत आहें, आणि सर्व देवांलाहि पुरण्यासारिखा हा सोमरस तुम्हांला 'स्वाहा' म्हणून अर्पण केला आहे. तर तो तुम्ही तीनहि ('ऋभु,' 'विभ्वा' आणि 'वाज') मिळून एकत्र पिऊन आनंद पावा.'

'कर्म' म्ह० ऋभुप्रीत्यर्थ अनुष्ठान (=स्तोत्र म्हणून सोम आणि हवि अर्पण करणें) केलेलें पुनः करीत आहें. असें सांगण्याचें तात्पर्य असें दिसतें कीं तें पुनः पुनः करण्यांत मला आनंद वाटतो.

'सोम.' मूळांत 'समुद्रः' असें पद आहे, त्याचा अर्थ वेदांत सोमरस असा पुष्कळ ठिकाणीं होतो.

२. [ हे ऋभूंनो ], माझे कांहीं प्राचीन आप्त असे जे ज्ञानी तुम्ही ते जेव्हां हविरन्नाची इच्छा करून पराक्रम करण्यास आरंभ करिते झालां, तेव्हां हे सुधन्व्याच्या पुत्रांनो, तुम्ही [ आपल्या ] पराक्रमाच्या महत्त्वेंकरून महोदार सवित्याच्या घराप्रत पावलां.

2. When you, [who are] my certain ancient relations, went forth [after achievements], wishing for [sacrificial] food, [then] O sons of Sudhanvan, you attained by the greatness of [your] exploits to the house of generous Savitâ.

२. भावार्थः—हे ऋभूंनो, माझे कांहीं प्रकारें पुरातन आप्त असे जे महाकुशळ तुम्ही त्यांहीं जेव्हां आम्ही देव होऊं आणि हविरन्नाप्रत पावूं असा निश्चय करून, आईबापांला पुनः तरूण करणें, एक चमसाचे चार चमस करणें इत्यादि मोठमोठीं चरितें ( म्हणजे कौशल्याचीं कृत्यें ) करण्यास आरंभ केला तेव्हां तुम्ही त्या मोठ्या कृत्यांच्या योगेंकरून सूर्य लोकाप्रत गेलां आणि नंतर सूर्यानें तुम्हांस अमर केलें.

'माझे...आप्त'=' मम आपयः.' ऋभु हे सुधन्वा या नांवाच्या मनुष्याचे पुत्र होत आणि सुधन्वा सूक्तकर्त्या कुत्स ऋषीप्रमाणेंच आंगिरसकुळांत जन्मला होता म्हणून, कुत्स ऋषि ऋभूंस आपले प्राचीन आप्त असें म्हणतो असें यास्क आणि सायण म्हणतात तें कबूल केल्याशिवाय उपाय नाहीं.

'हविरन्नाची इच्छा करून'=' आभोगयम् इच्छन्तः.' अक्षरशः अर्थ अन्नाची इच्छा करणारे असे. 'आभोगय' हा शब्द ऋग्वेदांत मंत्रांतरीं आलेला आढळत नाहीं. त्यामुळें प्रयोगान्तराचें प्रमाण देण्यास साधन नाहीं. तथापि सायणाच्या भावार्थास अनुसरून जो आम्हीं अर्थ केला आहे तो चांगला संभवतो आणि त्याशिवाय निर्वाह दिसत नाहीं.

'सुधन्वा.' हा कोण होता आणि त्याचा इतिहास काय आहे याविषयीं कांहीं ठाऊक नाहीं. मात्र ऋभूंला 'सौधन्वान' ( म्हणजे सुधन्वा याचे पुत्र ) हें नांव ज्यांत दिलें आहे असे मंत्र वेदांत पुष्कळ आहेत.

'सवित्याच्या घराप्रत पावलां'=' सवितुर्गृहम् अगच्छत.' याचा अर्थ 'तुम्ही द्युलोकीं पोंहचलां'=' देव झालां' असा सायणाचार्याप्रमाणें आम्हीं केला आहे. परंतु सूर्याचे घरीं जाणें म्हणजे अमर होणें अशा अर्थाचे मंत्र पाहिजे आहेत. मात्र सूर्यानें ऋभूंला अमरत्व दिलें असें वेदांत सांगितलें आहे.

ही ऋचा कठिण आहे. सायणाचार्य किंचित् वेगळा अर्थ करितात. तो येणेंप्रमाणें:—

"हे ऋभूंनो, अपक्वबुद्धीचे आणि पूर्वकालींचे माझे कितीएक वाडवडील असे जे तुम्ही ते प्राशनीय सोमाची वांछा करून जेव्हां तप करण्यास अरण्यांत गेलां तेव्हां संचित केलेल्या तपाच्या बहु-

तत्स॑वि॒ता वो॑ऽमृत॒त्वमासु॑व॒दगो॑ह्यं॒ यच्छ्र॒वय॑न्त॒ ऐत॑न ।
त्यं चि॑च्चम॒सम॑सु॒रस्य॒ भक्ष॑ण॒मेकं॒ सन्त॑मकृणुता॒ चतु॑र्वयम् ॥ ३ ॥

तत् । स॒वि॒ता । वः॒ । अ॒मृ॒त॒ऽत्वम् । आ । अ॒सु॒व॒त् । अगो॑ह्यम् । यत् ।
श्र॒वय॑न्तः । ऐत॑न ।

त्यम् । चि॒त् । च॒म॒सम् । अ॒सु॑रस्य । भक्ष॑णम् । एक॑म् । सन्त॑म् । अ॒-
कृ॒णु॒त॒ । चतुः॑ऽवयम् ॥ ३ ॥

वि॒ष्ट्वी शमी॑ तरणि॒त्वेन॑ वा॒घतो॒ मर्ता॑सः॒ सन्तो॑ अमृत॒त्वमा॑नशुः ।
सौ॒ध॒न्व॒ना ऋ॒भवः॒ सूर॑चक्षसः संवत्स॒रे सम॑पृच्यन्त धी॒तिभिः॑ ॥ ४

वि॒ष्ट्वी । शमी॑ । त॒र॒णि॒ऽत्वेन॑ । वा॒घतः॑ । मर्ता॑सः । सन्तः॑ । अ॒मृ॒त॒ऽत्व-
म् । आ॒न॒शुः॒ ।

सौ॒ध॒न्व॒नाः । ऋ॒भवः॑ । सूर॑ऽचक्षसः । सं॒व॒त्स॒रे । सम् । अ॒पृ॒च्य॒न्त॒ ।
धी॒ति॒ऽभिः॑ ॥ ४ ॥

---

## भाषायाम्.

३. [ हे ऋभवः ], यद् (=यदा) [ यूयम् ] अगोह्यं (=गूहितुमशक्यं सर्वेषां दृष्टिगोचरं सन्तं) [ सवितारं ] श्रवयन्तः ऐतन (=श्रावयन्तः अगच्छत=प्राख्यापयत) तत् (=तदानीं) सविता वः (=युष्मभ्यं=युष्माकमर्थे) अमृतत्वम् आ असुवत् (=मरणरहितत्वं दत्तवान्)। असुरस्य (=बलवतः=त्वष्टुः संबन्धिनं=त्वष्ट्रा कृतं) भक्षणं (=भक्षणसाधनं) त्यं चित् (=तं प्रसिद्धमपि) चमसं (=सोमपात्रम्) एकं सन्तम् [ अपि ] चतुर्वयम् अकृणुत (=चतुःसंख्याकम् अकुरुत) ॥

४. सौधन्वनाः (=सुधन्वन ऋषेः पुत्रभूता) ऋभवः मर्तासो वाघतः सन्तः (=मरणधर्माणो यजमानाः सन्तोपि) तरणित्वेन (=शीघ्रत्वेन) शमी विष्ट्वी (=आत्मानं कर्मणा व्यापृतं कृत्वा=कुशलकर्माणि "एकं चमसं चतुरः कृणोतनेत्यादिना देवैरुक्तानि कर्माणि" कृत्वा) अमृतत्वम् आनशुः (=अमरत्वं प्रापुः) संवत्सरे [ च ] (=एकस्मिन्नेव वर्षे गते) सूरचक्षसः (=सूर्यवत्तेजोयुक्ता भूत्वा) धीतिभिः सम् अपृच्यन्त (=उपासककृतैर्यज्ञादिभिः कर्मभिः स्तोत्रैश्च संयुक्ता अभवन्=तेषां प्रीत्यर्थम् उपासकाः कर्माणि स्तोत्राणि चाकुर्वन्) ॥

३. तुम्ही जेव्हां प्रख्यात सवित्याची कीर्ति गात गात गेलां तेव्हां सवित्यानें तुम्हांला अमरत्व दिलें. आणि प्रबळ त्वष्ट्याचा पिण्याचा जो प्याला तो एक असतांनाहि त्याचे सुद्धा तुम्ही चार करिते झालां.

3. Savitâ granted you immortality when you went proclaiming the renown of that unconcealable one. Even the drinking bowl of the mighty [ Tvashṭâ ], though it was one, you turned into four.

४. त्वरेनें [ कौशल]कृत्यें करून मर्त्य उपासक असतांहि [ ऋभु हे ] अमरत्व पावले. सुधन्व्याचे पुत्र ऋभु सूर्याप्रमाणें तेजस्वी होऊन, त्यांस एक संवत्सरांत स्तोत्रें प्राप्त होऊं लागलीं.

4. Sacrificers and mortals though they were, [ nevertheless ] by performing feats [ of skill ] with rapidity they attained to immortality: Ṛibhus the sons of Sudhanvan becoming resplendent as the sun, began to be addressed with prayers, in a year.

---

त्वानें तुम्ही हविर्दान करणारा आणि सोमाभिषव करणारा जो यजमान त्याच्या घरीं गेलां."

वृत्तानुरोधेंकरून तिसरा आणि चवथा हे चरण खालीं दाखविल्याप्रमाणें म्हटले पाहिजेतः—

अयं समुद्रः इह विश्वदेविअः ।
स्वाहाकृतस्य समु तृप्णुतर्भवः ।।

---

३. या मंत्रांत ऋभु हे देवपणाप्रत कसे पावले तें सांगून त्यांनीं काय पराक्रम केले तेंहि सांगितलें आहे, ' हे ऋभूंनों, तुम्ही सवित्या देवाची कृपा संपादन केली तेव्हां तुम्हांला त्यानें अमर केलें आणि तुम्हीं त्वष्ट्याचा एक चमस ( सोमपात्र ) असतां त्याचे चार केले.'

' अमरत्व दिलें '=' अमरत्वम् आ असुवत्.' सू. २०,मं. १ याजवरील टीप पहा.

४. भावार्थः—' ऋभु हे प्रथम साधारण मनुष्यांप्रमाणें मनुष्य असून ते आपल्या कुशलतेच्या योगानें एका वर्षांत अमर झाले आणि मग त्यांस सूर्याप्रमाणें तेज प्राप्त झालें, आणि त्यांच्या प्रीत्यर्थ लोक यज्ञयागादि कर्मं करूं लागले.'

' स्तोत्रें प्राप्त होऊं लागलीं '=' धीतिभिः सम् अपृच्यन्त.' म्हणजे ऋभूंला देव समजून त्यांच्या नांवाचीं स्तोत्रें लोक गाऊं लागले आणि त्यांच्या नांवानें यज्ञयागादि कर्मं करूं लागले.

**क्षेत्रमिव वि ममुस्तेजनेनँ एकं पात्रमृभवो जेहमानम् ।**
**उपस्तुता उपमं नाधमाना अमर्त्येषु श्रव इच्छमानाः ॥५॥ ३०॥**

क्षेत्रम्ऽइव । वि । ममुः । तेजनेन । एकम् । पात्रम् । ऋभवः । जेहमानम् ।
उपऽस्तुताः । उपऽमम् । नाधमानाः । अमर्त्येषु । श्रवः । इच्छमानाः ॥ ॥ ५ ॥ ३० ॥

**आ मनीषामन्तरिक्षस्य नृभ्यः स्रुचेव घृतं जुहवाम विद्मना ।**
**तरणित्वा ये पितुरस्य सश्चिर ऋभवो वाजमरुहन्दिवो रजः ॥६॥**

आ । मनीषाम् । अन्तरिक्षस्य । नृऽभ्यः । स्रुचाऽइव । घृतम् । जुहवाम । विद्मना ।
तरणिऽत्वा । ये । पितुः । अस्य । सश्चिरे । ऋभवः । वाजम् । अरुहन् । दिवः । रजः ॥ ६ ॥

---

## भाषायाम्.

५. उपमं [ सोमं ] नाधमानाः ( =सर्वेषामुपमानभूतं=सर्वोत्कृष्टं सोमं याचमानाः) [ अपि च ] अमर्त्येषु श्रवः इच्छमानाः (=मरणरहितेषु देवेषु मध्ये हवीरूपमन्नमिच्छन्त ) ऋभवः जेहमानम् एकं पात्रं ( =प्रयतमानं दुःखादिव प्रयासेन मुखं विवृण्वत् अद्वितीयं सोमपात्रं चमसं), क्षेत्रमिव ( =मानदण्डेन क्षेत्रं विविधं भाजयन्ति तद्वत्), तेजनेन ( =तीक्ष्णेन शस्त्रेण ) उपस्तुताः वि ममुः ( =समीपस्थैर्जनैः स्तुताः सन्तः विविधं भाजयामासुः=चतुष्टयरूपेण विभक्तमकुर्वन् तत्पश्यद्भिश्च समीपस्थैर्जनैः स्तुता अभवन् ) ॥

६. [ वयम् ] अन्तरिक्षस्य नृभ्यः ( =अन्तरिक्षप्रदेशस्य वीरेभ्यः=ऋभुभ्यः ) घृतं स्रुचेव ( =क्षरणशीलम् आज्यं जुह्वा यथार्पयन्ति तथा) विद्मना मनीषाम् आ जुहवाम ( =ध्यानेन स्तुतिम् अर्पयाम ) । ये ऋभवः तरणित्वा ( =तरणित्वेन=कौशलेन=स्वकीयेन चातुर्येण ) अस्य पितुः ( =जगतः प्रसिद्धपितुस्त्वष्टुः) वाजं (=बलं) सश्चिरे ( =प्रापुः ) । [ ऋभवः ] दिवो रजः अरुहन् ( =द्युलोकस्य प्रदेशम् आरूढवन्तः ) ॥

५. संनिध असलेल्यांनीं स्तविलेले ऋभु उत्तम [सोमरसा]चा हेतु धरून [ आणि ] अमरांमध्यें आपणास अन्न प्राप्त व्हावें अशी इच्छा करून तोंड उघडणारें एकच पात्र, शेताला रेखिल्याप्रमाणें, तीक्ष्ण शस्त्रानें रेखिते झाले.

६. स्रुचेनें घृत अर्पण करावें तसें आंतरिक्ष [ ऋभु]वीरांला ध्यानाच्या योगानें आपण स्तोत्र अर्पण करूं. जे ऋभु [ वीर ] [ आपल्या ] कौशल्यानें जगत्पित्याच्या शक्तीप्रत पावले. [ ऋभु] दिव्यलोकीं चढले.

5. The Ribhus, desirous of excellent [ Soma ] [ and ] wishing for food among the immortals, ruled up like a field the gaping single bowl [into four] with [their] sharp instrument, and were praised by the bystanders.

6. Let us offer with contemplation, like clarified butter with a ladle, a prayer to the Ribhus the heroes of the intermediate region, who by their skill attained to the power of the Father. the Ribhus ascended the region of heaven.

---

५. भावार्थः—'ऋभूंला अशी इच्छा झाली कीं आपण देव व्हावें आणि लोकांनीं आपणांला देव समजून सोम अर्पण करावा, आणि देवांच्या पंक्तीस बसवून आपणांला हवि अर्पण करावें; अशा इच्छेनें त्यांनीं त्वष्ट्यानें पूर्वी केलेलें चमस नांवाचें सोम पिण्याचें पात्र घेऊन आपल्या तीक्ष्ण शस्त्रानें, काठीनें जमीन रेखाटल्याप्रमाणें, तें रेखलें, त्याबरोबर त्याचें तोंड उघडून त्याचीं चार पात्रें झालीं. आणि हें कृत्य पाहून जवळच्या लोकांस आश्चर्य वाटलें आणि त्यांनीं ऋभूंची वाहवा केली.'

'तोंड उघडणारें'=' जेहमानम्.' हा शब्द कठिण आहे. सायणांनीं 'प्रयत्न करणारें' असा शब्दार्थ घेऊन 'यज्ञांत उपयोगीं पडणारें' असा पर्यवसित अर्थ केला आहे. त्यांच्या शब्दार्थास न सोडतां आम्हीं कितीएक व्याख्याकारांस अनुसरून निराळा अर्थ केला आहे. प्रयोगान्तरांची अपेक्षा तर खरीच. तीक्ष्ण शस्त्र घेऊन तें चमसावरून रेखल्याबरोबर चमसाचें तोंड उघडलें आणि त्याचे चार चमस झाले असा भावार्थ.

वृत्तासाठीं चवथ्या चरणांत 'अमर्त्येषु'च्या ठिकाणीं 'अमर्तिएषु' असें म्हटलें पाहिजे.

६. या ऋचेचें तात्पर्य असें आहे कीं, 'स्रुचेंत ( पळींत ) घालून घृत अर्पण करितात आणि तें जसें देवांस पों-

ऋभुर्न इन्द्रः शवसा नवीयानृभुर्वाजेभिर्वसुभिर्वसुर्ददिः ।
युष्माकं देवा अवसाहनि प्रियेऽभि तिष्ठेम पृत्सुतीरसुन्वताम् ॥७॥

ऋभुः । नः । इन्द्रः । शवसा । नवीयान् । ऋभुः । वाजेभिः । वसुऽभिः । वसुः । ददिः ।
युष्माकम् । देवाः । अवसा । अहनि । प्रिये । अभि । तिष्ठेम । पृत्सुतीः । असुन्वताम् ॥ ७ ॥

## भाषायाम्.

७. " ऋभुर्विभ्वा वाज इति त्रयः सुधन्वनः पुत्राः " । [ तत्र ] ऋभुः ( =एतन्नामको देवः ) शवसा ( =आत्मीयेन बलेन) नो नवीयान् इन्द्रः (=अस्माकं नूतनतर इन्द्रो ) [ भवति ] । ऋभुः वाजेभिः वसुभिः ( =अन्नैर्धनैश्च ) ददिर्वसुः ( =दानशीलो देवो ) [ भवति ] । हे देवाः ( =देवभूता ऋभवः ), युष्माकम् अवसा ( =रक्षणेन ) [ वयं ] प्रिये अहनि ( =" अस्माकम् अनुकूले दिवसे " ) असुन्वतां पृत्सुतीः ( =युष्माकमर्थे सोमं नाभिषुण्वतां सेनाः) अभि तिष्ठेम ( =अभिभवेम ) ॥

इच्छितें तसें ध्यानाचे योगानें ऋभूंची प्रार्थना आपण करूं म्हणजे ती त्यांस पोंहचेल.'

ऋभु आपल्या चातुर्याच्या योगेंकरून प्रत्यक्ष विश्वकर्म्याप्रमाणें सामर्थ्यवान् झाले, आणि द्युलोकीं चढले, म्हणजे 'देव झाले.'

' आंतरिक्ष वीरांला '=' अन्तरिक्षस्य नृभ्यः.' ऋभूंला ' आंतरिक्ष वीर' म्हणजे ' अंतरिक्षांतील वीर' असें कां म्हटलें तें नीट समजत नाहीं. सायणाचार्य म्हणतात कीं, 'ऋभु' हे अंतरिक्षांत राहणाऱ्या देवांत गणिले जातात म्हणून त्यांस 'अंतरिक्षांतील ' असें म्हणण्यांत आलें आहे. बहुतकरून तसेंच असेल.

'जगत्पित्याच्या शक्तीप्रत पावले'='अस्य पितुः वाजं सश्चिरे.' या ठिकाणीं 'पिता' म्हणजे सुधन्वा घ्यावयाचा नाहीं. सायणाचार्य " सूर्य " असें जरी म्हणतात तरी 'त्वष्टा' म्हणजे विश्वकर्मा, ज्याणें सर्व जगत् निर्मिलें, तो असेल असा अधिक संभव दिसतो. कारण कीं त्वष्ट्याशीं ऋभूंनीं ईर्ष्या केली आणि त्याच्या बरोबरीस आले असें इतरत्र सांगितलें आहे. आणि बृहस्पति, इन्द्र, वरुण आणि अग्नि यांस पिता असें बहुत ठिकाणीं म्हटलें आहे. तसें त्वष्ट्यास म्हणण्यास अडचण दिसत नाहीं. आणि ऋ. १०. ६४. १० यांत ' त्वष्टा ' याला 'पिता' असें म्हटलेलेंहि आहे ('शृणोतु नः त्वष्टा...

७. ऋभु [ हा ] [आपल्या ] बळाच्या योगानें आमचा अति नूतन इंद्र [ होय ]; ऋभु [हा] धनांच्या [आणि] संपत्तींच्या योगानें [आमचा] उदार देव [होय]. [तर] हे [ऋभु] देवांनो, तुमच्या रक्षणानें आम्ही उत्सवाच्या दिवसीं नास्तिक लोकांच्या सेना जिंकूं, असें करा.

7. Ṛibhu [is] by power our newest Indra; Ṛibhu [is] by wealth [ and ] riches our liberal god. With your protection, may we, O divine [ Ṛibhus ], withstand the armies of the unsacrificing on beloved days.

---

पिता वचः'='त्वष्टा बाप आमचें वचन ऐको'). मूळ ऋचेंत 'जगत्पित्याच्या' याऐवजीं 'अस्य पितुः' इतकेंच आहे त्याचा अर्थ 'त्या पित्याच्या' असा होतो. 'तो पिता' म्हणजे जगताचा जो प्रसिद्ध पिता अथवा उत्पन्नकर्ता तो. त्वष्ट्यानें सर्व जगत् निर्मिलें असें वेदांत सांगितलें आहे.

'दिव्य लोकीं चढले' म्ह० स्वर्गी चढले, देवत्वाप्रत पावले, देव झाले.

वृत्ताला अनुसरून तिसरा चरण खालीं दाखविल्याप्रमाणें म्हणावा लागतोः—

तरणित्तुआ ये पितुरस्य सश्चिरे।

---

७. 'ऋभु' देव यांत 'ऋभु,' 'विभ्वा' आणि 'वाज' अशा तिघांचा समावेश होतो. त्यांतून या ऋचेच्या पहिल्या अर्धात ऋभूविषयीं ऋषि म्हणतो, 'ऋभु इतका बळवान् आहे कीं, तो आमचा एक नवा इंद्रच होय, आणि धन व संपत्ति देण्याविषयीं इतका उदार आहे कीं इंद्रादिकांप्रमाणें तो आमचा उदार दाता होय.—तर हे ऋभु देवांनो, तुम्ही आमचें रक्षण करा, आणि उत्सवाच्या दिवसीं आमचा जय नास्तिक जनांवर होई असें करा.'

'अति नूतन इन्द्र' = 'नवीयान् इन्द्रः.' म्ह० ऋभूचें बल इतकें आहे कीं, त्यास आम्ही नवा इन्द्र मानावा आणि त्याला खऱ्या इन्द्राच्या जागीं पूजावा.

'उदार देव'='वसुः ददिः.' 'वसुः' याचा अर्थ येथें अग्नि किंवा इन्द्रच केल्यास संभवण्याजोगा आहे. ऋभु आम्हांस इतकीं धनें आणि संपत्ति देतो कीं, आम्हीं त्यासच उदार देव म्हणूं, इन्द्रास किंवा अग्नीस 'उदार देव' ( वसुर्ददिः ) असें आजपर्यंत म्हणत होतों तसें पुढें म्हणण्याची आतां अवश्यकता नाहीं, असा भावार्थ. हें म्हणणें एकट्या ऋभूस अनुलक्षून आहे, व उत्तरार्ध

**निश्चर्मण ऋभवो गामपिंशत सं वत्सेनासृजता मातरं पुनः ।**
**सौधन्वनासः स्वपस्यया नरो जिव्री युवाना पितराकृणोतन ॥८॥**

निः । चर्मणः । ऋभवः । गाम् । अपिंशत । सम् । वत्सेन । असृजत । मातरम् । पुनरिति ।

सौधन्वनासः । सुऽअपस्यया । नरः । जिव्री इति । युवाना । पितरा । अकृणोतन ॥ ८ ॥

---

## भाषायाम्.

८. हे ऋभवः, [ यूयं ] चर्मणः गां निरपिंशत ( =गोमांसमवयवीकृत्य तान् अवयवान् चर्मणः सकाशात् पृथक्कृतवन्तः ) पुनः ( =एवं कृत्वापि पुनः ) मातरं ( =तां गां ) वत्सेन ( =तस्या बालेन सह ) सम् असृजत ( =संसृष्टाम् अकुरुत=वत्सेन युक्तामकुरुत ) । हे सौधन्वनासः ( =सौधन्वनाः=सुधन्वनः पुत्रा ) नरः ( =वीरा= ऋभवः ), स्वपस्यया ( =युष्माकं चातुर्येण ) [ यूयं ] जिव्री पितरा (=जिव्री पितरौ) (=वृद्धौ मातापितरौ) [ पुनरपि ] युवाना (=यौवनोपेतौ) अकृणोतन (=अकुरुत) ॥

सायणस्त्वेवमाह । पुरा कस्यचिदृषेर्धेनुर्मृता । स ऋषिस्तस्या धेनोर्वत्सं दृष्ट्वा ऋभुं तुष्टाव । ऋभवस्तत्सदृशीमन्यां धेनुं कृत्वा तदीयेन चर्मणा संवीय तेन वत्सेन समयोजयन्नित्ययमर्थः पूर्वार्द्धे प्रतिपाद्यते । हे ऋभवः यूयं चर्मणश्चर्मणा त्वचा । तृतीयार्थे षष्ठी । गां धेनुं निरपिंशत । निःशेषेणाश्लिष्टां संयुक्तामकुरुत । इत्यादि ॥

---

ऋभु व दुसरे दोन मिळून तिनीहि ऋभु देवांस अनुलक्षून आहे हें लक्ष्यांत ठेवावें.

' उत्सवाच्या दिवसीं ' म्ह० ज्या दिवसीं देवांची विशेष उपासना करून सण करावयाचा त्या दिवसीं असें तात्पर्य दिसतें. अशा दिवशीं नास्तिक जन येऊन देवभजक लोकांचा छळ करीत असतील हें उघडच आहे. ' नास्तिक जन ' याऐवजीं मुळांत ' असुन्वताम् ' असें पद आहे. त्याचा अर्थ '[ देवांसाठीं ] सोमरस न काढणारे ' असा आहे. नास्तिक म्हणजे काय याचा अर्थ वेगळ्यावेगळ्या देशीं जसा, तसा वेगवेगळ्या काळींहि वेगवेगळा होतो. तूर्तच्या काळीं सोमरस काढून देवांस अर्पण केला नाहीं म्हणून कोणास आपण नास्तिक म्हणणार नाहीं !

८. हे ऋभूंनो, तुम्ही गाईचें मास चामड्यापासून सोडवून काढिते झालां, आणि तुम्ही मातेला वासराशीं पुनः भेटविते झालां. आणि हे सुधन्व्याचे शूर पुत्र हो, तुम्ही तुमच्या कळेनें तुमच्या वृद्ध आईबापांस तरुण करिते झालां.

8. O Ribhus, you tore the cow's flesh off the skin, and reunited again the mother with the calf. Brave sons of Sudhanvan, with your art you made your aged parents young.

---

८. ह्या ऋचेचा भावार्थ असा आहे कीं, 'हे ऋभूंनो, तुमचा कौशलपराक्रम असा आहे कीं, तुम्हीं गाईचें मास तोडून तोडून तुकडे करून तें तिच्या कातड्यापासून तोडून काढिल्यावरहि तिला पुनः जीवंत करून तिची आणि तिच्या वत्साची पुनः गांठ घालून दिली. आणि तुमचे मातापितर म्हातारे झाले होते तरी त्यांला तुम्हीं आपल्या कौशल्यानें पुनः तरुण केलें.'

'गाईचें मास चामड्यापासून सोडवून काढिते झालां' =' निश्चर्मणः गामपिंशत.' पदशः अर्थ 'चामड्यापासून गाईस सोलते झालां.' भावार्थ असा आहे कीं, गाईला मारिलें असतांना, किंवा ती जीवंत असतांना तिचें चामडें काढिलें त्यामुळें ती मेली असतां, तिला जीवंत करून तिची वासराशीं गांठ पाडून दिली. 'निश्चर्मणो गामपिंशत ' याचा अर्थ सायणाचार्य कांहीं कथा सांगून करितात तो असा;– " पूर्वी एका ऋषीची गाय मेली. " त्या ऋषीनें त्या गाईचा वत्स पाहून " ऋभूची स्तुति केली. ऋभुदेव तिज- " सारिखी दुसरी गाय करून त्या चाम- " ड्यानें तिला सजवून त्या वत्साला " भेटविते झाले." कसें असलें तरी मेलेल्या गाईस तिच्या वत्साशीं पुनः मिळवून दिली हा ऋभूंचा पराक्रम या ऋचेंत विवक्षित आहे. त्यापेक्षां ' निश्चर्मणः अपिंशत ' याचा जो प्रथमदर्शनी अर्थ, तो सोडून देण्यांत हशील दिसत नाहीं. 'पिंश्' धातूचा अर्थ येथें आम्हीं केल्याप्रमाणें होतो याविषयीं ऋ. १. १६१. १० ( मांसम् एकः पिंशति सूनया ) हा मंत्र पहा.

वृत्तानुरोधेंकरून तिसऱ्या चरणांत ' सुअपस्यया '. असें म्हटलें पाहिजे.

**वाजेभिर्नो वाजसातावविड्ढ्यृभुमाँ इन्द्र चित्रमा दर्षि राधः ।**
**तन्नो मित्रो वरुणो मामहन्तामदितिः सिन्धुः पृथिवी उत द्यौः ॥**
**॥ ९ ॥ ३१ ॥**

वाजेभिः । नः । वाजऽसातौ । अविड्ढि । ऋभुऽमान् । इन्द्र । चित्रम् । आ । दर्षि । राधः ।
तत् । नः । मित्रः । वरुणः । ममहन्ताम् । अदितिः । सिन्धुः । पृथिवी । उत । द्यौः ॥ ९ ॥ ३१ ॥

## भाषायाम्.

९. हे इन्द्र, वाजसातौ (=संग्रामे) नः (=अस्मान्) वाजेभिः (=अश्वैः) ऋभुमान् (ऋभ्वादयो ये त्रयस्तैर्युक्तस्त्वम्) अविड्ढि (=रक्ष)। [अपि च] चित्रं राधः (=चायनीयं श्रेष्ठं धनम्) आ दर्षि (=आदरेण अस्मान् लम्भय)। तत् (=एतच्च =इन्द्रकर्तृकं संग्रामे साहाय्यं धनलाभं च) मित्रः, वरुणः, अदितिः (=एतन्नाम्नी देवानां माता) सिन्धुः (=समुद्राभिमानिनी देवता), पृथिवी उत द्यौः (=पृथिवी द्युलोकश्च) [इत्येते] नः ममहन्ताम् (=अस्मभ्यं पूजयन्तु=ददतु) ॥

९. हे इन्द्रा, ऋभूंसहित तूं आम्हांस आपल्या अश्वांच्या योगानें युद्धांत रक्ष आणि सुंदर धन [आम्हांस] प्राप्त होई असें कर. आणि हें [दान] मित्र, वरुण, अदिति, समुद्र, पृथिवी आणि द्यु हे आम्हांस देओत.

9. O Indra, do thou, accompanied by the Ribhus, protect us in battles with thy horses and make handsome spoil accessible [unto us]. And may Mitra, Varuna, Aditi, the Sea, Earth, and Heaven confirm this unto us.

९ येथें या सूक्ताचा उपसंहार झाला. ऋषि म्हणतो, 'हे इन्द्रा, याप्रमाणें आम्हीं ज्यांची स्तुति केली आहे ते तिघे ऋभु आणि तूं असे मिळून संग्रामाच्या प्रसंगीं तुरगादिरूप सैन्य घेऊन येऊन आमचें संरक्षण करा, आणि शत्रूची संपत्ति आम्हांस लूट मिळे असें करा, आणि आतां जें हें दान मागितलें तें मित्र, वरुण इत्यादि देव आम्हांस देओत.'

'ऋभूंसहित तूं'='ऋभुमान् [त्वम्]' म्ह० तूं आणि 'ऋभु' हे मिळून.

'युद्धांत'='वाजसातौ.' ह्या शब्दाचा असाच अर्थ आहे, व सायणाचार्यहि तसाच करितात. अक्षरशः अर्थ 'अन्नलाभ' अथवा 'धनलाभ.' त्यावरून धनलाभासाठीं (=लूट मिळविण्याकरितां) म्हणून केलेलें जें युद्ध तें असा अर्थ होऊं लागला, व त्यावरून मग साधारण कोणतेंहि युद्ध असा झाला.

---

## सूक्तम् १११.

आङ्गिरसः कुत्स ऋषिः । ऋभवो देवता । पञ्चमी त्रिष्टुप् । शिष्टा जगत्यः ॥

**तक्षन्रथं सुवृतं विद्मनापसस्तक्षन्हरी इन्द्रवाहा वृषण्वसू ।**
**तक्षन्पितृभ्यामृभवो युवद्वयस्तक्षन्वत्साय मातरं सचाभुवम् ॥ १ ॥**

तक्षन् । रथम् । सुऽवृतम् । विद्मनाऽअपसः । तक्षन् । हरी इति । इन्द्रऽवाहा । वृषण्वसू इति वृषण्ऽवसू ।
तक्षन् । पितृऽभ्याम् । ऋभवः । युवत् । वयः । तक्षन् । वत्साय । मातरम् । सचाऽभुवम् ॥ १ ॥

---

### भाषायाम्.

१. विद्मनापसः (=ज्ञानेन निष्पाद्यकर्माणः=कौशलेन वृद्धपित्रोः पुनर्यौवनयुक्तीकरणादीनि कर्माणि कुर्वन्त ऋभवः) [अश्विनोः] सुवृतं रथं (=शोभनं यथा तथा वर्तमानं गच्छन्तं रथं) तक्षन् (=अकुर्वन्) [अपि च] वृषण्वसू (=सेचनसमर्थेन बलेन युक्तौ=बलवन्तौ) इन्द्रवाहा (=इन्द्रवाहौ=इन्द्रं वहन्तौ) हरी (=एतन्नामकाविन्द्रस्याश्वौ) तक्षन् (=निर्ममिरे)। ऋभवः पितृभ्यां युवद् वयः (=स्वपितृभ्यां यौवनयुक्तामवस्थां) [पुनः] तक्षन् (=निर्ममिरे) [अपि च] सचाभुवं मातरं वत्साय (=वत्सेन सह भवन्तीं मातरं गां वत्सार्थे) तक्षन् (=अतक्षन्=निर्ममिरे)॥

## सूक्त १११.

ऋषि—कुत्स (पूर्वसूक्ताचा जो तोच). देवता—ऋभु. वृत्त—जगती, मात्र शेवटच्या ऋचेचें (पांचवीचें) त्रिष्टुभ्.

१. उत्कृष्ट ज्ञानानें कौशल्य-काम करणारे ऋभु [ अश्वींसाठीं ] चांगला फिरणारा रथ करिते झाले; इन्द्रातें वाहून नेणाऱ्या चलाख घोड्यांची पिवळी जोडी निर्माण करिते झाले; आपल्या मातापितरांला तारुण्यवय देते झाले, [आणि] वासरासाठीं जवळ असणारी माता उत्पन्न करिते झाले.

## HYMN 111.

To the *Ribhus.* By *Kutsa* (author of the previous hymn). Metre—*Jagatî* (1–4), *Trishṭubh.* (5)

1. The Ribhus working with skill made an easy rolling car [ for the As'vins ]; they made the pair of vigorous tawny horses that carry Indra; they gave youth to their parents; and they made for the calf the mother that stood near it.

---

१. हेंहि सूक्त कुत्स ऋषीचेंच आहे, आणि ऋभूंविषयीं आहे: ऋभु हे देवांचे कारागीर होत आणि त्यांनीं कोणकोणत्या देवांकरितां काय काय पदार्थ निर्माण केले आणि दुसरे कोणकोणते चमत्कार केले तें यांत सांगितलें आहे.

'चांगला फिरणारा' म्ह० ज्याचीं चाकें चांगलीं चालतात तसा. हा रथ ऋभूंनीं अश्विदेवांसाठीं केला, व ज्या कृत्यांसाठीं ऋभु अमरत्व पावले त्यांपैकीं हें एक होय.

'चलाख'=' वृषण्वसू.' पदशः अर्थ 'ज्यांला वृषन्=वृषण आहेत ते,' म्ह० अंडेल, खशीचे नव्हेत, अर्थात् 'चलाख,' 'पाणीदार.'

'वसु' याचा अर्थ 'ज्यास आहे तो' इतकाच. 'चपलाश्वगामी' (=' वाजिनीवसु ') याजवर दिलेली ऋ. १. २. ५ याजवरील टीप पहा.

'माता उत्पन्न करिते झाले'='तक्षन् मातरम्.' पूर्वीच्या सूक्ताच्या आठव्या ऋचेवरील टीप पहा.

**आ नो॑ य॒ज्ञाय॑ तक्षत ऋभु॒मद्वय॒: क्रत्वे॒ दक्षा॑य सु॒प्र॒जाव॑ती॒मिषं॑म् ।**
**यथा॒ क्षया॑म॒ सर्व॑वीरया वि॒शा तन्न॒: शर्धा॑य धासथा॒ स्वि॑न्द्रियम् २**

आ । न॒: । य॒ज्ञाय॑ । त॒क्ष॒त । ऋ॒भु॒ऽमत् । वय॑: । क्रत्वै॑ । दक्षा॑य । सु॒ऽप्र॒जाव॑तीम् । इषं॑म् ।
यथा॑ । क्षया॑म । सर्व॑ऽवीरया । वि॒शा । तत् । न॒: । शर्धा॑य । धा॒स॒थ॒ । सु । इ॒न्द्रि॒यम् ॥ २ ॥

**आ त॑क्षत सा॒तिम॒स्मभ्य॑मृभव॒: सा॒तिं रथा॑य सा॒तिमर्व॑ते नर॒: ।**
**सा॒तिं नो॒ जैत्रीं॒ सं म॑हेत वि॒श्वहा॑ जा॒मिमजा॑मिं॒ पृत॑नासु स॒क्ष-णिं॑म् ॥ ३ ॥**

आ । त॒क्ष॒त । सा॒तिम् । अ॒स्मभ्य॑म् । ऋ॒भ॒व॒: । सा॒तिम् । रथा॑य । सा॒तिम् । अर्व॑ते । न॒र॒: ।
सा॒तिम् । न॒: । जैत्री॑म् । सम् । म॒हे॒त॒ । वि॒श्वहा॑ । जा॒मिम् । अजा॑मिम् । पृत॑नासु । स॒क्षणि॑म् ॥ ३ ॥

---

## भाषायाम्.

२. [ हे ऋभवः ], [ यूयं ] नः यज्ञाय ( =अस्मभ्यं यज्ञकर्मणे=वयं युष्मदादिभ्यो देवेभ्यो यज्ञं यथा कुर्मस्तथा ) ऋभुमत् वयः आ तक्षत ( =ऋभुभिः=युष्माभिर्युक्तं=युष्माकं कौशलेन संयुक्तं यौवनं कुरुत=अस्मभ्यं प्रयच्छत ) [ अपि च ] क्रत्वे दक्षाय ( =कर्मणे बलाय च=वयं पराक्रमकर्मकरणसमर्था बलवन्तश्च यथा भवेम तथा ) सुप्रजावतीम् इषं ( =शोभनप्रजया सुपुत्रैः सुपौत्रादिभिश्च युक्तां संपदम् ) [ आ तक्षत=प्रयच्छत ] । [ अपि च ] यथा सर्ववीरया विशा क्षयाम ( =अस्माकं सकलपुत्रपौत्रादिभिः सहितया प्रजया=अस्माकं नगरवासिना जनेन सह यथा निवसाम ) तत् ( =तादृशम् ) इन्द्रियं ( =बलं ) नः शर्धाय ( =अस्माकं सेनायै ) सु धासथ ( =सुष्ठु स्थापयत=अवश्यमेव प्रयच्छत ) ॥

३. हे ऋभवः, अस्मभ्यं सातिं ( =धनम् ) आ तक्षत ( =संपाद्य प्रयच्छत ) । [ अस्माकं ] रथाय ( =रथेभ्यः ) सातिं ( =धनम् ) [ आ तक्षत ] [ अपि च ] हे नरः ( =शूरा ऋभवः ), [ अस्माकम् ] अर्वते ( =अश्वाय=अश्वेभ्यः ) सातिं ( =धनम् ) आ तक्षत ( =संपाद्य प्रयच्छत ) । [ ऋभूणां गणः ] पृतनासु ( =संग्रामे-

२. हे ऋभूंनो, यज्ञासाठीं आम्हांस कौशल्ययुक्त तारुण्य द्या, आणि पराक्रम [आणि] बळ हीं जेणेंकरून येतील अशी सुप्रजायुक्त संपत्ति द्या. आणि जेणेंकरून आम्ही आमच्या सकल योद्ध्यांसहित आपल्या गांवीं सुखें वास करूं असा पुरुषार्थ आमच्या सेनेच्या आंगीं घाला.

2. Give us skilful youth that we may sacrifice, and [give us] food accompanied by good children that we may have energy and power. Do grant to our army that prowess whereby we may live happy in our town with all our heroes.

३. हे ऋभूंनो, तुम्ही आम्हांस लूट मिळवून द्या, [आमच्या] रथास लूट [मिळवून द्या], [आणि] हे शूर ऋभूंनो, [आमच्या] घोड्यास लूट [मिळवून द्या].—[ऋभुगण] नित्य आम्हांस अशी लूट मिळवून देओ कीं जी [आमचा] बांधव असेल त्याला [आणि] बांधव नसेल तशा शत्रूलाहि, युद्धांत विजयी असला तरी, पराभूत करूं शकेल.

3. O Ṛibhus, grant booty unto us, booty [to our] chariot [and], brave ones, booty to [our] horse.—May all the Ṛibhus give us always such booty as will overpower those [enemies] [whether] related [or] not related [to us], who are even victorious in battles.

---

२. 'हे ऋभूंनो, जेणेंकरून आम्ही यज्ञ करण्यास सदैव समर्थ राहूं असें तुमच्या कौशल्यासारिख्या कौशल्यानें परिपूर्ण यौवन आम्हांस प्राप्त करून द्या; आणि जेणेंकरून पराक्रम करण्याचा उत्साह आणि बळ हीं प्राप्त होतील अशी सुसंतति आणि संपत्ति द्या; आणि आम्हांस आमच्या पुत्रपौत्रांसहित आणि आमच्या गांवच्या लोकांसहित सुखें राहावयास सांपडेल अशा रीतीचा पुरुषार्थ आमच्या सैन्याच्या आंगीं स्थापन करा.'

'यज्ञासाठीं'=' आम्हीं यज्ञ करावा म्हणून.'

'पराक्रम आणि बळ'=' क्रत्वे दक्षाय.' ऋ. १०. ५७. ४, १०. २५. १, ४. १०. २, ४. ३७. २, ५. ४३.

**ऋभुक्षणमिन्द्रमा हुव ऊतयं ऋभून्वाजान्मरुतः सोमपीतये ।**
**उभा मित्रावरुणा नूनमश्विना ते नो हिन्वन्तु सातये धिये जिषे ॥४**

ऋभुक्षणम् । इन्द्रम् । आ । हुवे । ऊतये । ऋभून् । वाजान् । मरुतः। सोमऽपीतये ।
उभा । मित्रावरुणा । नूनम् । अश्विना । ते । नः । हिन्वन्तु । सातये । धिये । जिषे ॥ ४ ॥

---

षु ) सक्षणिं ( =विजयशीलं ) जामिं अजामिं ( =बान्धवभूतम् अबान्धवभूतं वा शत्रुं ) जैत्रीं ( =जैत्रीम्=अभिभवन्तीं ) सातिं ( =धनं ) विश्वहा ( =विश्वेषु अहःसु =सर्वदा ) नः सं महेत ( =अस्मभ्यं संपूजयतु=ददातु ) ॥

---

## भाषायाम्.

४. [ अहम् ] ऋभुक्षणम् (=ऋभूणामपि प्रभवन्तं=महान्तम्) इन्द्रं [तथा] ऋभून् ( =विभ्ववाजयुक्तम् ऋभुं ) [ तथैव ] वाजान् ( =ऋभुविभ्वयुक्तं वाजम् एतन्नामकं देवम् ) [ अपि च ] मरुतः ऊतये सोमपीतये ( =मम रक्षणाय सोमपानाय च ) आ हुवे ( =आह्वयामि ) । उभा मित्रावरुणा ( =उभावपि मित्रावरुणौ ) नूनम् [ उभा ] अश्विना ( =उभावपि अश्विनौ च ) [ आ हुवे=आह्वयामि ] । ते [ सर्वे ] नः ( =अस्मान् ) सातये ( =धनाय=धनलाभाय ) धिये ( =बुद्धये=प्रज्ञालाभाय ) जिषे ( =जेतुं=जयलाभाय च ) हिन्वन्तु ( =प्रेरयन्तु=तेऽस्मभ्यं धनं प्रज्ञां जयं च प्रयच्छन्तु ) ॥

---

५ हे मंत्र पहा.

या मंत्रांवरून दिसतें कीं ' क्रत्वे दक्षाय ' हे शब्द एका नियमित अर्थी वारंवार येणारे होत.

' कौशल्ययुक्त तारुण्य ' =' ऋभुमत् वयः.' अक्षरशः अर्थ 'ऋभूंसहित वय.' म्ह० ऋभूंच्या कौशल्याप्रमाणें ज्यांत कौशल्य आहे असें यौवन.

' सुप्रजायुक्त संपत्ति '=' सुप्रजावतीमिषम्.' म्ह० संततियुक्त संपत्ति.

' सेनेच्या आंगीं'='शर्धाय.' आमच्या पक्षास असें बळ द्या कीं आमच्या शत्रूचा आम्हांस पराभव करतां येईल व तेणेंकरून आम्ही आपल्या गांवीं शत्रूच्या उपद्रवाशिवाय खुशाल राहूं.

३. मंत्राचें तात्पर्य असें कीं, ' आम्ही रथांत बसून, घोड्यावरून, अथवा पायीं लढलों तरी सदैव आम्हांला जय प्राप्त होवो, आणि आम्हांस लूट मिळो. मग तो शत्रु आमचा बांधव असो किंवा

४. [ माझें ] रक्षण करण्यासाठीं [आणि] सोम पिण्यासाठीं मी महान् इन्द्र, ऋभु, विभ्वा, वाज, [आणि] मरुत् यांस बोलावितों, आणि दोघेहि मित्रावरुण [आणि] अश्वी देव ह्यांजलाहि [बोलावितों]. ते आम्हांस धन, प्रज्ञा [आणि] जय हीं प्राप्त करून देओत.

4. I invoke great Indra, Ṛibhu with his friends, Vâja with his friends,[and] the Maruts, to protect me [ and ] to drink the Soma; I also [ invoke ] the pairs of Mitrâvaruṇas [ and ] of the As'vins. May they inspire me to [ win ] booty, wisdom [ and ] victory.

---

परकी असो, लढाईंत तो भितरा असो अथवा शूर असो.'

'बांधव असेल त्याला [ व ] बांधव नसेल त्याला पराभूत करूं शकेल'='जामिम् अजामिं जैत्रीम्.' यावरून उघड होतें कीं वैदिक युगांतहि लोक आपल्या भाऊबंदांबरोबर लढत होते. भाऊबंदकी म्हणजे लढालढ ही म्हण ह्या दुष्ट कलियुगांतीलच नव्हे ! सू. १००, मं. ११ हाहि मंत्र पहा.

---

४. 'ऋभु, विभ्वा आणि वाज हे जे ऋभु देव त्यांला, आणि इंद्र कीं जो ऋभूंपेक्षांहि मोठा त्याला, आणि मरुत् आणि मित्र, वरुण आणि अश्वी देव यांला, माझी अशी प्रार्थना आहे कीं, त्यांनीं येऊन माझें रक्षण करावें आणि मी अर्पण केलेला सोमरस प्यावा.'

'ऋभुक्षणम्.' 'ऋभुक्षिन्' हा शब्द वेदांत पुष्कळ ठिकाणीं आला आहे. त्याचे दोन अर्थ होतात. एक हा कीं देवतावाचक जो ऋभुशब्द त्याच देवतेचा वाचक. दुसरा हा कीं ऋभु जे त्यांचाहि प्रभु म्हणजे मोठा हें विशेषण होय. हें ऋभुक्षिन् विशेषण इन्द्रास, मरुतांस व इतर देवांस लाविलेलें आढळतें. सायणाचार्य प्रस्तुत स्थळीं विशेषणार्थी घेऊन इन्द्राकडे लावतात आणि आम्हीं केल्याप्रमाणें 'महान्' असा अर्थ करितात.

'ऋभु, विभ्वा, वाज'='ऋभून् वाजान्.' 'ऋभु', 'विभ्वा' आणि 'वाज' हे जे तीन देव आणि ज्या तिघांसहि 'ऋभु' असें नांव आहे ते. तिघांसहि जसें 'ऋभु' ही संज्ञा आहे तशी तिघांसहि 'वाज' ही संज्ञा आहे असें या ऋचेवरून दिसतें. सायणाचार्य आणि यास्क यांचाहि हाच भावार्थ आहे.

'प्राप्त करोत'='हिन्वन्तु.' पदशः अर्थ 'आम्हांस प्रेरोत.'

ऋचेच्या पूर्वार्धाचा भावार्थ हा कीं, देव माझें रक्षण करण्यास येओत आणि मीं अर्पण केलेला सोमरस पिओत.

ऋभुर्भराय सं शिशातु सातिं समर्यजिद्वाजो अस्माँ अविष्टु ।
तन्नो मित्रो वरुणो मामहन्तामदितिः सिन्धुः पृथिवी उत द्यौः ॥
॥ ५ ॥ ३२ ॥

ऋभुः । भराय । सम् । शिशातु । सातिम् । समर्यऽजित् । वाजः ।
अस्मान् । अविष्टु ।
तत् । नः । मित्रः । वरुणः । ममहन्ताम् । अदितिः । सिन्धुः । पृथिवी । उत । द्यौः ॥ ५ ॥ ३२ ॥

---

## भाषायाम्.

५. ऋभुः भराय (=संग्रामाय) सातिं (=धनं) सं शिशातु (=सं तक्षतु=निर्मिमीताम्)। समर्यजित् वाजः (=संग्रामे विजयशीलो वाजः=एतन्नामको देवः) अस्मान् अविष्टु (=अस्मान् रक्षतु)। तत् (=एतस्मिन् सूक्ते यत्प्रार्थितं तत्) मित्रः, वरुणः, अदितिः (=एतन्नाम्नी देवानां माता) सिन्धुः (=समुद्राभिमानिनी देवता), पृथिवी उत द्यौः (=पृथिवी द्युलोकश्च) [इत्येते] नः ममहन्ताम् (=अस्मभ्यं पूजयन्तु=ददतु)॥

---

| | |
|---|---|
| हिज हायनेस धि ठाकूर साहेब भावनगर .... .... | १५९– ६ |
| श्रीमंत हिंमत सिंगजी महाराज ध्रांगध्रा. .... .... .... | १२–१२ |
| रा. सा. पांडुरंग नारायण मामलेदार.... .... .... | ६– ६ |
| बाजीभाई मणीशंकर कारभारी वळास्टेट. .... .... | ६– ६ |
| वदेका समस्त ब्राह्मण. . .... .... .... .... | ६– ६ |
| लीलाधर हरकचंद. .... .... .... .... .... | ६– ६ |
| मि. एस. व्यंकट वर्दी अयंगार.: .... .... .... | ६–१२ |
| ,, मोतीलाल माधवराय .... .... .... .... | ६– ६ |
| ,, एम तिमया नायब शिरस्तेदार. .... .... .... | ६– ० |
| दरबार लायब्ररी. .... .... .... .... .... | ६– ६ |
| गुजराथ व्हर्न्याक्युलर सोसायटी. . .... .... .... | ३३– ८ |

Registered No. 110 of 1878.

## NOTICE.

The second Valuem of the Vedârthayatna will be finished with the last hymn ( 121 ) of the first Ashṭaka of the Regveda Samhitâ, that is, in about four or five more parts.

## विशेष सूचना.

पहिल्या अष्टकाचे शेवटील सूक्त ( १२१ ) संपलें म्हणजे सुमारें आणखी ४ किंवा ५ अंक झाले म्हणजे हा वेदार्थयत्नाचा दुसरा भाग संपेल.

## सूचना.

| | रु. | आ. |
|---|---|---|
| वर्षाची वर्गणी, आगाऊ | ६ | ० |
| मुंबईबाहेर राहणारांस टपाल हंशिलाबद्दल दरवर्षाचे | ० | ६ |

All communications to be addressed to the Manager Mr. Mahâdev Nârâyan Pandit, No. 29 *Maroba Popatji's Oart, Kalku Devi Road, Bombay.*

ग्रंथकर्त्याच्या नांवचा वगैरे सर्व प्रकारचा पत्रव्यवहार मुंबई मोरोबा पोपटजीची वाडी घर नंबर २९, या पत्त्यावर रा. रा. महादेव नारायण पंडित "म्यानेजर वेदार्थयत्न" यांच्याशीं ठेवावा.

**विशेष सूचना.**—आमच्या कितीएक वर्गणीदारांकडे गेल्या वर्षांची बाकी येणें आहे ती त्याणीं मेहेरबानी करून लवकर पाठवून द्यावी.

तिकिटें पाठविणें झाल्यास अर्ध्या आण्याच्या दराचीं असून दर रुपयास अर्धा आणा वर्तावा असावा. नाटपेड पत्र घेतलें जाणार नाहीं.

THE

# VEDÂRTHAYATNA

OR

AN ATTEMPT TO INTERPRET THE VEDAS.

---

## वेदार्थयत्न.

---

### ऋग्वेदसंहिता

पदांसहित व

तिचें मराठी आणि इंग्रजी भाषांतर.

पुस्तक २. अंक १३. जून सन १८७८. मासिक भाग २७.

मुंबईः

"निर्णयसागर" छापखान्यांत छापिलें.

(हें सन १८६७ च्या २५ व्या आक्टाप्रमाणें नोंदलें आहे.)

माझे

सर्व आर्य बंधु व भगिनी

यांस

हें भाषांतर

सादर समर्पण केलें आहे.

भाषांतरकर्ता.

५. ऋभु आम्हांस युद्धाकरितां धन निर्माण करून देओ, लढाई जिंकणारा वाज आम्हांस रक्षो. आणि हें [ दान ] मित्र, वरुण, अदिति, सिंधु, पृथिवी आणि द्यू हे आम्हांस देओत.

5. May Ṛibhu prepare [ us ] wealth for war, [and] may Vâja, victorious in battle, protect us. And may Mitra, Varuṇa, Aditi, the Sea, Earth and Heaven confirm this unto us.

---

५. या शेवटच्या मंत्रांत ऋभु, विभ्वा, आणि वाज हे जे तीन ऋभु देव, त्यांतून ऋभूस अशी प्रार्थना आहे कीं, 'त्याणें संपत्ति सिद्ध करून द्यावी, कीं जेणें कुत्स ऋषीला युद्ध करावयास सांपडेल आणि वाज याला अशी प्रार्थना आहे कीं, त्याणें कुत्साला आणि त्याच्या मित्रांला युद्धांत रक्षावें, शत्रूपासून उपद्रव होऊं देऊं नये.'

'युद्धाकरितां' म्ह० आम्हांस युद्ध करण्याचा जो खर्च लागणार तो निभावण्याकरितां असा उघड अर्थ दिसतो.

'वाज.' ऋभु, विभ्वा आणि वाज ह्या तिघांतील तिसरा जो देव तो.

---

m 1

## सूक्तम् ११२.

आङ्गिरसः कुत्स ऋषिः । द्यावापृथिवीदेवताकं प्रथमम् आग्नेयं च द्वितीयं पादं वर्जयित्वा अश्विनौ देवता । आन्त्ये द्वे ऋचौ त्रिष्टुभौ । शिष्टस्य सूक्तस्य जगती छन्दः ॥

**ईळे द्यावापृथिवी पूर्वचित्तयेऽग्निं घर्मं सुरुचं यामन्निष्टये ।**
**याभिर्भरे कारमंशाय जिन्वथस्ताभिरू षु ऊतिभिरश्विना गतम् १**

ईळे । द्यावापृथिवी इति । पूर्वऽचित्तये । अग्निम् । घर्मम् । सुऽरुचम् । यामन् । इष्टये ।

याभिः । भरे । कारम् । अंशाय । जिन्वथः । ताभिः । ऊम् इति । सु । ऊतिऽभिः । अश्विना । आ । गतम् ॥ १ ॥

---

### भाषायाम्.

१. [अहं] पूर्वचित्तये (=सर्वेभ्योपि स्तोतृभ्यः पूर्वज्ञानाय=सर्वेषां स्तोतॄणां मध्ये ममैव स्तोत्रं द्यावापृथिव्यौ प्रथमं यथा शृणुयातां तथा) द्यावापृथिवी (=द्यावापृथिव्यौ) ईळे (=स्तौमि) । यामन् (=यामनि=कर्मणि=देवयजने) इष्टये (=एषणाय=एषणं प्रेरणं यथा स्यात्तथा) (=अश्विनोरुपासनायां वयं यथा प्रवृत्ता भवामस्तथा) घर्मं (=दीप्तं) सुरुचं (=शोभनतेजस्कम्) अग्निम् [ईळे] । [अपि च] याभिः [ऊतिभिः] (=यैः संरक्षणैः) [युवां] भरे (=संग्रामे) अंशाय (=युवयोः पक्षाय) कारं जिन्वथः (=जयघोषरूपं सिंहनादं प्रेरयथः) ताभिरू ऊतिभिः (=तैरेव संरक्षणैः सह) अश्विना (=हे अश्विनौ), सु आ गतम् (=अस्मान् प्रति सुष्ठु अवश्यम् आगच्छतम्) ॥

अत्रेदमुक्तं भवति । अहं द्यावापृथिव्यावग्निमश्विनौ च स्तौमि । हे अश्विनौ, येन रक्षणेन युवां युवयोरुपासकेभ्यः संग्रामे जयं प्रयच्छथस्तेनैव रक्षणेन सांप्रतमस्मान् प्रति आगच्छतमिति ॥

## सूक्त ११२.

ऋषि–कुत्स ( पूर्वसूक्ताचा जो तोच ). देवता–पहिल्या मंत्राच्या पहिल्या पादाची द्यावापृथिवी, दुसऱ्या पादाची अग्नि, आणि राहिलेल्या सर्व सूक्ताची अश्वी देव. वृत्त–जगती, मात्र २४ आणि २५ या मंत्रांचें वृत्त त्रिष्टुभ्.

१. मजकडेस प्रथम चित्त द्यावें म्हणून मी द्यावापृथिवींला स्तवितों, [आणि] उष्मरूपी [आणि] तेजस्वी अग्नीला यजनकर्मास आरंभ होण्यासाठीं [मी स्तवितों]. ज्या [प्रसादां]नीं युद्धांत तुम्ही [आपल्या] पक्षाकडून सिंहनाद करवितां त्या प्रसादांसहित, हे अश्वीदेव हो, तुम्ही अवश्य येथें या.

## HYMN 112.

To the *As'vins* except that the first half of the first couplet refers to *Dyâvâpṛithivî* (i.e. Heaven and Earth) and *Agni*. By *Kutsa* (author of the previous hymn). Metre, *Jagatî* except in verses 24 and 25 where it is *Trishṭubh*.

1. I praise Heaven and Earth that they may attend to me first, [and] Agni, the splendid effulgence, that he may speed the rite. With those favours, with which you prompt the war-cry of victory on [your] side in battle—with those, O As'vins, do come hither.

---

१. हेंहि सूक्त कुत्स ऋषीचेंच आहे. देवता मात्र अश्वी हे होत. पहिल्या ऋचेचा पहिला चरण मात्र द्युलोक आणि भूलोक यांविषयीं आहे आणि दुसरा चरण अग्नीविषयीं आहे. ऋषि म्हणतो, 'मी द्यावापृथिवींनीं मजवर सर्वांअगोदर कृपा करावी म्हणून त्यांजला स्तवितों, आणि अग्नीनें प्रगट होऊन यज्ञकर्मीला आरंभ करावा म्हणून त्याला स्तवितों. तसाच अश्वींलाहि स्तवितों. तर हे अश्वी हो, जीं साहाय्यें घेऊन तुम्ही आपल्या पक्षाला जय देऊन त्यांजकडून सिंहनाद करवितां तीं साहाय्यें घेऊन तुम्ही या.'

'यजनकर्माला आरंभ होण्यासाठीं'= 'यामन् इष्टये'='यामनि एषितुम्.' म्ह० देवांची आराधना करण्याविषयीं प्रेरणा व्हावी म्हणून. 'यामन्' शब्दाचा अक्षरशः अर्थ 'जाणें,' 'रस्ता,' 'जवळ जाणें' असा होतो. नंतर उपासना, आराधना, अथवा आराधनाकर्म असा होतो. (ऋ. १. २५. २०, १.

**युवोर्दानाय सुभरा असश्चतो रथमा तस्थुर्वचसं न मन्तवे ।**
**याभिर्धियोऽवथः कर्मन्निष्टये ताभिरू षु ऊतिभिरश्विना गतम् ॥२**

युवोः । दानाय । सुऽभराः । असश्चतः । रथम् । आ । तस्थुः । वचसम् । न । मन्तवे ।
याभिः । धियः । अवथः । कर्मन् । इष्टये । ताभिः । ऊम् इति । सु । ऊतिऽभिः । अश्विना । आ । गतम् ॥ २ ॥

---

## भाषायाम्.

२. [ हे अश्विनौ ], युवोः (=युवयोः) दानाय (=युष्मत्कर्तृकधनदानार्थं) सुभराः (=शोभनस्तोत्रयुक्ता उपासका) असश्चतः (=अन्यत्रानासक्ताः सन्तो), [ जना ] मन्तवे वचसं न (=विपश्चितं कंचित् बुभुत्सितार्थलाभाय यथा व्याप्नुवन्ति तथा) [ युवयो ] रथम् आ तस्थुः (=आतिष्ठन्ति=व्याप्नुवन्ति) । याभिः ऊतिभिः (=यैः संरक्षणैः) धियः (=ध्यातॄन्=उपासकान्) कर्मन् इष्टये अवथः (=कर्मणि प्रवृत्तये संरक्षथः=संरक्ष्य उपासनायां प्रेरयथः) ताभिरू ऊतिभिः (=तैरेव संरक्षणैः सह) अश्विना (=हे अश्विनौ), सु आ गतम् (=अस्मान् प्रति सुष्टु अवश्यम् आगच्छतम्) ॥

---

३३. २, १. ११६. १३ इत्यादि पुष्कळ मंत्रांचीं प्रमाणें आहेत. सायणाचार्य सुद्धां ह्या शेवटच्या मंत्रावरील भाष्यांत यामन् म्ह० स्तोत्र असा अर्थ करितात.) 'यामन् इष्टये' ह्या पदांचा संबंध एकत्र केला पाहिजे. 'इष्टये'चा पदशः अर्थ 'प्रेरण्यासाठीं.'

'मजकडे प्रथम चित्त द्यावें म्हणून' ='पूर्वचित्तये.' ऋग्वेदांत 'पूर्वचित्ति' शब्द नित्य चतुर्थ्यन्तच आढळतो, व त्याचा अर्थ क्रियाविशेषणासारिखा 'प्रथम,' 'सर्वांआधीं' इतकाच होतो असें कितीएक विद्वान् म्हणतात. आम्हीं येथें सायणांस अनुसरलों आहों. (ऋ. १. ८४. १२, १. १५९. ३, ८. ३. ९ इत्यादि पहा.)

'सिंहनाद'='कारम्.' युद्धांत जयकाराचें स्फुरण आणि उत्तेजन येण्यासाठीं गाणें गातात तें.

'गावविता'=' जिन्वथः.' अक्षरशः, 'प्रेरितां.'

उत्तरार्धाचें तात्पर्यः—' हे अश्वी देव हो, युद्धप्रसंगीं ज्या पक्षावर तुमची कृपा असते, त्या पक्षाचा तुम्ही जय करवितां, आणि तेणेंकरून त्या बाजूच्या योद्ध्यांस शौर्याचें स्फुरण आणितां, तर तशी

२. [ हे अश्वी हो ], विद्वान बुद्धिमंताकडेस जसे [ लोक ] मसलत विचारण्यासाठीं [ गर्दी करितात ] तसे, तुम्हीं धन द्यावें म्हणून [ उपासक लोक ] उत्तम स्तोत्रें गात गात अनन्यभावेंकरून तुमच्या रथाजवळ गर्दी करितात. [ तर ] हे अश्वी हो, ज्या [ प्रसादां]नीं तुम्ही उपासकांस रक्षून आराधनेच्या ठायीं प्रवृत्त करितां त्या प्रसादांसहित, हे अश्वी हो, तुम्ही अवश्य येथें या.

2. Men singing excellent songs crowd round your chariot for your favours like [as people crowd round] an eloquent sage for counsel. With those favours with which you protect the pious and lead them to worship—with those, O As'vins, do come hither.

---

कृपा घेऊन, म्ह० त्या कृपेसहित, तुम्ही मजकडेस या. या सूक्तांत 'ज्या प्रसादांसहित' असें जेथें जेथें लिहिलें आहे, तेथें तेथें प्रसाद म्हणजे अश्वींची कृपा, मेहेरबानी, अनुग्रह असा अर्थ समजावयाचा. आणि चवथा चरण पालवपदासारखा आहे.

---

२. 'हे अश्वी देव हो, कोणत्याहि गोष्टीविषयीं एकाद्या प्रख्यात विद्वान् आणि चतुर पुरुषाचें मत विचारण्यासाठीं जसे लोक त्याच्या घरीं दरबाराप्रमाणें जमतात, तसे स्तोते लोक उत्तम गायनें गात गात तुमचा अनुग्रह व्हावा आणि तुम्हांकडून धन मिळावें म्हणून तुमच्या रथाजवळ जमून गर्दी करीत असतात. तर तुम्ही ज्या प्रसादांनीं उपासक जनांचें कल्याण करून त्यांस उपासनेविषयीं प्रवृत्त करितां त्या प्रसादांसहित तुम्ही आम्हांजवळ अवश्य या ' असा भावार्थ.

'उपासकांस रक्षून आराधनेच्या ठायीं प्रवृत्त करितां '=' धियः कर्मन् इष्टये अवथः.' अक्षरशः अर्थ ' स्तोत्र करणाऱ्या लोकांस आराधनेंत प्रवृत्तीसाठीं रक्षितां;' म्ह० त्यांनीं आराधना करीत राहावें म्हणून त्यांस रक्षितां.

**युवं तासां दिव्यस्य प्रशासने विशां क्षयथो अमृतस्य मज्मना ।**
**याभिर्धेनुमस्वं पिन्वथो नरा ताभिरू षु ऊतिभिरश्विना गतम् ॥३**

युवम् । तासाम् । दिव्यस्य । प्रऽशासने । विशाम् । क्षयथः । अमृत-
स्य । मज्मना ।
याभिः । धेनुम् । अस्वम् । पिन्वथः । नरा । ताभिः । ऊम् इति । सु ।
ऊतिऽभिः । अश्विना । आ । गतम् ॥ ३ ॥

**याभिः परिज्मा तनयस्य मज्मना द्विमाता तूर्षु तरणिर्विभूषति ।**
**याभिस्त्रिमन्तुरभवद्विचक्षणस्ताभिरू षु ऊतिभिरश्विना गतम् ॥४**

याभिः । परिऽज्मा । तनयस्य । मज्मना । द्विऽमाता । तूर्षु । तरणिः ।
विऽभूषति ।
याभिः । त्रिऽमन्तुः । अभवत् । विऽचक्षणः । ताभिः । ऊम् इति ।
सु । ऊतिऽभिः । अश्विना । आ । गतम् ॥ ४ ॥

---

## भाषायाम्.

३. [ हे अश्विनौ, ] दिव्यस्य (=दिवि भवस्य) अमृतस्य (=मरणरहितस्य) [ सोमस्य पानेन समुत्पन्नेन ] मज्मना (=बलेन) युवं (=युवां) तासां विशां (=तासां प्रसिद्धानां दिवि भवानां देवरूपाणां प्रजानां) प्रशासने (=प्रकृष्टानुशासने =शिक्षणे) क्षयथः (=ईश्वरौ भवथः)। हे नरा (=नरौ=शूरौ), याभिः [ ऊति-भिः ] अस्वं धेनुं (=प्रसवासमर्थां गां) पिन्वथः (=सिञ्चथः=पयसा पूरयथः) ताभिरू ऊतिभिः (=तैरेव संरक्षणैः) हे अश्विना (=अश्विनौ), सु आ गतं (=सुष्ठु =अवश्यम् अस्मान् प्रति आगच्छतम्) ॥

४. परिज्मा (=परितो गन्ता=इतस्ततो भ्रमिता) द्विमाता (=द्विमातृकः= द्वयोर्मात्रोः पुत्रो) [ वायुस् ] तनयस्य मज्मना (=स्वकीयस्य पुत्रस्य बलेन=अग्नेर्ब-लेन) तूर्षु तरणिः (=शीघ्रगामिष्वपि शीघ्रगामी सन्) याभिः [ ऊतिभिः ) (=यैः प्रसादैः) विभूषति (=व्याप्तो भवति=सर्वमवकाशं व्याप्नोति), [ अपि च ] याभिः [ ऊतिभिः ] त्रिमन्तुः (=एतन्नामकः कश्चित् ऋषिः=" कक्षीवान् ") विचक्षणः (=विप्रकृष्टज्ञानयुक्तः) अभवत् ताभिरू ऊतिभिः (=तैरेव संरक्षणैः) हे अश्विना (=अश्विनौ), सु आ गतं (=सुष्ठु=अवश्यम् अस्मान् प्रति आगच्छतम्) ॥

३. [ हे अश्वी हो,] दिव्य [ आणि ] अमर [ सोमा]च्या बळेंकरून त्या [ स्वर्गांतील ] प्रजांवर राज्य करण्यास तुम्ही समर्थ आहां. तर हे शूरांनो, ज्या [प्रसादां]नीं तुम्ही वांझ गाईला दुधानें भरिते झालां त्याच प्रसादांसहित, हे अश्वी हो, तुम्ही अवश्य येथें या.

४. ज्या [ प्रसादां]नीं, भ्रमण करणारा दोन आईंचा शीघ्रगामी पुत्र तनयाच्या बळानें चपलगामी जनामध्येंहि चपलगामी विराजतो, [ आणि] ज्या [प्रसादां]नीं त्रिमंतु विद्वान् झाला, त्याच प्रसादांसहित, हे अश्वी हो, तुम्ही अवश्य येथें या.

3. Through the power of the immortal [ Soma ] of heaven you are powerful to rule over those [ immortal ] people [ of heaven ]. With those favours with which, O brave ones, you filled the barren cow with milk— with those, O As'vins, do come hither.

4. With those favours, through which the Wandering Son of the two mothers pervades all, impetuous among the impetuous, by the power of [ his ] son; and [ with those ] favours by which Trimantu became wise— with those, O As'vins, do come hither.

---

३. 'हे अश्वी देव हो, दिव्य आणि अमर असा जो सोम, तो पिऊन तुम्हांस जें विलक्षण बळ येतें त्याच्या योगानें तुम्ही स्वर्गस्थ देवलोकांचे राजे होऊन गेलां आहां. तुम्ही चमत्कार करून दाखविण्याविषयीं तर इतके कुशळ आहां कीं तुम्हीं वांझ गाईच्या आंगीं दूध उत्पन्न केलें ती कथा सर्वांस ठाऊक आहे. तर ज्या पराक्रमांनीं तुम्हीं तसें केलें त्यांसहित तुम्ही आज मजजवळ अवश्य या.'

हा भावार्थ आम्हीं सायणांस अनुसरून दिला आहे, आणि विचाराअंतीं सायणाचार्यांचें भाष्य येथें आम्हांस बरोबर आहे असें वाटतें. कितीएक पाश्चिमात्य विद्वान् 'अमृत' शब्दाचा अर्थ 'अमरत्व' असा येथें घेतात आणि 'दिव्य' शब्दाचा अर्थ द्युलोक असा करितात. परंतु सायणभाष्य येथें अधिक विश्वसनीय आहे.

'अमर सोमाच्या बळेंकरून'='अमृतस्य मज्मना.' अश्वींस तैत्तिरीय ब्रा० ३. १. २. ११ यांत 'अमृतस्य गोपौ' (=अमर सोमाचे अथवा अमरत्वाचे रक्षक) असें म्हटलें आहे.

'स्वर्गांतील प्रजा '=' तासां विशाम्.' अक्षरशः अर्थ 'त्या लोकांच्या.' ते लोक म्हणजे संदर्भावरून दिव्य लोकींच्या प्रजा=देव असा अर्थ केला पाहिजे.

'वांझ गाईला दूध उत्पन्न करिते झालां.' 'शंयु' नामक ऋषीची गाय वांझ होती तिला अश्वी दूध उत्पन्न क-

**याभी रेभं निवृतं सितमद्भ्य उद्वन्दनमैरयतं स्वर्दृशे ।**
**याभिः कण्वं प्र सिषासन्तमावतं ताभिरू षु ऊतिभिरश्विना गतम् ॥ ५ ॥ ३३ ॥**

याभिः । रेभम् । निऽवृतम् । सितम् । अत्ऽभ्यः । उत् । वन्दनम् । ऐरयतम् । स्वः । दृशे ।
याभिः । कण्वम् । प्र । सिसासन्तम् । आवतम् । ताभिः । ऊम् इति । सु । ऊतिऽभिः । अश्विना । आ । गतम् ॥ ९ ॥ ३३ ॥

## भाषायाम्.

५. याभिः [ ऊतिभिः ] ( =यैः संरक्षणैः ) निवृतं सितं [ च ] ( =अवरुद्धं पाशबद्धं च ) रेभं वन्दनं [ च ] ( =एतन्नामकं कंचिदृषिं ) स्वः दृशे ( =सूर्यप्रकाशं द्रष्टुं=सूर्यप्रकाशदर्शनाय ) अद्भ्यः ( =उदकेभ्यः ) उद् ऐरयतम् ( =उदगमयतम् ) ( =उदकेभ्य उद्धृत्य तयोः सूर्यदर्शनमकारयतम् ) [ अपि च ] याभिः [ ऊतिभिः ] सिषासन्तं ( =धनमिच्छन्तं ) कण्वम् ( =एतन्नामानमृषिम् ) आवतम् ( =अरक्षतं ) ताभिरू ऊतिभिः ( =तैरेव संरक्षणैः ) हे अश्विना ( =अश्विनौ ), सु आ गतं (=सुष्ठु =अवश्यम् अस्मान् प्रति आगच्छतम् ) ॥

रिते झाले अशी कथा आहे. याच सूक्ताचा १६ वा मंत्र पहा.

४. या ऋचेचा भावार्थ जरी स्पष्ट आहे आणि शब्दशः अर्थ जरी उघड आहे तथापि प्रथमार्धांत अश्वींच्या प्रसादानें विजयी होणारा जो दोन आईचा पुत्र सांगितला आहे, तो कोण हें नीट समजत नाहीं. सायणांस अनुसरून आम्हीं येथें शब्दशः अर्थ केला आहे. परंतु दोन मातांचा पुत्र कोण, आणि तनयाच्या मोठेपणामुळें म्हणजे काय, आणि तो चपलगामी पुरुषांमध्यें अश्वींच्या संरक्षणांनीं चपलगामी कसा झाला, तें नीट समजत नाहीं.

सायणाचार्यांच्या भाष्याप्रमाणें ' भ्रमण करणारा दोन आईचा शीघ्रगामी पुत्र ' (=' परिज्मा ') म्हणजे वायु, ' तनयाच्या ' (=' तनयस्य ') म्ह० अग्नीच्या. (' द्विमाता ' शब्द ते किंचित् निराळ्या रीतीनें लावितात ).

इतकें निश्चित आहे कीं ' परिज्मा ' हें वायूचें वाचक खरें आणि ' द्विमाता ' ( =दोन मातांपासून म्ह० दोन अरणींपासून झालेला ) हें अग्नीचें वाचक खरें; परंतु सायणाचार्य ' द्विमाता ' हें ' द्विमातुः ' या षष्ठीऐवजीं घेऊन त्याचा संबंध ' तनयस्य ' याच्याशीं लावितात.

अश्वी देवांनीं प्रसन्न होऊन वायूला

५. ज्या [ प्रसादां]नीं तुम्ही, अवरुद्ध [ आणि ] पाशबद्ध रेभाला [ आणि ] वन्दनाला पाण्यांतून वर काढून प्रकाश दाखविते झालां, [ आणि ] ज्या [ प्रसादां]नीं तुम्ही [ धन]लाभाची वांछा करणाऱ्या कण्वाला रक्षिते झालां, त्या प्रसादांसहित, हे अश्वी हो, तुम्ही अवश्य येथें या.

5. With those favours with which you raised from the waters the confined [and] tied Rebha [and] Vandana, in order that they might see the light, [and] with those [ favours ] with which you defended Kaṇva who desired wealth—with those, O As'vins, do come hither.

---

चपलगामीपणा दिला असें अन्यत्र सांगितलेलें प्रसिद्ध नाहीं, आणि अश्वींच्या योगानें वायु चपल कसा झाला तें सायणाचार्य सुद्धा या मंत्रावरच्या भाष्यांत सांगत नाहींत. आणि केवळ अश्वींच्या प्रसादानेंच तो चपल झाला असें नाहीं, तर 'तनयाच्या बळानें'हि झाला. तर हें कसें?

'त्रिमन्तु' हा कोण होता? ऋग्वेदांत हें नांव दुसऱ्या ठिकाणीं आलेलें आढळत नाहीं. आणि त्याला अश्वींच्या प्रसादांनीं विद्वत्ता कशी प्राप्त झाली तें समजण्यास या मंत्राशिवाय दुसरा आधार नाहीं. मात्र सायणाचार्यांच्या म्हणण्याप्रमाणें 'त्रिमन्तु' आणि 'कक्षीवान्' एकच. कक्षीवान् कोण याविषयीं सू. १८ मं. १, सू. ५१ मं. १३ आणि प्रस्तुत सूक्ताचा मं. ११ हे पहा.

---

५. 'रेभ,' 'वन्दन' आणि 'कण्व' हीं विशेषनामें आहेत. 'रेभ' या नांवाच्या एका भक्ताला अश्वी देवांनीं उद्धारिलें असें ऋग्वेदांत कितीएक ठिकाणीं सांगितलें आहे. सायणाचार्य म्हणतात कीं, रेभ आणि वन्दन या ऋषींस असुरांनीं पाशबद्ध करून कूपांत टाकिलें होतें तेथून अश्वींनीं त्यांची मुक्तता केली. ऋ. १०.३९.९ यांत रेभाला गुहेंत झांकून ठेविलें होतें तेथून त्याचा उद्धार अश्वींनीं केला असें सांगितलें आहे (युवं ह रेभं... गुहाहितम् उत् ऐरयतम्). ऋ. १.११७.४ यांत रेभ ऋषि पाण्यांत पडला होता त्याचा उद्धार तेथून अश्वींनीं केला असें सांगितलें आहे. सू. ११६, मं. २४ यांत रेभाला बांधून नव दिवस आणि दाहा रात्री पाण्यांत टाकिलें होतें तेथून अश्वींनीं त्यास उद्धारिलें असें म्हटलें आहे. सायण या सर्व मंत्रांवरील भाष्यांत कूपांत पडलेल्या रेभाला उद्धारिलें असें म्हणतात.

'वन्दन' नांवाचा ऋषि वृद्ध झाला

**याभिरन्तकं जसमानमारणे भुज्युं याभिरव्यथिभिर्जिजिन्वथुः । याभिः कर्कन्धुं वय्यं च जिन्वथस्ताभिरू षु ऊतिभिरश्विना गतम् ॥ ६ ॥**

याभिः । अन्तकम् । जसमानम् । आऽअरणे । भुज्युम् । याभिः । अव्यथिऽभिः । जिजिन्वथुः ।

याभिः । कर्कन्धुम् । वय्यम् । च । जिन्वथः । ताभिः । ऊम् इति । सु । ऊतिऽभिः । अश्विना । आ । गतम् ॥ ६ ॥

---

## भाषायाम्.

६. याभिः [ ऊतिभिः ] आरणे जसमानम् अन्तकम् ( =अगाधजले नश्यमानम् अन्तकमेतत्संज्ञं राजर्षिं ), याभिः अव्यथिभिः ( =व्यथारहिताभिः=अव्याहताभिः ) [ ऊतिभिः ] ( =अव्याहतैः प्रसादैः ) जिजिन्वथुः ( =ररक्षथुः ) याभिः कर्कन्धुम् ( =एतत्संज्ञं ) वय्यं च ( =एतत्संज्ञं च ) जिन्वथः ( =रक्षथः ) ताभिरु ऊतिभिः ( =तैरेव संरक्षणैः ) हे अश्विना ( =अश्विनौ ), सु आ गतं ( =सुष्ठु=अवश्यम् अस्मान् प्रति आगच्छतम् ) ॥

---

असतां अश्वींनीं त्याचें आयुष्य वाढविलें असें ( ऋ. १. ११६. ६ यांत ) सांगितलें आहे. सू. ११८, मं. ६ यांत 'वन्दन' ऋषीला अश्वींनीं उद्धारिलें असें सांगितलें आहे, पण कशापासून तें सांगितलेलें नाहीं (सायणाचार्य कूपापासून असें म्हणतात ). सू. ११९, मं. ७ यांत म्हातारपणानें पीडिलेल्या 'वंदन' ऋषीला अश्वी देव जुन्या रथाला पुनः नीट केल्याप्रमाणें पुनः तरूण करिते झाले असें सांगितलें आहे. ऋ. १०. ३९. ८ यांत अश्वींनीं 'वंदन ऋषीला' कूपांतून वर काढिलें ( युवं वन्दनम् ऋश्यदात् उत् ऊपथुः) असें सांगितलें आहे. ( सू. ११६ मं. ११ व सू. ११७ मं. ५ हेहि पहा). कण्व हें नांव ऋग्वेदांत पुष्कळ ठिकाणीं आलें आहे, आणि 'प्रस्कण्व,' 'मेधातिथि' इत्यादि कण्वकुळांतील ऋषींचीं सूक्तें पुष्कळ आहेत त्या सर्वांचा आदि पुरूष एक कण्व आहे. वेदसूक्तांचे कर्ते जे प्रस्कण्व, मेधातिथि इत्यादि, त्या सर्वांलाहि 'कण्व' अशीच संज्ञा आहे. परंतु प्रस्तुत मंत्रांत सांगितलेला 'कण्व' कोणता घ्यावयाचा हें समजण्यास पुरता आधार नाहीं, मात्र कण्व हें नांव वेदांत प्रसिद्ध आहे.

'अवरूद्ध आणि पाशबद्ध '='निवृतं सितम्.' म्ह० ज्यांला बांधून अटकाविलें

६. ज्या [प्रसादां]नीं तुम्ही डोहांत मरत असणाऱ्या अन्तकास [ आणि ] ज्या अव्याहत [ प्रसादां]नीं भुज्यूस संरक्षिते झालां, ज्या [ प्रसादां]नीं कर्कन्धूला आणि वय्याला संरक्षिते झालां, त्याच प्रसादांसहित, हे अश्वी हो, तुम्ही अवश्य येथें या.

6. With those favours with which you saved Antaka exhausted to death in the abyss, with those unstaggering [ favours ] with which you saved Bhujyu, [ and ] with those [favours] with which you saved Karkandhu and Vayya—with those, O As'vins, do come hither.

---

होतें ते.

'वर काढून प्रकाश दाखविते झालां' ='उद् ऐरयतं स्वः दृशे.' अक्षरशः'प्रकाश पहाण्याकरितां वर काढिते झालां.'

रेभ, वन्दन, आणि कण्व या पुरुषांवर जे अश्वींनीं अनुग्रह केले ते या मंत्रांत आणिले आहेत.

---

६. अन्तक, भुज्यु, कर्कन्धु आणि वय्य हीं विशेषनामें. या नांवांच्या मनुष्यांस अश्वींनीं संकटापासून मुक्त केलें होतें.

अन्तकास असुरांनीं कूपांत टाकिलें होतें असें सायणाचार्य म्हणतात. पण 'अन्तक' हा कोण होता आणि कोणत्या प्रसंगीं आणि कशापासून त्याचें संरक्षण अश्वींनीं केलें तें समजत नाहीं. कारण कीं अन्तक हें विशेषनाम पुनः वेदांत आलेलें आढळत नाहीं. प्रस्तुत मंत्रांत आलेलें तेवढेंच.

'अव्याहत'='अव्यथिभिः.' सायणाचार्य 'नौभिः' (=नावांनीं) असें अध्याहृत करून त्याचें 'अव्यथिभिः' हें विशेषण करितात.

'भुज्यु' हा एक राजर्षि होता. त्याची कथा सू. ११६, मं. ३ याजवरील सायणभाष्यांत सांगितली आहे. ती अशी कीं, 'तुग्र या नांवाचा अश्वींच्या प्रीतींतला एक राजर्षि असे. त्याला दुसऱ्या द्वीपांतले शत्रु येऊन अतिशय उपद्रव करूं लागले. तेव्हां त्यांस जिंकण्याकरितां म्हणून त्याणें आपला पुत्र जो भुज्यु त्याला सेनेसहित जहाजांतून पाठवून दिलें. तें जहाज समुद्रामध्यें वादळानें फुटलें. त्या वेळीं भुज्यूनें अश्वींची सत्वर प्रार्थना केली. स्तोत्र होतांच अश्वींनीं भुज्यूला तीन दिवस आणि तीन रात्रींत मिळून तुग्राजवळ नेऊन पोंहचविलें. भुज्यूला अश्वींनीं रक्षिलें याविषयीं पुष्कळ मंत्रांत सांगितलें आहे.

'कर्कन्धु' हा कोण होता तें समजण्याला या मंत्राशिवाय दुसरें साधन

याभिः शुचन्तिं धनसां सुषंसदं तप्तं घर्ममोम्यावन्तमत्रये ।
याभिः पृश्निगुं पुरुकुत्समावतं ताभिरू षु ऊतिभिरश्विना गतम् ॥७

याभिः । शुचन्तिम् । धनऽसाम् । सुऽसंसदम् । तप्तम् । घर्मम् । ओम्याऽवन्तम् । अत्रये ।
याभिः । पृश्निऽगुम् । पुरुऽकुत्सम् । आवतम् । ताभिः । ऊम् इति । सु । ऊतिऽभिः । अश्विना । आ । गतम् ॥ ७ ॥

---

## भाषायाम्.

७. याभिः [ऊतिभिः) धनसां (=धनानां संभक्तारं=धनाढ्यं) शुचन्तिम् (=एतन्नामानं) सुषंसदं (=शोभनगृहम्) [अकुरुतं] (=शुचन्तये सुगृहम् अदत्तम्) [अपि च] अत्रये (=एतन्नाम्ने कस्मैचिदुपासकाय) तप्तं घर्मम् (=अतिशयेन पीडाकारिणम् अग्निम्) ओम्यावन्तं (=सुखकारिणम्) [अकुरुतं] याभिः [ऊतिभिः] पृश्निगुं पुरुकुत्सं च (=एतन्नामानौ द्वौ ऋषी) आवतम् (=अरक्षतं) ताभिरू ऊतिभिः (=तैरेव संरक्षणैः) हे अश्विना (=अश्विनौ), सु आ गतं (=सुष्ठु =अवश्यम् अस्मान् प्रति आगच्छतम्) ॥

---

नाहीं, कारण याशिवाय दुसऱ्या मंत्रांत तें नांव आलेलें नाहीं.

'वम्र' या मनुष्याविषयीं सू. ५४, मं. ६ आणि त्याजवरील आमची टीप पहा.

७. ज्या [ प्रसादां]नीं तुम्ही धनाढ्य शुचन्तीला चांगलें घर देते झालां [आणि] अत्रीचा प्रखर अग्नि शांत [करिते झालां], [आणि] ज्या [ प्रसादां]नीं पृश्निगूस [ आणि ] पुरुकुत्सास रक्षिते झालां त्या प्रसादांसहित, हे अश्वी हो, तुम्ही अवश्य येथें या.

7. With those favours with which you gave to opulent S'uchanti a good habitation and made the burning fire of Atri comfortable, [ and ] with those [ favours ] with which you saved Pris'nigu [ and ] Purukutsa—with those, O As'vins, do come hither.

---

७. 'शुचन्ति' हा कोण होता याविषयीं कांहीं ठाऊक नाहीं. वेदांत दुसऱ्या ठिकाणीं हें विशेषनाम आलेलें आढळत नाहीं.

'चांगलें घर देते झालां'=' सुषंसदम् [ अकृणुतम् ].' अक्षरशः अर्थ 'चांगलें घर ज्याला आहे असा करिते झालां' असा आहे.

'अत्रीचा प्रखर अग्नि' इ०. 'अत्रि' हा एक अतिपुरातन ऋषि होय. त्याला त्याचे शत्रु असुर, शंभर द्वारें असलेल्या एका यंत्रांत घालून विस्तवानें भाजीत होते अशी कथा आहे. त्याला देवांनीं रक्षिलें. अश्वींनीं त्याचा संताप शांत केला असें जसें येथें सांगितलें आहे तसेंच इतरत्र इतर देवांनींहि त्याजवर कृपा केली आणि त्याचें साहाय्य केलें असें सांगितलें आहे. सू. ५१, मं. ३ आणि त्याजवरील टीप पहा. एका ठिकाणीं असें सांगितलें आहे कीं, अत्रि सप्तवध्रि या नांवाच्या ऋषीस असुरांनीं अंधारमय आणि अत्युष्ण अगाधांत टाकिला. त्याणें अश्वींचा धांवा करितांच अश्वी देव त्याजवळ आले आणि शीतोदकानें त्यास शांत करिते झाले. आणि शेवटीं त्यांणी त्यास तेथून काढिलें. अत्रीविषयीं पुढें बऱ्याच ऋचा येत जातील.

हा जो अत्रि येथें सांगितला तो आणि पुराणादिकांत जो मागाहून प्रसिद्ध झाला तो अत्रि हे एकच यांत संशय नाहीं. कारण पुराणांचे वेळीं दुसरे ऋषि नव्हतेच आणि वेदांत जे ऋषि आणि देवता वगैरे येतात त्यांजवरच पुराणांनीं आपलें पांडित्य केलें आहे. तेव्हां पुराणांत वगैरे सांगितलेला अत्रि ऋषि खरोखर कसा होता आणि त्याविषयीं वैदिक काळीं कोणकोणत्या कथा प्रसिद्ध असत तें वेदसूक्तांवरून समजेल.

'पृश्निगु' याविषयीं कांहीं इतिहास ठाऊक नाहीं. या मंत्राशिवाय हें नांव पुनः आलेलें नाहीं.

'पुरुकुत्स.' याविषयीं सू. ६३, मं. ७ याजवरील टीप पहा.

**याभिः शचीभिर्वृषणा परावृजं प्रान्धं श्रोणं चक्षस एतवे कृथः।**
**याभिर्वर्तिकां ग्रसितामर्मुञ्चतं ताभिरू षु ऊतिभिरश्विना गतम्॥८**

याभिः । शचीभिः । वृषणा । पराऽवृजम् । प्र । अन्धम् । श्रोणम् । चक्षसे । एतवे । कृथः ।
याभिः । वर्तिकाम् । ग्रसिताम् । अमुञ्चतम् । ताभिः । ऊम् इति । सु । ऊतिऽभिः । अश्विना । आ । गतम् ॥ ८ ॥

## भाषायाम्.

८. हे वृषणा (=वीरावश्विनौ), याभिः शचीभिः (=ऊतिभिः=संरक्षणकर्मभिः) [युवाम्] अन्धं श्रोणं (=चक्षुर्हीनं पङ्गुं च) परावृजम् (=एतन्नामकं कंचिदृषिं) चक्षसे एतवे [च] प्र कृथः (=प्रकर्षेण दर्शनाय गमनाय च अकुरुतं=तादृशं सामर्थ्यमदत्तम्) याभिश् [च] ग्रसितां वर्तिकां (="चटकसदृशस्य पक्षिणः स्त्रियं ग्रसितां वृकेण ग्रस्ताम्") अमुञ्चतम् (=अमोचयतं) ताभिरू ऊतिभिः (=तैरेव संरक्षणैः) हे अश्विना (=अश्विनौ), सु आ गतं (=सुष्ठु=अवश्यम् अस्मान् प्रति आगच्छतम्) ॥

परावृक्शब्दः परित्यक्तवाचकः न तु कस्यचिद् ऋषेर्नामेति रोधग्रासमानौ। यत्तु नीचा सन्तम् उदनयः परावृजं प्रान्धं श्रोणं श्रवयन् सोसि उक्थ्यः इत्यर्धर्चे (ऋ. २. १३. १२) प्रोक्तं तस्मात् परावृजश्च तुर्वीतिवय्याभ्यां साहचर्यात् परावृक्शब्द ऋषिनामैवेति स्पष्टम्। उद् अतिष्ठत् परावृक् प्रति श्रोणः स्थात् वि अनक् अचष्ट सोमस्य ता मदे इन्द्रश्चकारेति (ऋ. २. १५. ७) यदुक्तं तस्मादपि परावृक्शब्दस्य ऋषिनामत्वं स्पष्टं दृश्यते ॥

८. हे वीरांनो, ज्या प्रसादांनीं अंध [ आणि ] पंगु अशा परावृजाला तुम्ही पाहण्याची [आणि] चालण्याची शक्ति देते झालां, [ आणि ] ज्या [ प्रसादां]नीं गिळलेल्या वर्तिकेस सोडविते झालां, त्याच प्रसादांसहित, हे अश्वी हो, तुम्ही अवश्य येथें या.

8. With those favours O brave ones, with which you made the blind [ and ] lame Parâvṛij to see [ and ] to walk, [ and ] with those favours with which you saved Vartikâ that had been swallowed— with those, O As'vins, do come hither.

---

८. पहिल्या अर्धाचा सारांश:—'परावृज्.नांवाचा मनुष्य आंधळा आणि पांगळा असतां त्यास अश्वींनीं पाहण्यास दृष्टि व चालण्यास पाय दिले.'

'परावृज्' हें एका उपासकाचें नांव आहे आणि तो आंधळा आणि पंगु असतां त्याला (इंद्रानें) डोळे आणि हातपाय दिले असें इतर ठिकाणींहि सांगितलें आहे. ऋ. २. १५. ७ याजवरील सायणभाष्य पहा. शिवाय ऋ. २.१३. १२ यांत तर 'परावृज्' हें नांव 'तुर्वीति' आणि 'वय्य' या विशेष नामांबरोबर आलें आहे म्हणून विशेषनाम असण्याचा अतिशय मोठा संभव आहे; आणि परावृज् अंध आणि पंगु असतांहि त्याला (इंद्रानें) डोळे दिले आणि हातपाय दिले असें स्पष्ट सांगितलें आहे ( नीचा सन्तम् उद् अनयः परावृजं प्रान्धं श्रोणं श्रवयन् सः •असि उक्थ्यः). असें असतां 'परा' आणि 'वृज्' या अवयवांच्या केवळ निरुक्तीवर अवलंबून 'परावृज्' म्हणजे 'टाकून दिलेला,' 'बहिष्कृत' असा अर्थ रोथ आणि ग्रास्मन इत्यादि पाश्चिमात्य विद्वान् करितात तो अगदी चिंत्य आहे असें आम्हांस वाटतें.

'वर्तिकेस.' वर्तिका म्हणजे चिमणीसारिखी एक लहान पक्षीण असें सायणाचार्य म्हणतात. तिला लांडग्यानें गिळली; नंतर तिची अश्वींनीं मुक्ति केली असें इतर मंत्रांतहि सांगितलें आहे. ऋ. १. ११६. १४; १. ११७. १६; १. ११८. ८ आणि १०. ३९. १३ हे मंत्र पहा.

याभिः सिन्धुं मधुमन्तमसश्चतं वसिष्ठं याभिरजरावजिन्वतम् ।
याभिः कुत्सं श्रुतर्यं नर्यमावतं ताभिरू षु ऊतिभिरश्विना गतम्॥९

याभिः । सिन्धुम् । मधुऽमन्तम् । असश्चतम् । वसिष्ठम् । याभिः । अजरौ । अजिन्वतम् ।
याभिः । कुत्सम् । श्रुतर्यम् । नर्यम् । आवतम् । ताभिः । ऊम् इति । सु । ऊतिऽभिः । अश्विना । आ । गतम् ॥ ९ ॥

## भाषायाम्.

९. [ हे अश्विनौ ], याभिः [ ऊतिभिः ] [ युवां ] मधुमन्तं सिन्धुं ( =माधुर्योपेतां नदीम् ) असश्चतम् ( =अगमयतं=प्रावाहयतम् ) [ अपि च ] हे अजरौ (=जरारहितावश्विनौ ), याभिः [ ऊतिभिः ] वसिष्ठम् अजिन्वतं ( =वसिष्ठनामकं कंचिद् उपासकम् अरक्षतम् ) [ अपि च ] याभिः [ ऊतिभिः ] कुत्सं श्रुतर्यं नर्यम् (=एतन्नाम्न उपासकान् ) आवतम् ( =अरक्षतं ) ताभिरू ऊतिभिः ( =तैरेव संरक्षणैः सह ) हे अश्विना ( =अश्विनौ ), [ युवां ] सु आ गतं ( =सुष्ठु=अवश्यम् अस्मान् प्रति आगच्छतम् ) ॥

९. 'सिंधु' शब्दाचे अर्थ दोन होतात; १, समुद्र (मग तो अर्णवरूपी असो अथवा अंतरिक्षरूपी असो,' कारण अंतरिक्षाला सुद्धा वेदांत 'सिंधु' असें म्हटलेलें पुष्कळ ठिकाणीं आढळतें ) आणि २, नदी. येथें मधुर असें विशेषण लाविलें आहे त्याचा अर्थ नदी मधुर करून तिला वाहविली असा आहे. पण कोणती नदी ? किंवा सिंधु नांवाचीच नदी कीं काय ? अश्वींनीं हा नदीला मधुर करण्याचा पराक्रम केला यांत नवल नाहीं, कारण अश्वी मधु घेऊन येतात आणि यज्ञ मधुर करितात इत्यादि त्यांविषयीं सांगितलें आहेच.

'कुत्स,' 'श्रुतर्य,' आणि 'नर्य' या नांवाचे पुरुषांस. 'वसिष्ठ' हेंहि त्याप्रमाणेंच विशेषनाम. कुत्स याविषयीं सू. ५१ मं. ६ याजवरील टीप पहा. श्रुतर्य हा कोण होता आणि त्याची कथा काय आहे याविषयीं कांहीं ठाऊक नाहीं; तें नांव पुनः कोठें आल्याचें आढळत नाहीं.

'नर्य' याविषयीं सू. ५४, मं. ६ याजवरील टीप पहा.

'वसिष्ठ.' पुराणादिकांत जो वसिष्ठ (किंवा वशिष्ठ ) ऋषि प्रसिद्ध आहे तोच वसिष्ठ ऋषि या मंत्रांतला होय. वसिष्ठ ऋषीविषयींच्या पुराणांतील कथा बहुतेकांस ठाऊक आहेतच. ऋग्वेदांत त्याविषयीं जें सांगितलें आहे तें हें:- प्रथम हें लक्ष्यांत ठेविलें पाहिजे कीं ऋ-

९. ज्या [प्रसादां]नीं तुम्ही मधुर सिंधूस वाहविते झालां, [आणि] हे जरारहित [अश्वी] हो, ज्या [प्रसादां]नीं तुम्ही वसिष्ठाचें रक्षण करिते झालां, [आणि] ज्या [प्रसादां]नीं कुत्स, श्रुतर्य [आणि] नर्य यांस रक्षिते झालां, त्याच प्रसादांसहित, हे अश्वी हो, तुम्ही अवश्य येथें या.

9. With those favours with which you sent forth the river full of sweetness, with which, O ever youthful ones, you supported Vasishṭha, [and] with which you saved Kutsa, S'rutarya and Narya—with those, O As'vins, do come hither.

---

क्संहितेचें सगळें सातवें मण्डल वसिष्ठ ऋषीनें आणि त्याच्या वंशजांनीं केलेलें आहे, शिवाय वसिष्ठ कांहीं किरकोळ सूक्तांचा कर्ता होय. ऋ. ७. ३३. १०, ११ यांत वसिष्ठ हा मित्रावरुणापासून झाला असें जाणविलें आहे. तो 'सरस्वती'चा मोठा भक्त असे (ऋ. ७. ९६. १). 'तृत्सु' अथवा 'भरत' या नांवाचे राजे आणि त्याचे दहा शत्रु (ऋ. ७. ८३. ७) यांचा परस्पर युद्धप्रसंग, कीं ज्याला त्यावरून 'दाशराज्ञ' असें नांव पडलें तो, होऊन भरतांचा फार उच्छेद झाला. पण वसिष्ठ भरतांचा पुरोहित (म्हणजे नायक ?) झाला तेव्हांपासून त्यांचा पुनः ऊर्जित काळ येऊन त्यांची वृद्धि झाली (ऋ. ७. ३३. ६). वसिष्ठाचे शिष्य जे तृत्सु राजे ते 'कपर्दी' असत, म्हणजे त्यांला लांब लांब दाढी आणि डोकीवर लांब लांब केस असत (ऋ. ७. ८३. ८). 'सुदास्' नांवाचा एक धार्मिक राजा असे त्याचा पुरोहित वसिष्ठ होय. वरुण देवानें वसिष्ठाला नावेंत घालून तारिला, आणि त्याला कुशल ऋषि केला. याशिवाय स्वतः वसिष्ठाविषयीं कांहीं सांगितलेलें नाहीं. वसिष्ठाच्या कुळांत झालेले जे त्याचे पुत्रपौत्रादि वंशज ते देवांचे भाविक भक्त असून यज्ञादिक कर्मे करीत आणि इतर भक्तांप्रमाणें देवांची स्तुति गात इत्यादि तर प्रसिद्ध आहेच (७ वें मण्डल पहा).

वसिष्ठाचे पुत्र अथवा वंशज यांविषयीं उल्लेख वेदांत येतो. त्यांच्या उजव्या बाजूला कल्ले असत (दक्षिणतः कपर्दाः ७. ३३. १). वसिष्ठाप्रमाणेंच त्याचे वंशजहि 'सुदास्' राजाचे पुरोहित असत. एका ठिकाणीं असें सांगितलें आहे कीं वसिष्ठपुत्रांनीं 'सुदास्' राजाकडून यज्ञ करविला. तो पाहून 'वयत'राजाचा पुत्र जो 'पाशद्युम्न'

याभिर्विश्पलां धनसामथर्व्यं सहस्रमीळ्ह आजावजिन्वतम् ।
याभिर्वशमश्व्यं प्रेणिमावतं ताभिरू षु ऊतिभिरश्विना गतम् ॥
॥ १० ॥ ३४ ॥

याभिः । विश्पलाम् । धनऽसाम् । अथर्व्यम् । सहस्रऽमीळ्हे । आजौ । अजिन्वतम् ।
याभिः । वशम् । अश्व्यम् । प्रेणिम् । आवतम् । ताभिः । ऊम् इति । सु । ऊतिऽभिः । अश्विना । आ । गतम् ॥ १० ॥ ३४ ॥

## भाषायाम्.

१०. [ हे अश्विनौ ], याभिः [ ऊतिभिः ] धनसां ( =धनं संभजमानां=जेत्रीम्) अथर्व्यम् ( =अथर्वीम्=अथर्वपुत्रीं ) विश्पलाम् ( =एतन्नाम्नीं खेलस्य राज्ञः स्त्रियं ) सहस्रमीळ्हे आजौ ( =सहस्रधनयुक्ते संग्रामे=तुमुलयुद्धे ) अजिन्वतम् ( =अगमयतं =गन्तुं समर्थामकुरुतम् ), याभिः [ ऊतिभिः ] प्रेणिं ( =प्रीणयितारम् ) अश्व्यम् ( =अश्वसंज्ञस्य कस्यचित्पुत्रं ) वशम् ( =एतन्नामकमुपासकम् ) आवतम् ( =अरक्षतं ) ताभिरु ऊतिभिः ( =तैरेव संरक्षणैः सह ) हे अश्विना ( =अश्विनौ ), युवां सु आ गतं ( =सुष्ठु=अवश्यम् अस्मान् प्रति आगच्छतम् ) ॥

राजा त्याणेंहि यज्ञ करायास आरंभिला. परंतु वसिष्ठपुत्रांनीं इंद्राला मंत्र म्हणून पाशद्युम्नाच्या यज्ञांतून नेऊन 'सुदास्' राजाच्या यज्ञांत आणून स्थापिलें ( ७. ३३. २ ). एकदा परूष्णी नदीला फार पूर आला आणि 'सुदास्' राजाला जावयास मिळेना, तेव्हां वसिष्ठपुत्रांनीं इन्द्राची स्तुति केल्यावरून इन्द्रानें मार्ग करून दिला आणि 'सुदास्' राजाचा जो दश राजांशीं संग्राम झाला तो वसिष्ठांनीं इंद्राचें स्तोत्र म्हटल्यावरूनच झाला ( ७. ३३. ३; ७. १८. ५ ). याशिवाय वसिष्ठपुत्रांविषयीं विशेष कांहीं ऋग्वेदांत सांगितलेलें नाहीं. विश्वामित्र आणि वसिष्ठ यांच्या कलहाविषयींच्या ज्या कथा आणि वसिष्ठाच्या कामधेनूविषयीं जो कथाविस्तार पुराणादिकांत आढळतो त्याचें बीज सुद्धा ऋग्वेदांत आढळत नाहीं. तो सगळा मागाहून वाढला असें म्हटलें पाहिजे.

१०. ज्या [प्रसादां]नीं तुम्ही धनाढ्य अथर्वीण विश्पलेवर अतितुमुल युद्धांत कृपा करिते झालां, ज्या [प्रसादां]नीं अश्वकुलोत्पन्न प्रेमळ वशाला रक्षिते झालां, त्याच प्रसादांसहित, हे अश्वी हो, तुम्ही अवश्य येथें या.

10. With those favours with which you favoured in the thousandfold battle the rich Vis′palâ, daughter of Atharvan, [and] with those [favours] with which you saved [your] loving Vas′a, son of As′va,—with those, O As′vins, do come hither.

---

१०. 'खेल' या नांवाचा एक राजा असे. त्याची स्त्री 'विश्पला'. ही शत्रूबरोबर लढाईंत लढत असतां तिजवर शत्रूच्या शस्त्राचा घाव लागून तिची जांघ मोडली, तेव्हां 'खेल' राजाचा जो पुरोहित अगस्त्य ऋषि त्याणें अश्वींची स्तुति केल्यामुळें त्यांनीं येऊन रात्रीच्या वेळीं विश्पलेस लोखंडाची जांघ करून लाविली अशी कथा आहे ( सू. ११६, मं. १५ आणि सायणभाष्य पहा ); त्या विश्पलेविषयीं या मंत्रांत सांगितलें आहे. या मंत्रावरून सिद्ध होतें कीं पुरातनकाळीं आमचे आर्य पूर्वजच स्वतः शूर असत आणि नित्य संग्रामांत गुंतलेले असत इतकें नव्हे, तर त्यांच्या बायकाहि लढाईंत लढत असत. शूरत्वाच्या आणि युद्धाच्या संबंधानें त्या आर्यांचे आणि आर्यमातांचे जे आम्ही पुत्र त्यांची या कलियुगांत कशी अवस्था झाली आहे पहा ! या मन्वन्तरांत बायकांनीं लढणें तर राहिलें, पण घराबाहेर हि पडतां नये, आणि पुरुषांनीं आपली भटभिक्षुकी करून आणि फार झालें तर पोटापुरती चाकरी मिळवून निर्वाह केला म्हणजे ते कृतकृत्य झाले.

'अथर्वीण'='अथर्वीम्.' म्हणजे अथर्वा नांवाचा जो ऋषि (सू.८० मं.१६, सू. ८३ मं. ५) त्याच्या वंशांत झालेली. सायणाचार्य 'चालण्यास असमर्थ' असा अर्थ करितात तो जसा केवळ निर्वचनावलंबी आहे तसाच 'पुरोहितीण' हाहि कितीएक पाश्चात्यांचा अर्थहि संशयबद्ध निर्वचनावर अवलंबून राहणारा आहे.

'अतितुमुल युद्धांत'='सहस्रमीळ्हे.' अक्षरशः अर्थ सहस्रशः मारामार आणि लुटालूट ज्यांत होत आहे असें युद्ध.

'वश.' 'वश' नांवाचा कोणीएक मनुष्य असे, त्याचें उपनांव 'अश्व्य'= ('अश्व' नांवाच्या मनुष्यापासून झालेला ) हें असे. त्याला 'पृथुश्रवा कानीत' या मनुष्यानें पुष्कळ दान दिलें असें सांगितलें आहे ( ८. ४६. २१ ).

**याभिः सुदानू औशिजाय वणिजे दीर्घश्रवसे मधु कोशो अक्षरत् ।**
**कक्षीवन्तं स्तोतारं याभिरावतं ताभिरू षु ऊतिभिरश्विना गतम् ॥**
॥ ११ ॥

याभिः । सुदानू इति सुऽदानू । औशिजाय । वणिजे । दीर्घऽश्रवसे । मधु । कोशः । अक्षरत् ।
कक्षीवन्तम् । स्तोतारम् । याभिः । आवतम् । ताभिः । ऊम् इति । सु । ऊतिऽभिः । अश्विना । आ । गतम् ॥ ११ ॥

---

## भाषायाम्.

११. हे सुदानू (=शोभनदानौ) [अश्विनौ], याभिः [ऊतिभिः] (=यैर्युवयोः प्रसादैर्हेतुभूतैः) कोशः (=मेघः) वणिजे (=वाणिज्यं कुर्वते) औशिजाय दीर्घश्रवसे (=उशिक्पुत्राय दीर्घश्रवसे कस्मैचिद्राज्ञे) मधु अक्षरत् (=मधुरं मेघजलम् असिञ्चत्=वर्षितवान्), [अपि च] याभिः [ऊतिभिः] स्तोतारं (=स्तोत्राणि कुर्वन्तं) कक्षीवन्तम् (=एतन्नामकम् ऋषिं) [युवाम्] आवतम् (=अरक्षतं) ताभिरू ऊतिभिः (=तैरेव संरक्षणैः सह) हे अश्विना (=अश्विनौ), [युवां] सु आ गतं (=सुष्ठु=अवश्यम् अस्मान् प्रति आगच्छतम्)॥

---

वश याला रक्षून त्याला प्रत्यहीं सहस्र धन मिळे असें अश्वी देवांनीं केलें (११६. २१). वश हा ऋषि असे, आणि त्यानें केलेलें ऋ. ८. ४६ हें एक सूक्त प्रसिद्ध आहे. पण ऋ. १०. ४०, ७ याजवरील भाष्यांत सायणाचार्य वश हा राजा होता असें म्हणतात. याशिवाय 'वशाविषयीं दुसरा कांहीं इतिहास ठाऊक नाहीं.

वृत्तसुखार्थ ह्या मंत्राचे पहिले तीन चरण खालीं लिहिल्याप्रमाणें म्हटले पाहिजेत:—

याभिर्विश्पलां धनसामथर्विअं
सहस्रमीळ्हे ऑजॉ अजिन्वतम् ।
याभिर्वशमश्विअं प्रेणिमावतम्

११. हे उदार देवांनो, [तुमच्या] ज्या [प्रसादांच्या योगा]-नें औशिज दीर्घश्रवा या सावकाराकारणें मेघ मधुर उदकाचा वर्षाव करिता झाला [आणि] ज्या [प्रसादां]नीं तुम्ही स्तोत्रकर्त्या कक्षीवंताला रक्षिते झालां, त्याच प्रसादांसहित, हे अश्वी हो, तुम्ही अवश्य येथें या.

11. With those [your] favours, O liberal [gods], whereby the cloud sent down sweet water for the sake of the merchant Aus'ija Dîrghas'ravas, [and] with those [favours] with which you protected the poet Kakshîvan— with those, O As'vins, do come hither.

११. 'औशिज दीर्घश्रवा' म्ह० 'औशिज' उपनांवाचा आणि 'दीर्घश्रवा' या नांवाचा पुरुष. साय० म्हणतात कीं 'उशिक्' म्हणून दीर्घतमाची पत्नी होती तिचा पुत्र 'दीर्घश्रवा,' म्हणून त्यास 'औशिज' हें नांव पडलें आहे. 'औशिज' हें आडनांव कितीएकांचें आहे. उदाहरण, कक्षीवान् ऋजिश्वा इत्यादिकांचें. 'दीर्घश्रवा' याविषयीं विशेष इतिहास कांहीं ठाऊक नाहीं. सायणाचार्य म्हणतात, दीर्घश्रवा हा राजा होता तरी अवर्षण पडल्यामुळें त्याला वाणिज्य करावें लागलें. तेव्हां त्याणें स्तुति केल्यावरून अश्वींनीं मेघाकडून वृष्टि करविली.

'कक्षीवंताला' इ०. पज्रकुलोत्पन्न कक्षीवंताला अश्वींनीं बुद्धिमंत केलें, आणि आपल्या घोड्याच्या खुरापासून शंभर घडे मद्य आणि मध हीं वाहविलीं अशी कथा आहे. याविषयीं पुढें ऋ. १. ११६. ७, ११७. ६ या मंत्रांत उल्लेख येईल. शिवाय सू. १८ मं. १, सू. ५१ मं. १३ आणि त्याजवरील टीपा पहा.

**याभी रसां क्षोदसोद्नः पिपिन्वथुरनश्वं याभी रथमावतं जिषे ।**
**याभिस्त्रिशोक उस्त्रिया उदाजत ताभिरू षु ऊतिभिरश्विना गतम् ॥ १२ ॥**

याभिः । रसाम् । क्षोदसा । उद्नः । पिपिन्वथुः । अनश्वम् । याभिः । रथम् । आवतम् । जिषे ।
याभिः । त्रिऽशोकः । उस्त्रियाः । उत्ऽआजत । ताभिः । ऊम् इति । सु । ऊतिऽभिः । अश्विना । आ । गतम् ॥ १२ ॥

**याभिः सूर्यं परियाथः परावति मन्धातारं क्षैत्रपत्येष्वावतम् ।**
**याभिर्विप्रं प्र भरद्वाजमावतं ताभिरू षु ऊतिभिरश्विना गतम्॥ १३**

याभिः । सूर्यम् । परिऽयाथः । पराऽवति । मन्धातारम् । क्षैत्रऽपत्येषु । आवतम् ।
याभिः । विप्रम् । प्र । भरत्ऽवाजम् । आवतम् । ताभिः । ऊम् इति । सु । ऊतिऽभिः । अश्विना । आ । गतम् ॥ १३ ॥

---

## भाषायाम्.

१२. [ हे अश्विनौ ], याभिः [ ऊतिभिः ] [ युवाम् ] उद्नः क्षोदसा (=उदकस्य प्रवाहेण ) रसाम् ( =एतन्नाम्नीं नदीं ) पिपिन्वथुः (=पूरितवन्तौ ), याभिः [ ऊतिभिः ) अनश्वं रथम् ( =अश्वहीनं रथं ) जिषे आवतं ( =जेतुं=विजयाय अरक्षतं=यथा जयेत्तथा तमरक्षतं=रक्षित्वा विजयिनमकुरुतम् ) [ अपि च ] याभिः [ ऊतिभिस् ] त्रिशोकः ( =एतन्नामकः कश्चिदृषिः ) [ शत्रुभिरपहृता ] उस्त्रियाः ( =गा ) उद् आजत ( =उद्गमितवान् ) ताभिरू ऊतिभिः ( =तैरेव संरक्षणैः सह ) हे अश्विना ( =अश्विनौ ), [ युवां ) सु आ गतं ( =सुष्ठु=अवश्यम् अस्मान् प्रति आगच्छतम् ) ॥

१३. [ हे अश्विनौ ], याभिः [ ऊतिभिः ] [ युवां ] परावति ( =दूरदेशे ) सूर्यं परियाथः ( =परितो गच्छथः=" तमोरूपेण स्वर्भानुनावृतम् आदित्यं तस्मात् तमसो मोचयितुं युवां परितो गच्छथः" ) [ याभिः ] मन्धातारम् (=एतन्नामकम् ऋषिं ) क्षैत्रपत्येषु ( =क्षेत्रपतिसंबन्धिषु कर्मसु ) आवतम् ( =अरक्षतम् ) [ अपि च ]

१२. ज्या [ प्रसादां]नीं तुम्ही उदकाच्या प्रवाहानें रसेला भरून टाकिते झालां, [आणि] अश्वहीन रथाला रक्षून विजयी करिते झालां, [ आणि ] तुमच्या ज्या [ प्रसादां]नीं त्रिशोक [ ऋषि ] गाईला हाकून आणिता झाला, त्याच प्रसादांसहित, हे अश्वी हो, तुम्ही अवश्य येथें या.

12. With those favours by which you filled the Rasâ with a stream of water, [ and by which ] you defended the horseless chariot that it might win, [ and ] with those [favours] by which Tris'oka drove up the cows—with those, O As'vins, do come hither.

१३. ज्या [ प्रसादां]नीं तुम्ही मोठ्या अंतरावर सूर्याच्या सभोंतालीं फिरतां, ज्या [ प्रसादां]नीं शेताविषयींच्या कामांत मंधात्याला संरक्षिते झालां [ आणि ] ज्या [ प्रसादां]नीं तुम्ही विद्वान भरद्वाजाला रक्षिते झालां, त्या प्रसादांसहित, हे अश्वी हो, तुम्ही अवश्य येथें या.

13. With those favours with which you go round the sun far off, [with which] you defended Mandhâtâ in the matters of mastery of the fields, [ and ] with those [favours] with which you saved the learned Bharadvâja—with those, O As'vins, do come hither.

---

१२. 'रसेला' रसा नांवाच्या नदीला, अवर्षणामुळें ती अगदी कोरडी पडली असतां. या नदीचें नांव कुभा, क्रमु, सिंधु आणि सरयु यांजबरोबर आलें आहे ( ऋ. ५. ५३. ९ ). ऋ. १०. ७५. ६ यांत सिंधु नदीला सिंधुतीरनिवासी कोणीएक ऋषि म्हणतो कीं, 'हे सिंधू, तूं पर्वतावरून खालीं उतरतांच अगोदर 'तृष्टामा' या नदीला मिळतेस; नंतर 'सुसर्तु,' 'रसा,' आणि 'श्वेती' या नद्यांला मिळतेस. मग 'कुभा,' 'गोमती,' 'क्रमु,' 'मेहत्नु' या नद्यांस बरोबर घेऊन चालतेस.' यावरून रसा म्हणजे सिंधु नदीचीच एक शाखा होय असें दिसतें.

'अश्वहीन रथाला.' हा अश्वहीन रथ अश्विदेवांचाच होता असें सायण म्हणतात.

'रक्षून विजयी करिते झालां'= 'आवतं जिषे.' [रथानें ] जिंकावें म्हणून [ त्यास ] रक्षिते झालां.

**याभिर्महामतिथिग्वं कशोजुवं दिवोदासं शम्बरहत्य आवतम् ।**
**याभिः पूर्भिद्ये त्रसदस्युमावतं ताभिरू षु ऊतिभिरश्विना गतम् ॥**
॥ १४ ॥

याभिः । महाम् । अतिथिऽग्वम् । कशःऽजुवम् । दिवःऽदासम् । शम्बरऽहत्यै । आवतम् ।
याभिः । पूःऽभिद्यै । त्रसदस्युम् । आवतम् । ताभिः । ऊम् इति । सु । ऊतिऽभिः । अश्विना । आ । गतम् ॥ १४ ॥

---

याभिः [ ऊतिभिः ] विप्रं ( =विद्वांसं ) भरद्वाजम् ( =एतन्नामकम् ऋषिम् ) आवतम् ( =अरक्षतं ) ताभिरु ऊतिभिः ( =तैरेव संरक्षणैः सह ) हे अश्विना ( =अश्विनौ ), [ युवां ] सु आ गतं ( =सुष्ठु=अवश्यम् अस्मान् प्रति आगच्छतम् ) ॥

---

## भाषायाम्.

१४. [ हे अश्विनौ ], याभिः [ ऊतिभिः ] [ युवां ] शम्बरहत्ये ( =शम्बरनामकस्यासुरस्य हनने=शम्बरं हत्वा) महां ( =महान्तं ) दिवोदासम् अतिथिग्वं (=दिवोदासोपनामधारिणम् अतिथिग्वनामकम् उपासकम्) [ अपि च ] कशोजुवं [ दिवोदासं ] ( =दिवोदासोपनामधारिणं कशोजूरिति नामधारिणम् उपासकम् ) आवतम् ( =अरक्षतम् ) [ अपि च ] याभिः [ ऊतिभिः ] पूर्भिद्ये ( =नगराणां भेदने=शत्रूणां नगराणि भित्त्वा ) त्रसदस्युम् आवतम् ( =त्रसदस्युनामानं " पुरुकुत्सपुत्रम् " अरक्षतं ) ताभिरु ऊतिभिः ( =तैरेव संरक्षणैः सह ) हे अश्विना ( =अश्विनौ ) [ युवां ] सु आ गतं ( =सुष्ठु=अवश्यम् अस्मान् प्रति आगच्छतम् ) ॥

सायणाचार्यास्तु अतिथिग्वम् अतिथिभिर्गन्तव्यं कशोजुवम् असुरभीत्योदकं प्रवेष्टुं गन्तारम् । एवंभूतं दिवोदासम् एतत्संज्ञकं राजर्षिम् इति ॥

---

'त्रिशोक [ ऋषि ] गाईला हाकून आणिता झाला.' असुरांनीं ज्या गाई हरण करून लपवून ठेविल्या होत्या, त्या हाकून आणिल्या असें सायणाचार्य म्हणतात. कदाचित् गाई म्हणजे प्रथम केवळ मेघोदकरूपच गाई असतील, नंतर वेदकाळींच खऱ्या गाई असुरांनीं चोरून नेल्या होत्या त्या परत आणण्याला त्रिशोकाला अश्वींनीं सामर्थ्य दिलें अशी समजूत झाली असावी. त्रिशोक ऋषीविषयीं इतिहास कांहीं ठाऊक नाहीं, मात्र ( ऋ. ८. ४५. ३० यांत ) इंद्रानें मेघ फोडून त्रिशोक ऋषीसाठीं पाणी बाहेर काढविलें असें सांगितलें आहे.

१४. ज्या [ प्रसादां ]नीं तुम्ही महान् दिवोदास अतिथिग्व [आणि ] दिवोदास कशोजू यांजवर शम्बरहननाच्या प्रसंगीं कृपा करिते झालां, [ आणि ] ज्या [ प्रसादां ]-नीं नगरविदारणाच्या प्रसंगीं त्रसदस्यूवर कृपा करिते झालां, त्या प्रसादांसहित, हे अश्वी हो, तुम्ही अवश्य येथें या.

14. With those favours with which you protected, in the killing of S'ambara, the great Atithigva Divodâsa and Kas'ojû Divodâsa, [and] with those [ favours ] with which you favoured Trasadasyu in the reduction of the fortresses—with those, O As'vins, do come hither.

---

१३. ' सूर्याच्या सभोंतालीं फिरतां ' =' सूर्यं परियाथः.' सायण " स्वर्भानूनें "( स्वर्भानु म्हणून अंधकाररूप असुर " होय त्याणें ) आच्छादलेला जो सूर्य, " त्यास त्यापासून म्हणजे अंधकारांतून " सोडविण्याकरितां तुम्ही सूर्यासभों-" तालीं फिरतां " असा अर्थ करितात.

'मंधात्याला,' या नांवाच्या पुरुषाला. ' मन्धाता ' हा कोण आणि त्याचा इतिहास काय त्याविषयीं कांहीं ठाऊक नाहीं. मात्र त्याचें नांव ऋग्वेदांत आणखी एका मंत्रांत ( ८. ४०. १२ ) आलें आहे त्यांत कोणीएक ऋषि म्हणतो कीं ' मी या प्रकारेंकरून अंगिरसांप्रमाणें आणि मंधात्यासारिखी इंद्राग्नींची स्तुति केली आहे.' त्याच मंत्राच्या भाष्यांत सायणाचार्य मंधाता ह्याचें उपनांव ' यौवनाश्व ' हें होतें असें म्हणतात. याशिवाय त्याजविषयीं कांहीं ठाऊक नाहीं.

' भरद्वाज.' भरद्वाज ऋषि जो पुराणादिकांत प्रसिद्ध आहे तो वेदांतहि प्रसिद्ध आहे. ऋक्संहितेचें साहावें मण्डल भरद्वाज ऋषीनें केलेलें आहे असें समजतात. त्याशिवाय ऋ. ९. ६७, आणि १०. १३७ या सूक्तांचे भाग भरद्वाजाचे आहेत असेंहि मानितात. परंतु भरद्वाजाविषयीं अथवा त्याच्या वंशजांविषयीं इतिहास म्हणून कांहीं ठाऊक नाहीं. इतर मंत्रकर्त्यांनीं जशी देवांची उपासना स्तोत्रें म्हणून आणि सोम वगैरे अर्पण करून आणि प्रार्थनेच्या योगानें केलेली आढळते, तशीच भरद्वाजाची आणि त्याच्या वंशजांचीहि आहे. ऋ. १०. १५०. ५. यांत वसिष्ठपुत्र मृळीक ऋषि असें म्हणतो कीं, ' अग्नीनें पूर्वी अत्रि, भरद्वाज, गविष्ठिर, कण्व आणि त्रसदस्यु यांला संग्रामप्रसंगीं रक्षिलें, त्याच अग्नीला आतां वसिष्ठपुत्र मृळीक स्तवीत आहे, तर तो मला मृळीकाला

याभि॑र्व॒म्रं वि॑पिपा॒नमु॑पस्तु॒तं क॒लिं याभि॑र्वि॒त्तजा॑निं दुव॒स्यथः॑ ।
याभि॒र्व्य॑श्वमु॒त पृ॒थि॒माव॑तं॒ ताभि॑रू॒ षु ऊ॒तिभि॑रश्विना॒ ग॑तम् ॥
॥ १५ ॥ ३५ ॥

याभिः॑ । व॒म्रम् । वि॒ऽपि॒पा॒नम् । उ॒प॒ऽस्तु॒तम् । क॒लिम् । याभिः॑ । वि॒त्तऽजा॑निम् । दु॒व॒स्यथः॑ ।
याभिः॑ । विऽअ॑श्वम् । उ॒त । पृथि॑म् । आव॑तम् । ताभिः॑ । ऊ॒म् इति॑ । सु । ऊ॒तिऽभिः॑ । अ॒श्वि॒ना । आ । ग॒तम् ॥ १९ ॥ ३९ ॥

---

## भाषायाम्.

१५. [ हे अश्विनौ ], याभिः [ ऊतिभिः ] विपिपानं ( =विशेषेण सोमं पिबन्तं ) वम्रं ( =" विखनसः पुत्रम् एतत्संज्ञमृषिम् " ) उपस्तुतम् ( =एतत्संज्ञम् उपासकं ), याभिः [ ऊतिभिः ] वित्तजानिं कलिं ( =लब्धभार्यं कलिनामकं कंचिदुपासकं ) दुवस्यथः ( =रक्षथः ), [ अपि च ] याभिः [ ऊतिभिः ] व्यश्वम् ( =एतन्नामकम् उपासकम्) उत ( =अपि च ) पृथिम् ( =एतन्नामकमृषिम् ) आवतम् ( =अरक्षतं ) ताभिरू ऊतिभिः ( =तैरेव संरक्षणैः सह ) [ युवां ] सु आ गतं ( =सुष्ठु=अवश्यम् अस्मान् प्रति आगच्छतम् ) ॥

---

रक्षो.' यावरून भरद्वाज हा एक अतिप्राचीन ऋषि होय असें वेदकाळींहि मानीत असत.

प्रस्तुत मंत्रांत 'भरद्वाजाला ज्या प्रसादांनीं पूर्वी रक्षिलें' असें कुत्स ऋषि म्हणतो, यावरून कुत्स ऋषि ( अथवा या सूक्ताचा जो कोणी कर्ता असेल तो तरी ) भरद्वाज ऋषीच्या मागाहून झाला हें उघड आहे. आणि हें जर खरें आहे तर भरद्वाजाचीं सूक्तें ६ व्या मण्डलांत जीं असतील तीं कुत्सऋषीच्या पूर्वीचीं आणि कुत्स ऋषीचीं त्याच्या मागचीं असें म्हटलें पाहिजे.

---

१४. 'अतिथिग्व' हें नांव, आणि 'दिवोदास' हें आडनांव. सायणाचार्य किंचित् निराळा अर्थ करितात, तो भाषेंत उतरून घेतला आहे. 'अतिथिग्व' याविषयीं सू. ५१, मं.६ याजवरील टीप पहा. 'दिवोदास' आडनांव ज्यांचें होय, असे कितीएक देवभक्त वेदांत प्रसिद्ध आहेत. त्यांतून एकाच्या हितासाठीं इन्द्रानें मेघ फोडून वृष्टि केली आणि शंभर नगरें फोडिलीं (ऋ. ४. ३०. २०); तो अग्नीच्या कृपेंतला होता; आणि तो इतका कीं, अग्नीला 'दैवोदास' असें नांव पडलें आहे ( ऋ. ८. ९२. २). 'वध्र्यश्व' म्हणून एक

१९. ज्या [ प्रसादां]नीं तुम्ही मोठा सोमपी वम्र [ आणि ] उपस्तुत यांजवर कृपा करिते झालां, [ आणि ] ज्या [ प्रसादां]नीं बायको मिळालेल्या कलीवर कृपा करिते झालां; [ आणि ] ज्या [प्रसादां]नीं व्यश्व आणि पृथि यांजवर कृपा करिते झालां, त्या प्रसादांसहित, हे अश्वी हो, तुम्ही अवश्य येथें या.

15. With those favours with which you protected Vamra, the great drinker [of Soma], [and] Upastuta, [ and ] with which you befriended Kali who obtained a wife, [ and ] with those [ favours ] with which you protected Vyas'va and Pṛithi—with those, O As'vins, do come hither.

---

भक्त असे त्याला पुत्र नव्हता, व त्यास ऋण होतें. सरस्वतीनें त्याला 'दिवोदास' हा पुत्र दिला व त्याजकडून त्याचें ऋण फेडविलें (ऋ. ६. ६१. १). हा दिवोदास राजा पुष्कळ देवांस प्रीतिपात्र होता. तोच हा अतिथिग्व दिवोदास असावा असें दिसतें.

पण 'कशोजू' हा कोण त्याविषयीं कांहीं इतिहास ठाऊक नाहीं. 'कशोजू' याचा जरी अक्षरशः अर्थ सायणांनीं केला आहे, तरी तें विशेषनाम असावें यांत संशय दिसत नाहीं. तें नांव पुनः ऋग्वेदांत आलेलें आढळत नाहीं. सायणांचा अर्थ भाषेंत पहा.

'शम्बर.' हा कोण याविषयीं सू. ५१, मं. ६ याजवरील टीप पहा.

'त्रसदस्यु' (अक्षरशः अर्थ, ज्यास 'दस्यु' म्हणजे आर्य नव्हेत असे जे भिल्ल आणि कोळी इत्यादिक शत्रु ते भीत होते तो) हें एक उदार राजाचें नांव आहे; आणि तो देवांच्या मोठ्या कृपेंतला भक्त असे. त्याचें आडनांव 'पौरुकुत्स्य,' 'पौरुकुत्सि' अथवा 'पौरुकुत्स.' तो ऋ. ४. ४२ या सूक्ताचा कर्ता होय. याजविषयीं वेदांत पुष्कळ ठिकाणीं उल्लेख आला आहे, ते मंत्र पुढें येत जातील.

'नगरविदारणाचा,' नगरें फोडून टाकण्याचा. म्हणजे शत्रूचीं नगरें फोडून टाकून.

---

१५. 'वम्र' आणि 'उपस्तुत' हीं विशेषनामें होत. सू. ५१, मं. ९ याजवरील टीप पहा. हें नांव आणखी एका ठिकाणीं (ऋ. १०. ९९. ५ यांत) आलें आहे, पण त्याजवरून तरी कांहीं अधिक इतिहास सांपडत नाहीं.

'उपस्तुत' याविषयीं सू. ३६, मं. १०, १७ यांजवरील टीपा पहा.

याभिर्नरा शयवे याभिरत्रये याभिः पुरा मनवे गातुमीषथुः ।
याभिः शारीराजतं स्यूमरश्मये ताभिरू षु ऊतिभिरश्विना गतम् ॥
॥ १६ ॥

याभिः । नरा । शयवे । याभिः । अत्रये । याभिः । पुरा । मनवे । गातुम् । ईषथुः ।
याभिः । शारीः । आजतम् । स्यूमऽरश्मये । ताभिः । ऊम् इति । सु । ऊतिऽभिः । अश्विना । आ । गतम् ॥ १६ ॥

## भाषायाम्.

१६. हे नरा ( =नरौ=वीरौ ), याभिः [ ऊतिभिः ] [ युवां ] शयवे ( =एतन्नामकाय कस्मैचिदृषये ) याभिः [ ऊतिभिः ] अत्रये (=एतन्नामकाय कस्मैचिदृषये ) याभिः पुरा मनवे ( =पूर्वस्मिन् काले मनवे एतन्नामकाय सर्वेषां मनुष्याणाम् आदिपुरुषभूताय ) गातुम् ईषथुः ( =दुःखनिर्गमनरूपं मार्गं वाञ्छितवन्तौ=कृतवन्तौ ) [ अपि च ] याभिः [ ऊतिभिः ] स्यूमरश्मये ( =एतन्नामकायोपासकाय ) शारीः आजतं ( =बाणान् प्रेरयतं ) ताभिरू ऊतिभिः ( =तैरेव संरक्षणैः सह ) हे अश्विना (=अश्विनौ ), [ युवां ] सु आ गतं ( =सुष्ठु=अवश्यम् अस्मान् प्रति आगच्छतम् ) ॥

' कलीवर.' कलि या नांवाच्या मनुष्याला अश्वींनीं वृद्धपणीं तारूण्य दिलें अशी कथा आहे. आणि ' बायको मिळालेला ' (=वित्तजानि ) असें विशेषण जोडिलें आहे, यावरून त्याला वृद्धपणीं बायको प्राप्त झाली असून तारूण्य नव्हतें तें अश्वींनीं दिलें अशी कांहीं तरी कथा असली पाहिजे. तारूण्य दिलें याविषयीं ऋ. १०. ३९. ८ पहा.

' व्यश्व.' हा एक उपासक ऋषि आहे. याविषयीं इतिहास कांहीं म्हणण्यासारिखा टाऊक नाहीं. मात्र ' वरू ' या नांवाचा कोणी एक उदार राजा असे त्याच्या पदरीं व्यश्व आणि त्याचे पुत्र हे होते ( ऋ. ८. २४. २८, २९). ऋ. ८. २६ हें सूक्त व्यश्व ऋषीनें केलेलें आहे.

' पृथि.' या मनुष्याविषयीं कांहींच कथा अवगत नाहीं. प्रस्तुत मंत्राशिवाय दुसऱ्या ठिकाणीं हें नांव आल्याप्रमाणें दिसत नाहीं.

१६. हे शूरांनो, ज्या [प्रसादां]नीं तुम्ही शयूचें, ज्यांनीं अत्रीचें, [ आणि ] ज्यांनीं पूर्वी मनूचें कल्याण करिते झालां, [ आणि ] ज्या [ प्रसादां]नीं स्यूमरश्मीकारणें बाण सोडिते झालां, त्याच प्रसादांसहित, हे अश्वी हो, तुम्ही अवश्य येथें या.

16. With those favours with which, O brave ones, you did good to S'ayu, with which [you did good] to Atri [ and ] with which [ you ] formerly [did good] to Manu, [and] with which you shot arrows for Syûmaras'mi—with those, O As'vins, do come hither.

---

१६. 'शयु,' 'अत्रि,' 'मनु' आणि 'स्यूमरश्मि' हीं सर्व विशेषनामें आहेत. शयूचें कल्याण हें कीं, त्याच्या वांज गाईच्या आंगीं अश्वींनीं दूध उत्पन्न केलें. सू. ११७, मं. २० पहा. रोड आणि वांज गाईच्या आंगीं दूध उत्पन्न केल्याचा जो शयूवर अनुग्रह केला, तो पुष्कळ मंत्रांत सांगितला आहे. पण 'शयु' कोण, कोठला आणि त्याच्या गाईला दूध आणण्याचा काय प्रसंग होता, याविषयीं विशेष कथा कोणत्याच मंत्रांत सांगितलेली नाहीं.

अत्रीविषयीं वर ७ व्या ऋचेवरील टीप पहा.

'मनु' हें ऋषीचें नांव आहे. हा ऋषि वेदांत प्रसिद्ध आहे आणि सर्व मानवांचा जो आदिपुरुष, तोच हा अतिप्राचीन मनु ऋषि होय. अत्रीविषयीं अथवा तशाच फार प्राचीन दुसऱ्या ऋषींविषयीं जसे उल्लेख येतात, तसेच मनूविषयींहि येतात. सू. ८०, मं. १६ याजवरील टीप पहा.

'स्यूमरश्मि' हें एका मनुष्याचें नांव आहे, पण त्याविषयीं विशेष कांहीं ठाऊक नाहीं, 'भार्गव स्यूमरश्मि' म्हणून ऋ. १०. ७७ या सूक्ताचा द्रष्टा आहे. तोच हा असावा. पण बाण सोडण्याचें प्रयोजन काय पडलें व त्याविषयींची कथा काय आहे तें ठाऊक नाहीं.

**याभिः पठर्वा जठरस्य मज्मनाग्निर्नादीदेच्चित इद्धो अज्मन्ना ।**
**याभिः शर्यातमवथो महाधने ताभिरू षु ऊतिभिरश्विना गतम् ॥**
**॥ १७ ॥**

याभिः । पठर्वा । जठरस्य । मज्मना । अग्निः । न । अदीदेत् । चितः । इद्धः । अज्मन् । आ ।
याभिः । शर्यातम् । अवथः । महाऽधने । ताभिः । ऊम् इति । सु । ऊतिऽभिः । अश्विना । आ । गतम् ॥ १७ ॥

---

## भाषायाम्.

१७. [ हे अश्विनौ ], याभिः [ ऊतिभिः ] ( =युवयोः प्रसादैर्हेतुभिः ) पठर्वा ( =एतत्संज्ञः कश्चित्पुरातनः पुरुषो ) जठरस्य मज्मना ( =शरीरस्य महत्त्वेन ), चितः इद्धः अग्निर्न ( =काष्ठैरभिचितः समिद्धश्च यथाग्निर्दीप्यति तथा ), अज्मन् आ ( =संग्रामे ) अदीदेत् ( =अदीप्यत), [ अपि च ] याभिः [ ऊतिभिः ] शर्यातम् ( =एतन्नामकं कंचिदृषिं ) महाधने ( =महासंग्रामे ) [ युवाम् ] अवथः ( =रक्षथः=अरक्षतं), ताभिरू ऊतिभिः ( =तैरेव संरक्षणैः सह ) हे अश्विना ( =अश्विनौ ), [ युवां ] सु आ गतं ( =सुष्ठु=अवश्यम् अस्मान् प्रति आगच्छतम् ) ॥

१७. ज्या [तुमच्या] [प्रसादां]नीं, लांकडें रचून पेटविलेला अग्नि [ प्रकाशतो ] तसा, पठर्वा [आपल्या] शरीराच्या मोठेपणानें युद्धांत प्रकाशला, आणि [ज्या प्रसादां]नीं तुम्ही महायुद्धांत शर्यातावर कृपा करिते झालां, त्याच प्रसादांसहित, हे अश्वी हो, तुम्ही अवश्य येथें या.

17. With those [your] favours through which Patharvan shone in battle with the greatness of his person as does fire burned on a pile, [and] with those [ favours ] with which you favoured S'aryâta in the great battle—with those, O As'vins, do come hither.

---

१७. 'पठर्वा' हें एका मनुष्याचें नांव आहे, असें याच मंत्रावरून स्पष्ट होतें. याशिवाय पठर्व्याविषयीं कांहींच कथा सांगतां येत नाहीं. सायण म्हणतात कीं पठर्वा हा एक राजर्षि म्हणजे देवस्तुति करणारा क्षत्रिय होता, पण तेहि याहून अधिक कांहीं सांगत नाहींत. पठर्वा हें नांव पुनः ऋग्वेदांत कोठें आलेलें नाहीं. अग्नीप्रमाणें पठर्वा प्रकाशला ही जी उपमा आहे, तिचा पूर्ण अर्थ पठर्व्याची कथा काय आहे ती समजल्याशिवाय समजणें थोडें कठिण आहे.

'शर्यात.' हेंहि एका मनुष्याचें नांव आहे, पण त्याविषयीं कथा कांहीं ठाऊक नाहीं. सायणाचार्य म्हणतात कीं, शर्यात हा इन्द्राशीं स्पर्धा करीत होता, त्यास युद्धांत अश्वींनीं सांहाय्य केलें. शर्याताचा पुत्र 'शार्यात.' आणि 'शार्यात' हें नांव ऋग्वेदांत दोन ठिकाणीं आलें आहे. सू. ५१, मं. १२ आणि त्याजवरील टीप पहा.

**याभिरङ्गिरो मनसा निरण्यथोऽग्रं गच्छथो विवरे गोअर्णसः ।**
**याभिर्मनुं शूरमिषा समावतं ताभिरू षु ऊतिभिरश्विना गतम् १८**

याभिः । अङ्गिरः । मनसा । निऽरण्यथः । अग्रम् । गच्छथः । विऽवरे । गोऽअर्णसः ।

याभिः । मनुम् । शूरम् । इषा । सम्ऽआवतम् । ताभिः । ऊम् इति । सु । ऊतिऽभिः । अश्विना । आ । गतम् ॥ १८ ॥

---

## भाषायाम्.

१८. [ हे अश्विनौ ], याभिः [ ऊतिभिः ] ( =यैर्युवयोः प्रसादैः ) [ युवाम् ] अङ्गिरोमनसा ( =अङ्गिरसां मनसा=अङ्गिरोभिः कृतेन स्तोत्रेण ) निरण्यथः (=संतुष्टौ भवथः ) गोअर्णसः विवरे ( =गोरूपस्य धनस्यापावरणे=गवां विवरणे=" गोरूपस्य धनस्य पणिभिर्गुहायां निहितस्य विवरे विवरणे गुहाद्वारस्योद्घाटनेन प्रकाशने विषयभूते सति " ) अग्रं गच्छथः ( =सर्वेभ्योपि पुरतो गच्छथः ) [ अपि च ] याभिः [ ऊतिभिः ] शूरं मनुं ( =वीर्यवन्तं मनुनामकं पुरातनतमम् ऋषिम् ) इषा ( =अन्नेन=अन्नदानेन ) समावतं ( =सम्यगरक्षतं ) ताभिरू ऊतिभिः ( =तैरेव संरक्षणैः सह ) हे अश्विना ( =अश्विनौ ), [ युवां ] सु आ गतं ( =सुष्ठु=अवश्यम् अस्मान् प्रति आगच्छतम् ) ॥

---

१८. 'अंगिरसांच्या स्तुतीवरून,' मूळामध्यें 'अङ्गिरो मनसा' असें संहितेंत आणि 'अंगिरः मनसा' असें पदांत आहे. 'अङ्गिरः' हें पद (वेगळें) घेतलें तर या मंत्राचा अर्थ करण्यास मोठीच अडचण येते. सायण वेगळें घेतात आणि मंत्रकर्ता आपणासच हाक मारितो असें समजतात; आणि, 'हे अङ्गिरसांच्या कुळांत जन्मलेल्या कुत्सा,' असें म्हणून 'तूं अश्वींला स्तव' इतक्या वाक्याचा अध्याहार करितात.' कित्येकांच्या मतें 'अङ्गिरो' हें 'अङ्गिरौ' याऐवजीं आहे (' अङ्गिर ' असा अकारान्तहि शब्द आहे याविषयीं ऋ. १. ८३. ४, ७. ५१. ४ हे मंत्र पहा). आणि तसें मानिल्यास तें अश्वींचें विशेषण करून कदाचित् व्याकरणसंबंधानें निर्वाह करितां येईल; अर्थाविषयीं मात्र चांगलासा निर्वाह होणार नाहीं; 'अङ्गिरसांवर प्रसन्न असलेले अश्वी हो,' असा अर्थ केला तर संभवेल. पण 'अङ्गिरो' हें 'अङ्गिरौ' याऐवजीं नीट संभवत

१८. ज्या [ प्रसादांच्या योगा]नें अंगिरसांच्या स्तुतीवरून तुम्ही आनंदित झालां, [ आणि ] गाई झांकून ठेविलेलें ठिकाण फोडण्यासाठीं [ सर्वांच्या ] पुढें धांवलां, [ आणि ] ज्या [ प्रसादां]नीं शूर मनूला अन्न देऊन रक्षिते झालां, त्या प्रसादांसहित, हे अश्वी हो, तुम्ही अवश्य येथें या.

18. With those favours by which you are delighted with the song of the Angirases, [and] by which you go foremost in breaking open the place where the cows are concealed, [and] with those [favours by which you supported brave Manu with food —with those, O As'vins, do come hither.

---

नाहीं. आम्हीं केलेल्या भाषांतरास, पदच्छेद आहे ह्याशिवाय दुसरी अडचण दिसत नाहीं. पण संहितेंत आणि पदांत व्यस्त पदें असतांहि अर्थ करितांना समस्त मानून, आणि समस्त असतां व्यस्त मानून निर्वाह करितात अशीं उदाहरणें आहेत. सू. १०५, मं. १८ याजवरील सायणभाष्य पहा.

'आनंद पावलां'=' निरण्यथः.' अक्षरशः अर्थ 'आनंद पावतां' असा आहे.

'गाई झांकून ठेविलेलें ठिकाण मोडण्यासाठीं'=' विवरे गोअर्णसः.' 'गोअर्णस्' हा शब्द किंचित् कठिण आहे. पण आम्हीं अक्षरशः अर्थ केला आहे व तो सायणांच्या भावार्थास अनुसरून आहे. 'गाई' म्हणजे मेघोदकेंच समजावयाचीं. मेघोदकरूप आणि प्रकाशरूप गाई वृत्रादिकांनीं हरण केल्यां, तेव्हां त्यांची सुटका व्हावी म्हणून अङ्गिरसांनीं अश्वींची स्तुति केल्यावरून, अश्वी प्रसन्न होऊन, त्या गाईंची मुक्ति करण्यास जे देव धांऊन गेले त्या सर्वांच्या पुढें ते गेले असें तात्पर्य.

'शूर मनूला अन्न देऊन.' यवादि धान्यें पृथ्वीनें लपवून ठेविलीं होतीं तीं अश्वींनीं मनूस दिलीं असें सायणाचार्य म्हणतात.

**याभिः पत्नीर्विमदाय न्यूहथुरा घ वा याभिररुणीरशिक्षतम् ।**
**याभिः सुदास ऊहथुः सुदेव्यं ताभिरू षु ऊतिभिरश्विना गतम् १९**

याभिः । पत्नीः । विऽमदाय । निऽऊहथुः । आ । घ । वा । याभिः । अरुणीः । अशिक्षतम् ।
याभिः । सुऽदासे । ऊहथुः । सुऽदेव्यम् । ताभिः । ऊम् इति । सु । ऊतिऽभिः । अश्विना । आ । गतम् ॥ १९ ॥

---

## भाषायाम्.

१९. [ हे अश्विनौ ], याभिः [ ऊतिभिः ] [ युवां ] विमदाय ( =एतन्नामकाय कस्मैचित्प्रसिद्धायोपासकाय ) पत्नीः (=दारान्=पुरुमित्रस्य दुहितृभूतां शुन्ध्युवं नाम भार्यां ) न्यूहथुः ( =रथे स्थापयित्वा प्रापितवन्तौ ) घ वा ( =अथवा ) याभिः [ऊतिभिः ] अरुणीः ( =आरोचमानाः=आरक्ता गा ) आ अशिक्षतम् ( =अदत्तम् ) [ अपि च ) याभिः [ ऊतिभिः ] सुदासे ( =ऋषय एतत्संज्ञाय पिजवनपुत्राय ) सुदेव्यं ( =शोभनदेवार्हम्=अतिशयेन प्रशस्तं धनम् ) ऊहथुः ( =रथे स्थापयित्वा प्रापितवन्तौ ) ताभिरु ऊतिभिः ( =तैरेव प्रसादैः सह ) हे अश्विना ( =अश्विनौ ), [ युवां ] सु आ गतं ( =सुष्ठु=अवश्यम् अस्मान् प्रति आगच्छतम् ) ॥

सुदेव्यं शोभनदेवानां वृन्दमिति ग्रास्मनादयः । सुदासे पुनरश्विनौ शोभनदेवानां वृन्दमानीतवन्ताविति न कुत्र चित्प्रसिद्धिः । अपि च सति तस्यार्थस्य संभवे भारतवर्षीयः सायणाचार्यः पाश्चिमात्यपण्डितेभ्यः पूर्वमेव तदज्ञास्यत् । स तु सर्वत्र प्रशस्तं धनमिति व्याचष्टे । एवं सति निर्वचनैकावलम्बी पाश्चात्यानामर्थश्चिन्त्य इति भाति ॥

१९. ज्या [ प्रसादां ]नीं तुम्हीं विमदाला पत्नी आणून देते झालां, अथवा ज्या [प्रसादां]नीं आरक्त वर्णाच्या गाई देते झालां, [आणि] ज्या [ प्रसादां ]नीं सुदासाला दिव्य संपत्ति घेऊन आलां, त्या प्रसादांसहित, हे अश्वी हो, तुम्ही अवश्य येथें या.

19. With those favours with which you brought a wife to Vimada, or with which you bestowed the cows, [ and ] with those [ favours ] with which you brought the most splendid wealth to Sudâs—with those, O As'vins, do come hither.

१९. 'विमदाला.' 'विमद' या नांवाचा ऋषि होता, तो देवांच्या कृपेंतील असे. तो इन्द्राचा अथवा प्रजापतीचा पुत्र होय असें वर्णिलें आहे. त्यावरून त्याचें उपनांव 'ऐन्द्र,' अथवा 'प्राजापत्य' असें पडलें आहे. तो ऋ. १०. २०–२६ या सात सूक्तांचा कर्ता होय. त्याला अश्वींनीं स्त्री प्राप्त करून दिली असें वर्णन आहे तेंच या ऋचेंत आणिलें आहे. मुळामध्यें 'पत्नीः' असें अनेकवचन आहे तें एकवचनार्थीं घ्यावें असें सायणाचार्य म्हणतात. तें योग्य आहे, कारण विमदाला एकच स्त्री रथांत घालून आणून दिली असें इतरत्र सांगितलें आहे. तिचें नांव 'शुन्ध्यु;' ती 'वेन' राजाची कन्या असें ऋ. १०. ६५. १२ यावरील भाष्यांत सायण सांगतात. पण ऋ. १०. ३९. ७ यांत ती पुरुमित्राची कन्या व तिचें नांव शुन्ध्यु असून तिला अश्वींनीं रथांत घालून विमदाच्या घरीं आणिली असें सांगितलें आहे. रथांत घालून आणिली याचें तात्पर्य पुरुमित्राबरोबर लढून त्याजपासून जिंकून हरण करून आणिली असें दिसतें.

'गाई देते झालां.' ह्या कोणास दिल्या तें कळत नाहीं. विमदालाच असतील; पण इतर मंत्रांत तसें सांगितलेलें नाहीं.

'सुदास.' हें एका प्रसिद्ध राजाचें नांव आहे. हा दिवोदासाचा पुत्र. ह्याचें उपनांव पैजवन, म्हणजे 'पिजवन' याच्या कुळांत जन्मलेला. सू. ४७, मं. ६ आणि टीप पहा.

**याभिः शंताती भवथो ददाशुषे भुज्युं याभिरवथो याभिरध्रिगुम् ।**
**ओम्यावतीं सुभरामृतस्तुभं ताभिरू षु ऊतिभिरश्विना गतम् ॥**
॥ २० ॥ ३६ ॥

याभिः । शंताती इति शम्ऽताती । भवथः । ददाशुषे । भुज्युम् ।
याभिः । अवथः । याभिः । अध्रिऽगुम् ।
ओम्याऽवतीम् । सुऽभराम् । ऋतऽस्तुभम् । ताभिः । ऊम् इति । सु ।
ऊतिऽभिः । अश्विना । आ । गतम् ॥ २० ॥ ३६ ॥

**याभिः कृशानुमसने दुवस्यथो जवे याभिर्यूनो अर्वन्तमावतम् ।**
**मधु प्रियं भरथो यत्सरड्भ्यस्ताभिरू षु ऊतिभिरश्विना गतम् ॥**
॥ २१ ॥

याभिः । कृशानुम् । असने । दुवस्यथः । जवे । याभिः । यूनः । अ-
र्वन्तम् । आवतम् ।
मधु । प्रियम् । भरथः । यत् । सरट्ऽभ्यः । ताभिः । ऊम् इति । सु ।
ऊतिऽभिः । अश्विना । आ । गतम् ॥ २१ ॥

---

## भाषायाम्.

२०. [ हे अश्विनौ ], याभिः [ ऊतिभिः ] [ युवां ] ददाशुषे ( =हविर्दत्तवते यजमानाय ) शंताती भवथः ( =सुखकारिणौ भवथः ) [ अपि च ] याभिः [ ऊतिभिः ] [ युवां ] भुज्युम् अवथः ( =भुज्युनामकं कंचिदुपासकम् अरक्षतं ) याभिः अध्रिगुम् ( =एतन्नामकमृषिम् ) [ अवथः ] [ अपि च ] [ याभिरूतिभिः ] सुभरां ( =शोभनस्तोत्रस्य कर्त्रीम् ) ऋतस्तुभम् ( =एतत्संज्ञां कांचिद्युवयोरुपासनापरां स्त्रियम् ) ओम्यावतीं ( =सुखयुक्ताम् ) [ अवथः ] ( =सुखयुक्तां कृत्वा रक्षितवन्तौ ) ताभिरू ऊतिभिः ( =तैरेव प्रसादैः सह ) हे अश्विना ( =अश्विनौ ), [ युवां ] सु आ गतं ( =सुषु=अवश्यम् अस्मान् प्रति आगच्छतम् ) ॥

२१. [ हे अश्विनौ ], याभिः [ ऊतिभिः ] [ युवां ] कृशानुम् ( =एतत्संज्ञं पुरुषम् ) असने ( =इषुक्षेपणे ) दुवस्यथः ( =रक्षथः=अरक्षतं ) याभिः यूनः ( =तरुणस्य=पुरुकुत्सस्य ) अर्वन्तम् ( =अश्वं ) जवे ( =" वेगे प्रवृत्तम् ") आवतम् ( =अरक्षतम्) [ अपि च ] यत् (=यस्मात् कारणात्=याभिरूतिभिः) प्रियं मधु (=क्षौद्रं)

२०. ज्या [ प्रसादां ]नीं तुम्ही हविर्दात्या उपासकाला कल्याणदायक होत असतां, ज्यांनीं भुज्यूवर, [ आणि ] ज्यांनीं अध्रिगूवर तुम्ही कृपा करिते झालां, [ आणि ] ज्या [ प्रसादां ]नीं चांगलें स्तोत्र करणारे ऋतस्तुभेला तुम्ही सुखी करिते झालां, त्या प्रसादांसहित, हे अश्वी हो, तुम्ही अवश्य येथें या.

20. With those favours with which you become beneficent to him who has offered oblations [unto you], with which you benefited Bhujyu and benefited Adhrigu [ and ] with which you made Ṛitastubh, who offered good prayers, happy—with those, O As'vins, do come hither.

२१. ज्या [ प्रसादां ]नीं तुम्ही बाण सोडण्याच्या प्रसंगीं कृशानूवर कृपा करिते झालां, ज्यांनीं धांवण्याच्या प्रसंगीं [त्या] तरुणाच्या घोड्याला तुम्ही साहाय्य करिते झालां, [ आणि ] ज्यांनीं मधमाशांला तुम्ही प्रिय मध मिळवून देतां, त्या संरक्षणांसहित, हे अश्वी हो, तुम्ही अवश्य येथें या.

21. With those favours with which you favoured Kris'ânu in shooting [ arrows ], with which you favoured the horse of the youth in the race, [ and ] with which you bring the beloved honey to the bees—with those, O As'vins, do come hither.

---

२०. भुज्यु, अध्रिगु आणि ऋतस्तुभ् हीं विशेषनामें होत. त्यांपैकीं ऋतस्तुभ् हें एका स्त्रियेचें नांव आहे.

भुज्यु याला अश्वींनीं पाण्यांतून वर काढून वांचविलें. याच सूक्ताचा ६ वा मंत्र आणि टीप पहा.

'अध्रिगु.' हा कोण होता तें ठाऊक नाहीं, मात्र पक्थ राजाला आणि बभ्रु राजाला जसें अश्वींनीं रक्षिलें तसें त्यांनीं संकटसमयीं अध्रिगूलाहि रक्षिलें असें (ऋ. ८. २२. १० यांत) सांगितलें आहे, आणि त्या मंत्रावरील भाष्यांत 'अध्रिगु' हा कोणी राजा असे असें सायणाचार्य म्हणतात.

'ऋतस्तुभ्,' हिजविषयीं कांहीं कथा प्रसिद्ध नाहीं. हें नांव सुद्धा दुसऱ्या ठिकाणीं ऋग्वेदांत आलेलें आढळत नाहीं. कितीएक विद्वान् ऋतस्तुभ् हें विशेषण करून 'सुभरा' हें विशेषनाम करितात. पण त्याला कल्पनेशिवाय दुसरा

याभिर्नरं गोषुयुधं नृषाह्ये क्षेत्रस्य साता तनयस्य जिन्वथः ।
याभी रथाँ अवथो याभिरर्वतस्ताभिरू षु ऊतिभिरश्विना गतम् ॥
॥ २२ ॥

याभिः । नरम् । गोषुऽयुधम् । नृऽसह्ये । क्षेत्रस्य । साता । तनयस्य ।
जिन्वथः ।
याभिः । रथान् । अवथः । याभिः । अर्वतः । ताभिः । ऊम् इति ।
सु । ऊतिऽभिः । अश्विना । आ । गतम् ॥ २२ ॥

सरट्भ्यः ( =मधुमक्षिकाभ्यो ) भरथः ( =आनयथः ) ताभिरू ऊतिभिः ( =तैरेव प्रसादैः सह ) हे अश्विना ( =अश्विनौ ), [ युवां ] सु आ गतं ( =सुष्ठु=अवश्यम् अस्मान् प्रति आगच्छतम् ) ॥

## भाषायाम्.

२२. [ हे अश्विनौ ], याभिः [ ऊतिभिः ] गोषुयुधं ( =गोषु विषयेषु युध्यन्तं ) नरं ( =वीरं=वीरान् ) नृषाह्ये ( =संग्रामे ) क्षेत्रस्य ( =भूम्याः ) तनयस्य ( =पुत्रपौत्रादिसंततेश्च ) साता ( =सातौ=लाभे विषये ) जिन्वथः ( =रक्षथः ) [ अपि च ] याभिः [ ऊतिभिः ] रथान् याभिश् [ च ] [ युवाम् ] अर्वतः ( =अश्वान् ) अवथः ( =रक्षथः ) ताभिरू ऊतिभिः ( =तैरेव संरक्षणैः सह ) हे अश्विना ( =अश्विनौ ), [ युवां ] सु आ गतं ( =सुष्ठु=अवश्यम् अस्मान् प्रति आगच्छतम् ) ॥

आधार नाहीं इतकेंच नव्हे तर 'सुभरा' हें नांव कल्पिलें तर त्याविषयीं म्हणजे कांहीं विशेष इतिहास ठाऊक आहे असें हि नाहीं.

२१. 'कृशानु' हें विशेषनाम. सायणाचार्य तैत्तिरीय ब्राह्मणानुसारें वगैरे म्हणतात कीं हस्त, सुहस्त आणि कृशानु हे सोमपाल म्हणजे सोमाचें रक्षण करणारे होत. सोम चोरावयास चोर आले तेव्हां कृशानूनें बाण मारून सोम चोरीस जाऊं दिला नाहीं. पण ऋग्वेदसंहितेंत कृशानूविषयीं यापेक्षां कांहीं अधिक सांगितलेलें नाहीं. दुसऱ्या दोन तीन मंत्रांत कृशानूविषयीं उच्चार आला आहे तेथें त्याणें बाण मारिला त्या गोष्टीचा किंचित् उल्लेख मात्र केला आहे.

'त्या तरुणाच्या'= 'यूनः'. तरुण म्हणजे येथें पुरुकुत्स असें सायणाचार्य म्हणतात. सू. ६३, मं. ७ याजवरील टीप पहा.

'मधमाशांना'='सरट्भ्यः'. यावरून स्पष्ट होतें कीं मधमाशांची देवता अश्वी

२२. ज्या तुमच्या [प्रसादां]नीं गाईसाठीं लढणाऱ्या [ उपासक ] वीराला तुम्ही युद्धांत [ रक्षितां ] [ आणि ] शेताच्या [ आणि ] संततीच्या लाभाविषयीं उपासकावर अनुग्रह करितां, [ आणि ] ज्या [ प्रसादां]नीं रथ [ आणि ] ज्यांनीं घोडे रक्षितां, त्या प्रसादांसहित, हे अश्वी हो, तुम्ही अवश्य येथें या.

22. With those favours with which you protect in battle the hero who fights for cows, and aid him to obtain land and progeny, [and] with which you protect cars [and] horses—with those, O As'vins, do come hither.

देव होत असें आपले आर्य पूर्वज मानीत होते, व मधमाशा मध करितात तो अश्वींचा प्रताप होय. अश्वी हे मध आणणारे होत याविषयीं उल्लेख ऋग्वेदांत पुष्कळ ठिकाणीं आलेले आहेत. सू.३४ मं. ३, सू. ४७ मं. ४ आणि सू. २२ मं. ३ आणि टिपा पहा.

'प्रिय.' मधमाशा ज्यास लंपट होतात तो, अथवा जो सर्वांस प्रिय होय असा.

२२. भावार्थः– 'हे अश्वी हो, तुम्ही ज्या प्रसादबुद्धींनीं गाई मिळाव्या म्हणून लढणाऱ्याचा मनोरथ युद्धांत पूर्ण करितां आणि शेतें भातें आणि संतति प्राप्त व्हावी म्हणून प्रयत्न करणाऱ्याचा मनोरथ सिद्धीस नेतां, आणि ज्या प्रसादबुद्धींनीं युद्धांत रथ आणि घोडे हे रक्षितां त्या प्रसादबुद्धींसहित तुम्ही आम्हांप्रत या.'

'गाईसाठीं लढणाऱ्या वीराला'='गोषु युधं नरम्.' म्हणजे शत्रूच्या गाई आपणास मिळाव्या म्हणून शत्रूशीं लढणारा जो वीर त्याला. अशा प्रकारच्याच लढाया प्राचीन काळीं पुष्कळ होत असत. विराट् राजाच्या गाई कौरवांनीं वळवून नेल्या तेव्हां अंतर्हितरूप अर्जुनानें त्या पराक्रमानें परत आणिल्या अशी जी कथा आहे तींतील युद्ध तरी अशा प्रकारचेंच आहे.

याभिः कुत्समार्जुनेयं शतक्रतू प्र तुर्वीतिं प्र च दभीतिमावतम् ।
याभिर्ध्वसन्तिं पुरुषन्तिमावतं ताभिरू षु ऊतिभिरश्विना गतम् ॥
॥ २३ ॥

याभिः । कुत्सम् । आर्जुनेयम् । शतक्रतू इति शतऽक्रतू । प्र । तुर्वीतिम् । प्र । च । दभीतिम् । आवतम् ।
याभिः । ध्वसन्तिम् । पुरुऽसन्तिम् । आवतम् । ताभिः । ऊम् इति । सु । ऊतिऽभिः । अश्विना । आ । गतम् ॥ २३ ॥

---

## भाषायाम्.

२३. हे शतक्रतू (=शतप्रज्ञौ) [अश्विनौ], याभिः [ऊतिभिः] [युवाम्] आर्जुनेयं कुत्सम् (=अर्जुनपुत्रम् अर्जुन्याः पुत्रं वा कुत्सनामकम् ऋषिम्) [आवतम्=अरक्षतं] तुर्वीतिं प्र [आवतं] (=तुर्वीतिम् एतत्संज्ञं पुरुषं प्रकर्षेणारक्षतं) दभीतिं च प्रावतं (=दभीतिनामकं राजानं च रक्षितवन्तौ) [अपि च] याभिः [ऊतिभिः] ध्वसन्तिं पुरुषन्तिं [च] (=एतन्नामानौ) [युवाम्] आवतम् (=अरक्षतं) ताभिरू ऊतिभिः (=तैरेव प्रसादैः सह) हे अश्विना (=अश्विनौ), [युवां] सु आ गतं (=सुष्टु अवश्यम् अस्मान् प्रति आगच्छतम्) ॥

---

२३. 'आर्जुनेय कुत्स.' म्हणजे अर्जुनाचा पुत्र. कुत्स ऋषीविषयीं सू. ५१, मं. ६ याजवरील टीप पहा. कुत्स ऋषि इन्द्राच्याहि प्रीतींतला होता. कां कीं इन्द्रानें त्यासाठीं शुष्णाचा वध केला असें वेदांत पुष्कळ ठिकाणीं सांगितलें आहे. ऋ. १. ९४–११५ या सूक्तांचा द्रष्टा जो कुत्स तो वेगळा दिसतो, कारण त्याचें गोत्रनांव आंगिरस असें आहे, आणि या कुत्साचें गोत्रनांव 'आर्जुनेय' आहे. आर्जुनेय याचा अक्षरशः अर्थ अर्जुनाचा पुत्र असा आहे. 'अर्जुन' हें एका मनुष्याचें नांव किंवा इंद्राचें विशेषण. आणि 'आर्जुनेय' म्हणजे अर्जुन या मनुष्याचा पुत्र किंवा 'इंद्राच्या कृपेंतला,' 'इन्द्रवक्ष.' इंद्राची कृपा कुत्सावर होती म्हणून त्याला 'आर्जुनेय' हें उपनांव प्राप्त झालें असेल.

परंतु ऋ. ४. २६. १ आणि ७. १९. २, ८.१.११ यांजवर सायणाचार्य म्हणतात कीं आर्जुनेय म्हणजे अर्जुनी या स्त्रियेचा पुत्र म्हणून 'आर्जुनेय.' आणि प्रस्तुत मंत्रावरील भाष्यांत मात्र 'अर्जुन' हें इंद्राचें नांव आणि त्यावरून कुत्साला 'आर्जुनेय' हें नांव पडलें आहे असें ते म्हणतात.

२३. हे शतप्रज्ञ [ अश्वी ] हो, ज्या प्रसादांनीं तुम्ही आर्जुनेय कुत्सावर, तुर्वीतीवर आणि दभीतीवर कृपा करिते झालां,[ आणि ] ज्या [ प्रसादां]नीं ध्वसंतीवर [ आणि ] पुरुषंतीवर कृपा करिते झालां, त्या प्रसादांसहित, हे अश्वी हो, तुम्ही अवश्य येथें या.

23. With those favours with which O [ gods ] of a hundred wisdoms, you protected Kutsa the Ârjuneya, [ protected ] Turvîti and also Dabhîti, and with which you protected Dhvasanti [ and ] Purushanti—with those, O As'vins, do come hither.

---

'तुर्वीति.' सू. ३६, मं. १८ याजवरील टीप पहा.

'दभीति.' हा एक राजर्षि म्हणजे देवभक्त देवस्तुतिपाठक राजा होता असें सायणाचार्य म्हणतात ( ६. २०. १३ ). तो इंद्रादिक देवांची उपासना करीत असे. इंद्रानें दभीति राजाचे 'चुमुरि' आणि 'धुनि' या नांवांचे शत्रु मारून त्याचें रक्षण केलें ( ऋ. २. १५. ९; ६. २६. ६; ७. १९. ४; १०. ११३. ९; २. १५. ४ ). इंद्रानें तीस हजार 'दास' अथवा 'दस्यु' ( म्हणजे कोळी इत्यादि जे अनार्य जन आर्य जनांस उपद्रव देत होते ते ) मारून त्यांस जमिनीवर निजविलें (=मारून टाकिलें), आणि दभीतीला रक्षिलें ( ऋ. ४. ३०. २१ ). दभीतीचें संरक्षण अश्वींनीं केलें असें प्रस्तुत मंत्रांत मात्र सांगितलें आहे. तर इंद्रभक्त दभीति राजाला अश्वींनीं रक्षिलें असें ऋषि म्हणतो याचें तात्पर्य काय? अश्वींची स्तुति करावयाची आहे, आणि पुरातन काळचे जे प्रसिद्ध भक्त त्यांचीं नांवें घेऊन त्यांस ( इंद्रानेंच केवळ रक्षिलें असें नाहीं तर ) अश्वींनींहि रक्षिलें असें म्हणणें साहजिक आहे.

'ध्वसन्ति.' या मनुष्याविषयीं कांहींच इतिहास ठाऊक नाहीं.

'पुरुषन्ति.' या पुरुषाविषयींहि कांहीं कथा ठाऊक नाहीं.

'शतप्रज्ञ' हें येथें अश्वींचें विशेषण आहे. मुळांत 'शतक्रतु' असें आहे हें बहुतकरून इन्द्राचें विशेषण ( याच अर्थी ) असतें व त्यावरूनच पुराणांत वगैरे इन्द्रानें शंभर यज्ञ करून ( क्रतुशब्दाचा अर्थ यज्ञ असा अर्वाचीन संस्कृत भाषेंत होतो ) इन्द्रत्व मिळविलें अशी कथा निर्माण झाली. तेव्हां अश्वींनींहि शंभर यज्ञ केले होते कीं काय? वेदाचा अर्थ समजल्याशिवाय पुराणादिकांचा खरा अर्थ समजावयाचा नाहीं.

**अप्न॑स्वतीमश्विना॒ वाच॑म॒स्मे कृ॒तं नो॑ दस्रा वृषणा मनी॒षाम् ।**
**अ॒द्यू॒त्येऽव॑से॒ नि ह्व॑ये वां वृ॒धे च॑ नो भवतं॒ वाज॑सातौ ॥ २४ ॥**

अप्न॑स्वतीम् । अ॒श्वि॒ना॒ । वाच॑म् । अ॒स्मे इति॑ । कृ॒तम् । नः॒ । द॒स्रा॒ । वृ॒ष॒णा॒ । म॒नी॒षाम् ।
अ॒द्यू॒त्ये । अव॑से । नि । ह्व॒ये॒ । वा॒म् । वृ॒धे । च॒ । नः॒ । भ॒व॒त॒म् । वाज॑ऽसातौ ॥ २४ ॥

## भाषायाम्.

२४. हे अश्विना ( =अश्विनौ ), अस्मे वाचम् ( =अस्माकमिमां स्तुतिरूपां वाणीम् ] अप्नस्वतीं [ कृतं ] ( =कर्मवतीं कुरुतं=संपादितेष्टां कुरुतम् ) । हे दस्रा वृषणा ( =दस्रौ वृषणौ=पराक्रमकारिणौ वीर्योपेतौ देवौ ), नः मनीषाम् ( =अस्माकं स्तुतिम्=अस्माभिः क्रियमाणामिमां स्तुतिम् ) [ अप्नस्वतीं ] कृतं ( =कर्मवतीं= संपादितेष्टफलां कुरुतम् ) । अद्यूत्ये ( =" द्योतनरहिते प्रकाशनरहिते रात्रेः पश्चिमे यामे " ) वां ( =युवाम् ) [ अहम् ] अवसे ( =रक्षणाय ) नि ह्वये ( =नितराम् आह्वयामि ) [ तस्मात् अस्मान् रक्षितुं युवामागच्छतम् ] च ( =अपि च ) वाजसातौ ( =संग्रामे ) [ युवां ] नः वृधे ( =अस्माकं वृद्धये=अस्माकं वृद्धेः कर्तारौ ) भवतम् ॥

अद्यूते कुत्सितद्यूते अपायोपेतद्यूत इति रोथग्रास्मानौ । कष्टं संग्रहस्तयोः कष्टम् अनुसरणं सायणस्य ॥ अथवा द्यूतमिति संग्रामस्य नाम भवतु । तथा सति अद्यूते अप्रसक्ते संग्रामे वाजसातौ च प्रसक्ते च संग्रामे अहं युवां नि ह्वय इति योजनीयम् ॥

२४. हे पराक्रमकारी वीर्यवंत अश्वी हो, [ ही ] आमची प्रार्थना [ आणि ] भक्ति तुम्ही कृतकृत्य करा. मी पहांटेस रक्षणासाठीं तुमचा धांवा करितों; आणि तुम्ही संग्रामांत आमचा विजय होई असें करा.

24. Make, O As'vins, this our prayer and this our praise successful, O heroes, O mighty gods! I invoke you for help in the early hour of morning: and be you the cause of our success in battle.

---

२४. 'कृतकृत्य करा'='अप्नस्वतीं कृतम्.' 'अप्नस्वती' याचा अर्थ येथें सायणाचार्यांस अनुसरून 'कर्मयुक्त' असा करून शब्दव्युत्पत्तीच्या भावार्थास अनुसरून आम्हीं भाषांतर केलें आहे. 'अप्नः' आणि 'अप्नस्वती' हे शब्द जेथें जेथें आले आहेत ते सर्व मंत्र वाचून पाहतां सायणांनीं केलेला अर्थ आधारबद्ध दिसतो. ते एका ठिकाणीं 'अप्नः' म्हणजे धन असा अर्थ करितात खरा, पण तेवढ्या एकच मंत्रांत तो आहे ( ऋ. १. ११३. २० ). तो अर्थ घेतल्यास 'ही आमची प्रार्थना [ आणि ] भक्ति आम्हांस धनदायक होई असें करा' असें भाषांतर करितां येईल. पण वर केलेला अर्थ बरा दिसतो. कारण अक्षरशः अर्थ व्हावयाचा होऊन पर्यवसानीं 'धनदायक होई असें करा' असा भावार्थ निवतच आहे.

'पहांटेस'='अद्यूत्ये.' अक्षरशः अर्थ 'द्यूत' नसतां. आम्हीं सायणांस अनुसरून अर्थ केला आहे. कितीएक विद्वान् 'हानि ज्यांत होत आहे अशा जुगाराच्या वेळीं' असा अर्थ करितात. भाषा पहा. संग्राम नसतांना (=अद्यूते ) आणि संग्राम असतांना (=वाजसातौ ) मी धांवा करितों असा अर्थ बरा संभवतो.

वृत्तानुसारेंकरून तिसरा चरण 'अद्यूतिए अवसे नि ह्वये वाम्' असा म्हटला पाहिजे.

द्युभिरक्तुभिः परि पातमस्मानरिष्टेभिरश्विना सौभगेभिः ।
तन्नो मित्रो वरुणो मामहन्तामदितिः सिन्धुः पृथिवी उत द्यौः ॥
॥ २५ ॥ ३७ ॥ ७ ॥

द्युऽभिः । अक्तुऽभिः । परि । पातम् । अस्मान् । अरिष्टेभिः । अश्विना । सौभगेभिः ।
तत् । नः । मित्रः । वरुणः । ममहन्ताम् । अदितिः । सिन्धुः । पृथिवी । उत । द्यौः ॥ २९ ॥ ३७ ॥ ७ ॥

---

## भाषायाम्.

२५. हे अश्विना (=अश्विनौ), अरिष्टेभिः सौभगेभिः (=अरिष्टैः सौभगैः=अहिंसितैर्धनैः अहिंसितानि धनानि अस्मभ्यं दत्त्वा ) अस्मान् द्युभिः अक्तुभिः ( =दिवसै रात्रिभिश्च ) परि पातं (=परितः पालयतम् ) । तत् (=एतच्च ) मित्रः, वरुणः, अदितिः (=एतन्नाम्नी देवानां माता ), सिन्धुः (=समुद्राभिमानिनी देवता ) पृथिवी उत द्यौः (=पृथिवी द्युलोकश्च ) [ इत्येते ] नः ममहन्ताम् (=अस्मभ्यम्=अस्मदर्थं पूजयन्तु=ददतु ) ॥

---

२५. हे अश्वी हो, तुम्ही आम्हांस परिपूर्ण सौभाग्य देऊन दिवसा आणि रात्रीं आम्हांस रक्षा. आणि हें [ दान ] मित्र, वरुण, अदिति, सिंधु, पृथिवी आणि द्यु आम्हांस देओत.

25. Day and night, O As'vins, protect us on all sides with unobstructed blessings. And May Mitra, Varuṇa, Aditi, the Sea, Earth and Heaven confirm this unto us.

---

२५. हा या सूक्ताचा येथें उपसंहार झाला. शेवटीं कुत्स ऋषि अश्वींपाशीं वर मागतो कीं, 'हे अश्वी हो, तुम्ही रात्रंदिवस आम्हांस चोहोंकडून रक्षा आणि ज्यांचा कोणीहि नाश करूं शकत नाहीं अशीं धनें आम्हांस द्या. आणि हा वर मित्र, वरुण, इत्यादि देवहि आम्हांस देओत.'

ही प्रार्थना लक्ष्यांत ठेवण्याजोगी आहे. यावरून उघड दिसून येतें कीं वैदिक युगांतील मनुष्यें मोठ्या भाविक बुद्धीनें देवांवर अवलंबून राहात.

'सौभाग्य'=कल्याण, बरें, धनसंपत्ति इत्यादि.

येथें प्रथमाष्टकाचा सातवा अध्याय संपला.

## सूक्तम् ११३.

आङ्गिरसः कुत्स ऋषिः । द्वितीयोर्धर्चो रात्र्युषसोः । शिष्टं सूक्तम् उषोदेवताकम् । त्रिष्टुप् छन्दः ॥

**इदं श्रेष्ठं ज्योतिषां ज्योतिरागाच्चित्रः प्रकेतो अजनिष्ट विभ्वा ।**
**यथा प्रसूता सवितुः सवायँ एवा रात्र्युषसे योनिमारैक् ॥ १ ॥**

इदम् । श्रेष्ठम् । ज्योतिषाम् । ज्योतिः । आ । अगात् । चित्रः । प्रऽकेतः । अजनिष्ट । विऽभ्वा ।
यथा । प्रऽसूता । सवितुः । सवाय । एव । रात्री । उषसे । योनिम् । अरैक् ॥ १ ॥

---

### भाषायाम्.

१. इदम् [ उषोरूपं ] ज्योतिषां श्रेष्ठं ज्योतिः (=सर्वेषां सूर्यचन्द्रतारकादिरूपाणां प्रकाशानां मध्ये प्रशस्ततमः प्रकाशः) आ अगात् (=पूर्वस्यां दिशि प्रादुरभूत्) । चित्रः (=चायनीयः=उत्तमो) विभ्वा (=व्यापकः) प्रकेतः (=उषोरूपो रश्मिः) अजनिष्ट (=आविरभूत्) । रात्री यथा [ स्वयं ] सवितुः प्रसूता (=सवितुः सकाशात् प्रादुर्भूता) एव (=एवं=तथा) सवाय (=उषसः प्रसवाय) उषसे योनिम् अरैक् (=स्थानम् आरेचितवती=उषसः प्रादुर्भावाय दिङ्मण्डलं त्यक्त्वा स्वयं निर्गच्छति) ॥

अथवा सवितुः सवायेति पदद्वयमेकान्वयं भवतु । तत्र सवितुः सवाय सवितुर्जन्मने सविता प्रादुर्भवेदिति हेतोरुषा यथा यस्मात् कारणात्प्रसूता प्रादुर्भूतास्ति एव तस्मात् कारणात् तस्य हेतोः सिद्धये रात्री उषसोर्थं दिङ्मण्डलस्थानान्युज्झित्वा निर्गच्छतीति योज्यम् ॥

---

१. येथून पहिल्या अष्टकाच्या आठव्या अध्यायाला आरंभ झाला. हें पहिलें सूक्त उषेविषयीं आहे. उषा ही कोण तें सू. ४८ मं. १, सू. ४९ मं. १ यांजवरील टिपा पहा. पहिल्या मंत्राच्या पूर्वार्धाची देवता रात्री होय असें अनुक्रमणिकेंत लिहिलें आहे त्याप्रमाणें आम्हीं उतरून घेतलें आहे. यावरून देवता म्हणजे देव असा अर्थ नाहीं हें स्पष्ट होतें, तर ज्याविषयीं ऋचा रचलेल्या आहेत, जें ऋचांचें विषयभूत होय असें कांहीं असेल तें, मग तो देव असो, देवी असो, उखळ असो, मुसळ असो. याप्रमाणेंच प्रथमार्धाची ‘ देवता ’ रात्री

## सूक्त ११३.

ऋषि—आङ्गिरसकुळांतील पुरुष कुत्स. देवता—पहिल्या ऋचेच्या उत्तरार्धाची, रात्रि; आणि राहिलेल्या सर्व सूक्ताची उषा. वृत्त—त्रिष्टुभ्.

१. हें सकल तेजांमध्यें श्रेष्ठ तेज इकडे आलें पहा, [ हा ] सुंदर [ आणि ] जिकडे तिकडे पसरणारा प्रकाश दिसत आहे पहा. ही रात्र सवित्यापासून आपण जशी उत्पन्न झाली तशी ती उषेचा जन्म व्हावा म्हणून तिजकरितां जागा मोकळी करीत आहे.

## HYMN 113.

By *Kutsa* of the family of the *Angirases*. To *Ushas* i. e. Dawn (except the second half of the first *Ṛich* where it is *Râtrî*, or Night). Metre—*Trishṭubh*.

1. This light the best of lights is come. The beautiful [and] extensive splendour has made its apearance. As Night was born of Savitâ so is she making room for Ushas that she may be born.

---

होय; इतक्यावरूनच कुत्स ऋषि रात्रीला देवी मानितो आहे असें समजूं नये. वस्तुतः हें सूक्त उषेविषयीं आहे इतकेंच म्हटलें तरी चालेल. ऋग्वेदांत जीं कितीएक फार सुंदर सूक्तें आहेत त्यांत मुख्य उषेस अनुलक्षून असलेलीं सूक्तें होत. उषा म्हणजे प्रभात, पहांट.

या प्रस्तुत मंत्रांत ऋषि प्रभातकालीं जागृत होऊन बाहेर आकाशाकडेस पाहून, उषा ( म्हणजे सूर्योदयापूर्वीं येणारा जो प्रकाश जिकडे तिकडे फांकतो आणि रात्रीस हाकून लावितो, तो ) पाहून म्हणतो आहे कीं, ' ही पहा उषा (=प्रभात ) येत आहे, आणि तिचा सुंदर प्रकाश सर्वत्र पसरत आहे. आणि रात्र प्रगट व्हावी म्हणून जसा सूर्य काल संध्याकाळीं निघून गेला, आणि मग रात्र सूर्यापासून जणूं जन्मली, तशी उषा उत्पन्न व्हावी म्हणून रात्र आपलें स्थान सोडून जात आहे.'

' हें...श्रेष्ठ तेज '=' इदं श्रेष्ठं ज्योतिः.' म्हणजे उषाच. कित्येकांचे मतें सविता विवक्षित आहे. पण उत्तरार्धांत उषेचें येणें सांगितलें त्यापेक्षां उषेच्या पूर्वीं सूर्योदय होतो असें समजल्यासारिखें होईल.

' प्रकाश '=' प्रकेतः'. म्ह० उषाच.

' सवित्यापासून......उत्पन्न झाली' =' प्रसूता सवितुः.' कितीएक 'सवितुः' ही षष्ठी समजतात, आणि ' सवितुः सवाय ' हे शब्द एकान्वयानें घेतात.

रुशद्वत्सा रुशती श्वेत्यागादारैगु कृष्णा सदनान्यस्याः ।
समानबन्धू अमृते अनूची द्यावा वर्णं चरत आमिनाने ॥ २ ॥

रुशत्ऽवत्सा । रुशती । श्वेत्या । आ । अगात् । अरैक् । ऊम् इति । कृष्णा । सदनानि । अस्याः ।

समानबन्धू इति समानऽबन्धू । अमृते इति । अनूची इति । द्यावा । वर्णम् । चरतः । आमिनाने इत्याऽमिनाने ॥ २ ॥

## भाषायाम्.

२. रुशद्वत्सा ( =रोचमानसूर्यरूपवत्सा ) रुशती ( =रोचमाना=दीप्ता ) श्वेत्या ( =श्वेतवर्णा=उषा ) आ अगात् ( =आगतवती पश्य ) उ ( =उत=अपि च ) कृष्णा ( =कृष्णवर्णा=रात्री ) सदनानि ( =दिङ्मण्डलस्थानानि ) अस्याः ( =उषसः =उषसे ) अरैक् ( =आरेचितवती=त्यक्त्वा निर्गच्छति पश्य ) । समानबन्धू (=एकसंबन्धे ) अमृते ( =अमरणधर्मिणी ) अनूची ( =अन्वञ्चन्त्यौ प्रथममेका पश्चादन्येति क्रमेण गच्छन्त्यौ ) द्यावा ( =द्यावौ=दिवि भवे=द्योतमाने ) वर्णम् आमिनाने ( =विश्वस्य रूपं हिंसन्त्यौ=रात्री स्वप्रादुर्भावेन वस्तुजातं कृष्णं करोति उषाश्च स्वप्रकाशेन दीप्तं करोति इति प्रकारेण विश्वं प्राप्तवर्णान्तरं कुर्वत्यौ ) चरतः ( =प्रतिदिवसं गच्छतः ) ॥

अत्र सायणः । श्वेत्येत्युषसो नामधेयम् । रुशती दीप्ता श्वेत्या श्वेतवर्णोषा रुशद्वत्सा रुशद्दीप्तः सूर्यो वत्सो यस्याः सा तथोक्ता । यथा मातुः समीपे वत्सः संचरति । एवमुषसः समीपे सूर्यस्य नित्यमवस्थानाद्वत्सत्वम् । अथ वा यथा वत्सो मातुः स्तन्यं रसं पिबन्हरति । एवमुषसोऽवश्यायाख्यं रसं पिबन्वत्स इत्युच्यते । तादृशी सत्यागात् । आगतवती । आगताया अस्या उषसः कृष्णा कृष्णवर्णा रात्रिः सदनानि स्थानानि स्वकीयान्त्यार्द्धयामलक्षणान्यारैक् । आरेचितवती । कल्पितवती दत्तवतीत्यर्थः । उ इत्येतत्पादपूरणम् । अपि च । एते रात्र्युषसौ समानबन्धू समानेनैकेन सूर्याख्येन बन्धुना सख्या युक्ते । यद्वा । सूर्येण सह संबद्धे । यथोषा उदेष्यता सूर्येण संबद्धा एवं रात्रिरप्यस्तं यता सूर्येण संबद्धा । अमृते । मरणरहिते कालात्मकतया नित्यत्वात् । अनूची । अन्वञ्चन्त्यौ । प्रथमं रात्रिः पश्चादुषा इत्यनेन क्रमेण गच्छन्त्यौ । यद्वा सूर्यगत्यनुसारेण गच्छन्त्यौ । एवंभूते वर्णं सर्वेषां प्राणिनां रूपमामिनाने । जरयन्त्यौ । यद्वा स्वकीयं रूपं हिंसन्त्यौ । उषसा नैशं तमो निवर्त्यते प्रकाशात्मकमुषसो रूपं रात्र्या । एवंविधे सत्यौ द्यावा द्योतमाने चरतः । प्रतिदिवसमावर्तेते । यद्वा द्यावा

२. जिचें वासरूं देदीप्यमान आहे, अशी सुंदर श्वेतवर्णाची [ उषा ] ही आली पहा; हिचीं स्थानें कृष्ण वर्णाची [ रात्री ] मोकळीं करीत आहे पहा. ज्यांचें नातें परस्परांशीं समान आहे, ज्या अमर होत, ज्या परस्पर एकामागून एक गमन करीत असतात, अशा ह्या दिव्य रात्री आणि उषा विश्वाचें रूप बदलीत बदलीत भ्रमण करीत असतात.

2. Followed by her brilliant calf and shining with her brilliant colour, the fair one has come. And the dark one has emptied the abodes for her. The two immortal [and] heavenly [ goddesses ], similarly related each to the other, and each following the other, make their revolutions, changing universal colour [ as they go ].

---

'सवितुः सवः' असे व ह्या जवळ जवळ शब्द दुसऱ्या पुष्कळ ठिकाणीं आले आहेत, आणि त्या ठिकाणीं सूर्यकर्तृक प्रेरणा अथवा सूर्य उगवल्यानंतर जी सर्वांस हुषारी वाटते ती असा अर्थ कितीएक जण करितात ( ऋ. १. १६४. २६; ७. ३८. ४; ८. १०२. ६ इ० पहा). परंतु प्रस्तुत स्थळीं तो अर्थ संभवत नाहीं. कदाचित् प्रथम पादाचें तात्पर्य असें असेल कीं सूर्य उत्पन्न व्हावा म्हणून ( सवितुः सवाय ) रात्र उत्पन्न झाली आहे (प्रसूता). त्या सूर्यास उगवतां यावें म्हणून रात्र निघून जाऊन उषेसाठीं जागा मोकळी करीत आहे. उषा प्रथम उगवल्यानंतर सूर्य उगवतो म्हणून सूर्य उगवावा या उद्देशानें उषेसाठीं रात्र जागा मोकळी करीत आहे. अथवा 'प्रसूता सवितुः सवाय' हें उषेकडेस लावावें आणि 'ज्यापेक्षां उषा सवित्यास उत्पन्न करण्यासाठीं जन्मली आहे त्यापेक्षां' असा अर्थ चांगला संभवतो. ऋ. ७. ७८. ३ यांत 'एता उषसः अजीजनन् सूर्यम्,'=' ह्या उषा सूर्याला जन्म देत्या झाल्या' असें आहे तें पहा.

---

२. ऋषि पहांटेला पूर्वेकडेस पाहून म्हणतो, 'ही पहा उषा आपल्या तेजःपुञ्ज सूर्यरूपी वासराला घेऊन येत आहे, आणि उषा येत आहे असें पाहून ही पहा रात्र कशी सर्व दिशाप्रदेश सोडून जात आहे. ज्या दोघींचाहि बंधु ( सूर्य ) एकच आहे, आणि ज्या अमर होत, ज्या नित्य एकामागून एक जात अस-

समानो अध्वा स्वस्रोरनन्तस्तमन्यान्या चरतो देवशिष्टे ।
न मेथेते न तस्थतुः सुमेके नक्तोषासा समनसा विरूपे ॥ ३ ॥

समानः । अध्वा । स्वस्रोः । अनन्तः । तम् । अन्याऽअन्या । चरतः । देवशिष्टे इति देवऽशिष्टे ।
न । मेथेते इति । न । तस्थतुः । सुमेके इति सुऽमेके । नक्तोषसा । सऽमनसा । विरूपे इति विऽरूपे ॥ ३ ॥

---

नभसोन्तरिक्षमार्गेण चरतः । प्रतिदिवसं गच्छतः । अत्र निरुक्तम् । रुशद्वत्सा सूर्यवत्सा रुशदिति वर्णनाम रोचतेर्ज्वलतिकर्मणः । सूर्यमस्या वत्समाह साहचर्याद्रसहरणाद्वा । रुशती श्वेत्यागात् । श्वेत्या श्वेततेररिचत्कृष्णा सदनान्यस्याः कृष्णवर्णा रात्रिः कृष्णं कृष्यतेर्निकृष्टो वर्णः । अथैने संस्तौति समानबन्धू समानबन्धने अमृते अमरणधर्माणावनूची अनूच्यावितरेतरमभिप्रेत्य द्यावावर्ण चरतस्ते एव द्यावौ द्योतनादपि वा द्यावा चरतस्तया सह चरत इति स्यादामिनाने आमिन्वाने अन्योन्यस्याध्यात्मं कुर्वाणे । नि० २. २० । इति ॥

---

## भाषायाम्.

३. स्वस्रोः (=स्वसृभूतयोः=स्वसराविव परस्परं संबद्धयोर्नक्तोषसोः) अध्वा (=पन्थाः=आकाशप्रदेशेषु गमनमार्गः समानः=एक एव=साधारणोस्ति) [ अपि च ] अनन्तः (=अन्तरहितो) [ भवति ] । [ तम् अध्वानं] देवशिष्टे (=देवैः वरुणेन्द्रादिभिराज्ञापिते) अन्या अन्या चरतः (=प्रथममन्या पश्चादन्येति क्रमेण गच्छतः ) । सुमेके (=शोभनकान्ते ) विरूपे ( =कृष्णशुक्लवर्णयोर्भेदेन भिन्नस्वरूपे एतादृश्यौ सत्यावपि ) समनसा (=समानमनस्के ) नक्तोषसा (=रात्र्युषसौ ) न मेथेते (=परस्परं न हिंस्तः ) तस्थतुः (=मार्गे न तिष्ठतः) ॥

---

तात अशा ह्या उषा आणि रात्र विश्वाचा रंग बदलीत बदलीत प्रतिदिवस भ्रमण करीत असतात.'

'स्थानें मोकळीं करीत आहे'='अरैक् सदनानि.' म्ह० रात्र निघून जात आहे आणि उषेसाठीं जागा करीत आहे.

'परस्परांशीं समान आहे' म्ह० रात्रीची बहीण उषा आणि उषेची बहीण रात्र.

रात्र आणि उषा ह्यांस बहिणी असें वेदांत म्हटलेलें आहे. पुढचाच मंत्र पहा.

'रूप बदलीत बदलीत'='वर्णमामिनाने.' म्ह०उषा (=प्रभात) आली म्हणजे सर्व जगतास प्रकाशमान करिते आणि

३. [या] दोघी बहिणींचा मार्ग एकच [असून] [तो] अनंत [होय]. त्या देवांच्या आज्ञेस अनुसरून तो [मार्ग] एकामागून एक क्रमानें क्रमण करितात. त्या एकमेकीस प्रतिबंध करीत नाहींत आणि उभ्याहि राहत नाहींत. [पण] रात्र आणि उषा भिन्नरूपाच्या असतांहि एका मनानें चालणाऱ्या होत.

3. Common [is] the path of the two sisters, [and is] endless. Commanded by the gods they travel it one after the other. Night and Dawn of lovely shape, of one mind, [though] of different colours, neither oppose each [other] nor stop [in their way].

---

रात्र आली म्हणजे सर्व पदार्थांस आपल्या सारिखें काळें करून टाकिते.

'दिव्य रात्री आणि उषा'='द्यावा.' येथें 'द्यावा' ह्याचा अर्थ 'दिव्य रात्री आणि उषा' असा न करितां रात्र आणि दिवस असा करावा असा ग्रासमनाचा अभिप्राय आहे, पण त्याला प्रयोगान्तराचा आधार नाहीं असें आम्हांस वाटतें.

वृत्तानुरोधेंकरून पहिला चरण 'रुशद्वत्सा रुशती श्वेती आगात्' असा म्हटला पाहिजे.

---

३. 'बहिणीप्रमाणें एकमेकीला न सोडणाऱ्या अशा ज्या रात्र आणि उषा त्या एकच मार्गानें आकाशांत गमन करितात, आणि तो मार्ग असंख्य योजनेंपर्यंत पसरला आहे. त्या मार्गानें त्या दोघी बहिणी, अगोदर रात्र आणि मग उषा या क्रमानें, नित्य जात असतात. तो मार्ग सोडून दुसऱ्या मार्गानें जाऊं म्हणतील तर त्यांस तसें करण्याची मोकळीक नाहीं, एकदा देवांनीं जो मार्ग घालून दिला आहे त्याच मार्गानें जात असतात. त्या जरी नित्य एकच मार्गानें क्रमण करितात तरी त्या एकमेकीस भेटून अडथळा करीत नाहींत आणि श्रमानें थकून थांबतहि नाहींत; कारण कीं त्यांचें रूप जरी भिन्न आहे तथापि त्यांचें मन एकच आहे, म्हणजे त्या एकमेकीला प्रतिबन्ध करीत नाहींत.' म्हणजे जरी दोघी एकामागून एक जात असतात तरी दोघींचा वेग एकसारिखा असल्यामुळें एकाच मार्गानें जात असल्या तरी त्या रस्त्यामध्यें भेटत नाहींत आणि मार्गांत थांबतहि नाहींत.

'दोघी बहिणींचा,' रात्र आणि उषा यांचा.—'अनंत' म्ह० दररोज चालतात तरी संपतच नाहीं असा.

'भिन्न रूपाच्या'='विरूपे.' म्ह० रात्र काळी व उषा गोरी.

**भास्वती नेत्री सूनृतानामचेति चित्रा वि दुरो न आवः ।**
**प्रार्प्या जगद्व्यु नो रायो अख्यदुषा अजीगर्भुवनानि विश्वा ॥४॥**

भास्वती । नेत्री । सूनृतानाम् । अचेति । चित्रा । वि । दुरः । नः । आवरित्यावः ।
प्रऽअर्प्य । जगत् । वि । ऊम् इति । नः । रायः । अख्यत् । उषाः । अजीगः । भुवनानि । विश्वा ॥ ४ ॥

## भाषायाम्.

४. भास्वती ( =प्रभावती ) सूनृतानां नेत्री ( =मधुरवाचां प्रेरयित्री=मधुरोच्चारयुक्तानां सूक्तादीनां शब्दानामुत्पादयित्री ) [ उषाः ] अचेति ( =अस्माभिरज्ञायि=पश्य पश्य स्पष्टं दृश्यते खलु )। चित्रा (=चायनीया=मनोहरा सा ) नो दुरः (=अस्माकं द्वाराणि=अस्मद्गृहाणां द्वाराणि ) वि आवः ( =अपावृणोति=वयं यथा जागृमः सा तथागत्य अस्मान् प्रबोधयितुमिव अस्मद्गृहाणां द्वाराण्युद्घाटयति ) । उ ( =उत=अपि च ) जगत् ( =भुवनं सर्वं ) प्रार्प्य ( =प्रकाशं गमयित्वा=प्रेर्य ) रायः ( =संपदो ) नः ( =अस्मदर्थं ) वि अख्यत् ( =विविच्य कथयति= ' विशिष्टप्रकाशेन युक्ता अकरोत्') उषाः विश्वा भुवनानि ( =विश्वानि भुवनानि=सर्वाणि भूतजातानि तमसा तिरोहितत्वेन निद्रितकल्पानि) अजीगः (=जागरयति=प्रबोधयति)॥
" स्वकीयेन प्रकाशेन तमो निःसार्य पुनः " प्रबुद्धानीव करोतीत्यर्थः ॥

'एकमेकांस प्रतिबंध करीत नाहींत व उभ्याहि राहत नाहींत.' म्हणजे मार्ग अनंत असल्यामुळें व द्या एकामागून एक एकसारिख्या चालत असल्यामुळें व उभ्या राहत नसल्यामुळें त्यांची गांठ पडत नाहीं.

' सुंदर '= ' सुमेके.' ' सुमेक ' हा शब्द वेदांत पुष्कळ ठिकाणीं आहे परंतु त्याच्या अर्थाविषयीं वाद आहे. परंतु ' सुमेक ' हा शब्द ज्या ज्या मंत्रांत आला आहे ते सर्व वाचून पहातां आम्हीं येथें केलेला अर्थ सायणांनीं बहुतेक ठिकाणीं दिला आहे आणि तो चांगला संभवतो असें आम्हांला वाटतें.

वृत्तसुखार्थ पहिला पाद 'समानो अध्वा स्वसरोरनन्तः' असा म्हटला पाहिजे.

४. वाचेला स्फुरण आणणारी सुंदर [उषा] [ही] दिसत आहे [पहा]. मनोहर उषेनें आमचे दरवाजे उघडले आहेत [पहा]. सर्व जंगम वस्तुमात्रातें प्रेरित करून उषा आम्हांस संपत्ति घेऊन येत आहे [पहा]. उषेनें सकल प्राण्यांस जागृत केलें आहे [पहा].

4. The resplendent inspirer of sweet voices is visible. The beautiful one has thrown our doors open. Ushas, setting the moving creation in motion, is shining upon riches for us. Ushas has awakened all creatures.

४. भावार्थः– 'ही पहा उषा उगवून पक्ष्यादिक प्राण्यांकडून मधुर गाणीं आणि भाविक जनांकडून मनोरम स्तोत्रें गाववीत आहे. अंधकारानें सर्व आकाश जणुं झांकून जाऊन आम्हांस अंधारकोटडींत घातल्याप्रमाणें निद्रेनें आणि अंधकारानें आमची अवस्था केली होती. आतां उषा येऊन आमचे दरवाजे जणुं उघडून आम्हांस जागें करीत आहे. सर्व भुवन अंधारांतून मोकळें करून उषा प्रकाशून आम्हांला संपत्ति घेऊन येत आहे. उषा सर्व जगताला जागृत करीत आहे पहा.'

'वाचेला स्फुरण आणणारी'='सूनृतानां नेत्री.' म्हणजे पशुपक्ष्यांला आणि मनुष्यांला उठवून त्यांजकडून मंजुळ ध्वनि करविणारी. 'सूनृता' शब्दाचा अर्थ आम्हीं सायणांस अनुसरून केला आहे, आणि तो खरा आहे असें आम्हांस वाटतें. सू. ४८ मं. २ आणि त्याजवरील टीप पहा. उषा उगवतांच लोक देवस्तोत्रें गाऊं लागतात त्यावरून ती आपल्याबरोबर स्तोत्रें घेऊनच जणुं फिरते कीं काय अशी. 'नेत्री सूनृतानाम्' याचा अर्थ 'स्तोत्रांला वाट दाखविणारी' असा आहे. स्तोत्रें जिच्या मागून येतात अशी.

'आमचे दरवाजे उघडिले आहेत पहा'=' नः दुरः वि आवः.' कवि अशी कल्पना करितो कीं पाहांटेपर्यंत आपण निजून राहिलों आहों आणि प्रभातकाळीं उषा येऊन आम्हांस जागृत करण्यासाठीं आमच्या घराचीं दारें जणुं उघडीत आहे. उषा उगवून आमच्या दरवाज्याशीं येते आणि आम्हीं बिछान्यावरून उठावें म्हणून आमचे दरवाजे उघडिते असें येथें म्हटलें आहे तसेंच सवित्याविषयीं (=सूर्याविषयीं) ऋ. ५. ४५. १ यांत म्हटलें आहे. 'सविता उगवला आहे आणि तो देदीप्यमान देव मनुष्यांचे दरवाजे उघडीत आहे' ('उत् स्वः गात् वि दुरो मानुषीर्देव आवः'). प्रस्तुत स्थळीं आकाशाचे दरवाजे आम्हांसाठीं उघडीत आहे असा अर्थ कदाचित् होईल पण 'दिवः' हें पद स-

**जिह्मश्ये३ चरितवे मघोन्याभोगय इष्टये राय उ त्वम् ।**
**दभ्रं पश्यद्भ्य उर्विया विचक्ष उषा अजीगर्भुवनानि विश्वा ॥५॥१**

जिह्मऽश्ये । चरितवे । मघोनी । आऽभोगये । इष्टये । राये । ऊम् इति । त्वम् ।
दभ्रम् । पश्यत्ऽभ्यः । उर्विया । विऽचक्षे । उषाः । अजीगरिति । भुवनानि । विश्वा ॥ ५ ॥ १ ॥

---

## भाषायाम्.

५. जिह्मश्ये चरितवे (=जिह्मं यथा तथा शयानाय जनाय चरितुं=शयानो जनो यथा प्रबुध्य चरति तथा) [त्वम्] आभोगये (=एकं पुरुषम् आभोग्याय वस्तुने=एकः पुरुषो यथा भोग्यवस्तु लब्धुं प्रयतेत तथा) इष्टये (=इष्टलाभसिद्ध्यर्थम्=अन्यः पुरुषो यथा इष्टलाभार्थं प्रयतेत तथा) उ (=अपि च) त्वं राये (=एकं धनाय=एकः पुरुषो यथा धनलाभाय प्रयतेत तथा) दभ्रं पश्यद्भ्यः उर्विया विचक्षे (=अल्पं पश्यद्भ्यो मनुष्येभ्यो दूरं दर्शनाय=अल्पदृष्टयः पुरुषा यथा दूरं पश्यन्ति तथा) [इति प्रकारेण] मघोनी (=धनवती) उषा विश्वा भुवनानि (=विश्वानि भुवनानि=सकलानि भूतजातानि) अजीगः (=अजागरयत्=जागृतानि कृतवती पश्य पश्य)॥

जिह्मश्ये जिह्मं वक्रं शयानाय पुरुषायेति । ......त्वम् । अयमेकशब्दपर्यायः सर्वनामशब्द इति च सायणः ॥

---

हज अध्याहार्य नसतां अध्याहृत घ्यावें लागतें. उषा आकाशाचे दरवाजे उघडिते असें मात्र सू. ४८ मं. १५ यांत म्हटलें आहे तें पहा.

'संपत्ति घेऊन येत आहे'=' रायः वि अख्यत्.' अक्षरशः अर्थ 'संपत्ति दाखवीत आहे;' म्हणजे उगवून प्रकाश पाडीत आहे आणि जेथें संपत्ति आहे तेथें आमची दृष्टि पोंहचवीत आहे.

'जागृत केलें आहे'=' अजीगः.' उषा उगवतांच सकळ भुवनास जागें करिते असें ऋग्वेदांत दुसऱ्या ठिकाणींहि सांगितलें आहे. आणि सायणांनीं जरी 'अजीगः' या क्रियापदाचा अर्थ येथें 'ओकून टाकिते' असा केला आहे तरी ऋ. ७. ६७. १ यांतील 'यो वां दूतो न धिष्ण्यो अजीगः' या शब्दांवरील भाष्यांत त्यांनीं 'अजीगः' क्रियेचा अर्थ जागें करणें हा यथायोग्य केला आहे तो पहा.

५. [कोणी] निजून राहिलेल्यानें उठून चालतें व्हावें म्हणून, [कोणी] उपभोगाचा, आणि कोणी इष्टलाभाची सिद्धि होण्याचा, [आणि] कोणी धनाचा प्रयत्न करावा म्हणून [आणि] ज्यांच्या थोडें दृष्टीस पडत आहे त्यांला दूर दिसावें म्हणून, धनवती उषेनें सकल प्राण्यांस जागृत केलें आहे पहा.

5. That the prostrate sleeper may walk, that one may seek enjoyment, another the fulfilment of his desire, that a third may seek wealth and that those who see little may see afar off, rich Ushas has awakened all creatures.

हा मंत्र खालीं लिहिल्याप्रमाणें म्हटला तर आधुनिक वृत्ताला जमतो.

भासुअती नेतरी सूनृतानाम्
अचेति चित्रा वि दुरो न आवः।
प्रार्प्या जगद्वि उ नो रायो अख्यद्
उषा अजीगर्भुवनानि विश्वा ॥

५. मंत्राचा भावार्थ असा आहे कीं, 'जे कोणी निजून राहिले असतील त्यांनीं उठून आपापल्या कामीं लागावें म्हणून, आणि जे सुखादिक इष्ट वस्तूंचा उपभोग मिळविण्याविषयीं उद्योग करणारे असतील त्यांनीं तो मिळविण्याच्या कामीं लागावें म्हणून, आणि द्रव्य मिळविण्याविषयीं ज्यांचा प्रयत्न असेल त्यांनीं तें मिळवावें म्हणून, आणि रात्रीच्या अंधकारानें सकल आकाश आणि पृथिवी भरली असल्यामुळें उषा येण्यापूर्वीं लोकांस थोडें दिसतें तर त्यांस अधिक दिसावें म्हणून,उषा सकळ जनांस जागृत करीत आहे.

'निजून राहिलेल्यानें उठून चालतें व्हावें, म्हणून' =' जिह्मश्ये चरितवे.' अक्षरशः, ' आडवा निजलेल्यास चालण्यासाठीं.' निजून असणारे मनुष्य, पशु, आणि प्राणी विवक्षित आहेत.

'कोणी' =' त्वम्.' ' त्वं ' म्हणजे तूं असा अर्थ नाहीं. ' कोणी एक,' ' एक' असा अर्थ. ' त्वम् '=तूं, या शब्दापासून हा शब्द अगदी वेगळा आहे.

' इष्टलाभाची सिद्धि होण्याचा प्रयत्न करावा म्हणून '=' इष्टये.' म्हणजे 'इष्टम् एषितुं' असा अर्थ आहे. इष्टये म्हणजे यागासाठीं असा सायणाचार्य अर्थ करितात परंतु इष्टि=याग हा शब्द आद्युदात्त असतो आणि प्रस्तुत वाक्यांतील अंतोदात्त आहे त्याचा अर्थ आम्हीं येथें केल्याप्रमाणें केला तर बरा दिसतो.

' दूर '=' उर्विया.' हा ' उर्विया ' शब्द येथें क्रियाविशेषण अव्यय आहे.

' दिसावें म्हणून'=' विचक्षे.' हें तुमर्थ अव्यय. अक्षरशः अर्थ ' त्यांनीं पहावें म्हणून.'

८. आमच्या मुलाला [व] नातवंडाला [ दुखवूं ] नको, आमच्या चाकरास [दुखवूं] नको. आमच्या गाईंस [ दुखवूं ] नको, आमच्या घोड्यांस दुखवूं नको. हे रुद्रा, तूं क्रुद्ध [ होऊन ] आमच्या वीरांस मारून टाकूं नको. [ कारण कीं ] आम्ही हवि घेऊन तुला सदैव भजत असतों.

8. Do not [hurt] our child nor our grand-child, do not hurt our servant, nor our cows nor our horses. Do not, O Rudra, slay our heroes in anger. [ For ] daily indeed we invoke thee with libations.

---

८. '[ कारण कीं ] आम्ही हवि घेऊन तुला सदैव भजत असतों.' रुद्रानें स्तोत्रकर्त्याच्या मुलांबाळांस व गुरांढोरांस मारूं नये त्याचें हें कारण आहे. वैदिक युगांत देवांची मोठी सेवा म्हटली म्हणजे स्तुति करणें आणि विशेषेंकरून हवि अर्पण करणें ही होती.

उप॑ ते॒ स्तोमा॑न्पशु॒पा इ॒वाक॑रं॒ रास्वा॑ पितर्मरुतां सु॒म्नम॒स्मे ।
भ॒द्रा हि ते॑ सुम॒तिर्मृ॑ळ॒यत्त॒माथा॑ व॒यमव॒ इत्ते॑ वृणीमहे ॥ ९ ॥
उप॑ । ते॒ । स्तोमा॑न् । प॒शु॒पाःऽइ॑व । आ । अ॒क॒र॒म् । रास्व॑ । पि॒त॒रिति॑ ।
म॒रु॒ता॒म् । सु॒म्नम् । अ॒स्मे इति॑ ।
भ॒द्रा । हि । ते॒ । सु॒ऽम॒तिः । मृ॒ळ॒यत्ऽत॑मा । अथ॑ । व॒यम् । अवः॑ ।
इत् । ते॒ । वृ॒णी॒म॒हे॒ ॥ ९ ॥
आ॒रे ते॑ गो॒घ्नमु॒त पू॑रुष॒घ्नं क्षय॑द्वीर सु॒म्नम॒स्मे ते॑ अस्तु ।
मृ॒ळा च॑ नो॒ अधि॑ च ब्रूहि दे॒वाधा॑ च नः॒ शर्म॑ यच्छ द्वि॒बर्हाः॑ ॥
॥ १० ॥
आ॒रे । ते॒ । गो॒ऽघ्नम् । उ॒त । पु॒रु॒ष॒ऽघ्नम् । क्षय॑त्ऽवीर । सु॒म्नम् । अ॒-
स्मे इति॑ । ते॒ । अ॒स्तु॒ ।
मृ॒ळ । च॒ । नः॒ । अधि॑ । च॒ । ब्रू॒हि॒ । दे॒व॒ । अध॑ । च॒ । नः॒ । शर्म॑ ।
य॒च्छ॒ । द्वि॒ऽबर्हाः॑ ॥ १० ॥

---

## भाषायाम्.

९. [हे रुद्र], पशुपा इव ते स्तोमान् उप आ अकरं (=यथा गोपः सायंकाले गाः संहिताः कृत्वा गोष्ठे नयति तथा तुभ्यमहमिमाः स्तुतीः संधाय प्रार्पयामि) । [अतः कारणात्] हे मरुतां पितः (=मरुतां पितृभूत रुद्र), अस्मे (=अस्मभ्यं) सुम्नं रास्व (=सुखं देहि) । भद्रा ते सुमतिः (=तव कल्याणकारिणी शोभना मतिः= अनुकूला बुद्धिः) मृळयत्तमा हि (=अतिशयेन सुखयितृतमा खलु) । अथ (=अत एव) ते (=तव) अव इत् (=रक्षणं=प्रसादमेव) वयं वृणीमहे (=संभजामहे=इच्छामः)॥

१०. हे क्षयद्वीर (=ऐश्वर्योपेतवीराणां मरुतां पितः), गोघ्नं (=गवां मारकम्) उत पूरुषघ्नं (=मनुष्याणां मारकं च) ते (=तव) [शस्त्रम्] आरे [अस्तु] (=विप्रकृष्टदेशे भवतु=अस्मान् मा प्राप्नोतु) [अपि तु] सुम्नम् अस्मे ते अस्तु (=तवानुग्रह एवास्मभ्यं भवतु) । हे देव [रुद्र], मृळ च नः अधि च ब्रूहि (=नः मृळ च अधि ब्रूहि च=अस्मभ्यं प्रसन्नो भव अस्माकं पक्षपातेन देवादिषु ब्रूहि च) । अध च (=अपि च) द्विबर्हाः (=द्वयोरपि लोकयोः=द्यावापृथिव्योः स्वबलेन ख्यातस्त्वं) नः शर्म यच्छ (=अस्मभ्यम् आश्रयं देहि) ॥

द्विबर्हाः इत्यत्र ऋ. १. ७१. ६ इति मन्त्रे यदुक्तं तद्दृश्यताम् ॥

९. [ हे रुद्रा ], गुराखी [ जशीं गुरें गोठ्याजवळ गोळा करून आणितो ] तशीं हीं स्तोत्रें तुजकडे आणून मी अर्पण करीत आहें. तर हे मरुतांच्या पित्या, आमचें तूं कल्याण कर. कारण कीं तुझी अनुकूळ कृपा परम सुख देणारी होय. म्हणून तर आम्हांवर तुझी प्रसन्नबुद्धिच व्हावी अशी आम्ही प्रार्थना करीत आहों.

9. I have brought together and offered to thee my prayers as a cowherd [ brings home his cows ]. Grant us, therefore, happiness, thou father of the Maruts. For thy benevolent favour confers the greatest blessing. It is therefore we pray for thy friendship only.

१०. गाईंस मारून टाकणारें आणि मनुष्यांस मारून टाकणारें तुझें [ शस्त्र ] दूर राहो. हे शूरांच्या पित्या [ रुद्रा ], तुझी कृपा आम्हांवर असो. हे देवा [ रुद्रा ], तूं आम्हांवर प्रसन्न राहा आणि आमचा पक्ष घेऊन बोलत जा. आणि उभयलोकीं प्रसिद्ध [ असा जो ] तूं तो आम्हांस आश्रय दे.

10. May thy weapon that kills cows, and that kills men, be far away. Father of heroes, may thy blessing be upon us. Favour us as well as take our part, O god [ Rudra ]. And give thou, renowned in both worlds, shelter unto us.

---

९. 'गुराखी जशीं [ गुरें गोठ्याजवळ गोळा करून आणितो ] तशीं,' 'पशुपा इव.' ही उपमा चमत्कारिक दिसते. सायणाचार्य किंचित् निराळा अर्थ करितात, तो असा:— "गुराख्याच्या स्वाधीन प्रातःकाळीं लोकांनीं गुरें केलेलीं तो संध्याकाळीं जशीं मालकांजवळ नेऊन पोंहचवितो तशीं" इ०. तथापि उपमा जी थोडी विलक्षण दिसते ती दिसतेच.

१०. 'गाईंस मारून टाकणारें' इ०. या मंत्रावरून दिसून येतें कीं जशी 'सितळा देवी' देवी आणिते आणि तिला प्रसन्न केली म्हणजे देवींपासून मुलें मरत नाहींत, आणि मरी माता पटकी आणिते आणि पटकीपासून घात न व्हावा म्हणून मरीला प्रसन्न करावें, तसा रुद्र गाईंस आणि मनुष्यांस मारून

**अवोचाम नमो अस्मा अवस्यवः शृणोतु नो हवं रुद्रो मरुत्वान् ।**
**तन्नो मित्रो वरुणो मामहन्तामदितिः सिन्धुः पृथिवी उत द्यौः ॥**
॥ ११ ॥ ६ ॥

अवोचाम । नमः । अस्मै । अवस्यवः । शृणोतु । नः । हवम् । रुद्रः । मरुत्वान् ।
तत् । नः । मित्रः । वरुणः । ममहन्ताम् । अदितिः । सिन्धुः । पृथिवी । उत । द्यौः ॥ ११ ॥ ६ ॥

## भाषायाम्.

११. [ अनेन प्रकारेण ] अवस्यवः ( =रक्षणमिच्छन्तो ) [ वयम् ] अस्मै ( =रुद्राय ) नमः अवोचाम ( =स्तोत्रमवादिष्म ) । [ अतः कारणात् ] मरुत्वान् रुद्रः ( =मरुद्युक्तो रुद्रो ) नो हवं शृणोतु ( =अस्माकमाह्वानम् अस्माभिः कृतमिदमाह्वानं शृणोतु ) । तत् ( =एतच्च यदस्मिन् सूक्तेऽस्माभिः प्रार्थितं तत् ) मित्रः, वरुणः, अदितिः ( =एतन्नाम्नी आदित्यानां माता ) सिन्धुः ( =समुद्राभिमानिनी देवता ) पृथिवी उत द्यौः ( =पृथिवी द्युरूपो देवश्च ) [ इत्येते ] नः मामहन्ताम् ( =अस्मभ्यं पूजयन्तु=ददतु ) ॥

---

टाकितो आणि त्याणें तसें न करावें म्हणून त्याला प्रसन्न केलें पाहिजे असें वैदिक युगांतील लोक मानीत होते. त्याणें गाईंस व मनुष्यांस मारूं नये म्हणून ही स्तुति आहे.

'आमचा पक्ष घेऊन बोलत जा'. म्ह० आमचा कैवार घे. देव आम्हांवर रागावले तर त्यांला आम्हांविषयीं चार गोष्टी अनुकूळ सांगून त्यांचा राग शांत कर.

११. [ या प्रकारेंकरून ] [ याच्या ] कृपेची इच्छा करून आम्हीं हें स्तोत्र याच्या साठीं गाइलें आहे; तर मरुतांबरोबर फिरणारा जो रुद्र तो आमची हाक ऐको, आणि हें दान मित्र, वरुण, अदिति, समुद्र, पृथिवी आणि द्यू आम्हांस देओत.

11. Desirous of his favour we have sung this hymn unto him: may Rudra, accompanied by the Maruts, hear our call. And may Mitra, Varuṇa, Aditi, the Sea, Earth and Heaven confirm this unto us.

---

११ 'मरुतांबरोबर फिरणारा रुद्र'= 'मरुत्वान् रुद्रः.' म्हणजे मरुतांसहित रुद्र आमची हाक ऐको=रुद्र आणि त्याचे पुत्र मरुत् आम्हांवर प्रसन्न होओत.

## सूक्तम् ११५.

आङ्गिरसः कुत्स ऋषिः। सूर्यो देवता। त्रिष्टुप् छन्दः॥

**चित्रं देवानामुदगादनीकं चक्षुर्मित्रस्य वरुणस्याग्नेः।**
**आप्रा द्यावापृथिवी अन्तरिक्षं सूर्य आत्मा जगतस्तस्थुषश्च॥ १॥**

चित्रम्। देवानाम्। उत्। अगात्। अनीकम्। चक्षुः। मित्रस्य। वरुणस्य। अग्नेः।
आ। अप्राः। द्यावापृथिवी इति। अन्तरिक्षम्। सूर्यः। आत्मा। जगतः। तस्थुषः। च॥ १॥

**सूर्यो देवीमुषसं रोचमानां मर्यो न योषामभ्येति पश्चात्।**
**यत्रा नरो देवयन्तो युगानि वितन्वते प्रति भद्राय भद्रम्॥ २॥**

सूर्यः। देवीम्। उषसम्। रोचमानाम्। मर्यः। न। योषाम्। अभि। एति। पश्चात्।
यत्र। नरः। देवऽयन्तः। युगानि। विऽतन्वते। प्रति। भद्राय। भद्रम्॥ २॥

---

### भाषायाम्.

१. देवानां चित्रम् अनीकम् (=इन्द्रादिदेवानां मुखभूतः) मित्रस्य वरुणस्य अग्नेश्च चक्षुः (=नयनभूतः) [सूर्यः] उद् अगात् (=उदितोस्ति पश्य)। जगतः (=जङ्गमस्य वस्तुजातस्य) तस्थुषश्च (=स्थावरस्य च वस्तुजातस्य) आत्मा (=जीवात्मा) [एतादृशः] सूर्यः द्यावापृथिवी अन्तरिक्षं [च] (=द्युलोकभूलोकौ अन्तरिक्षं च) आ अप्राः (=आ समन्तात् स्वतेजसा पूरितवान् अस्ति पश्य पश्य)॥

२. मर्यो न योषां (=कश्चित् तरुणः पुरुषः कांचित् तरुणीं स्त्रियमभिलक्ष्य यथा तामनुगच्छति तद्वत्) रोचमानां देवीम् उषसं (=कान्तिमतीं द्योतमानाम् उषसं) सूर्यः पश्चात् अभि एति (=अभिलक्ष्य अनुगच्छति=अनूदेति)। यत्र (=यस्मिन्ननूदयसमये) देवयन्तो नरः (=देवान् आत्मन इच्छन्तो=देवभजका मनुष्या) युगानि वितन्वते (=सीरैर्योज्यानि काष्ठखण्डानि विस्तारयन्ति=योजयन्ति=पूर्वदिवसवत् पुनरपि स्वकीयानि देवयजनादीनि कर्माणि प्रारभन्ते) [तथा कृत्वा च] भद्राय भद्रं प्रति [कुर्वन्ति] (=कल्याणाय सूर्याय भद्रं सुखकरं कर्मानुतिष्ठन्ति)॥

## सूक्त ११५.

ऋषि– कुत्स. देवता–सूर्य. वृत्त– त्रिष्टुभ्.

१. देवांचें सुंदर मुख, [आणि] मित्राचें, वरुणाचें, आणि अग्नीचें चक्षु, [आणि] जंगमाचा व स्थावरांचा जीव असा जो सूर्य तो हा पहा उगवला आहे [आणि] द्युलोक, पृथ्वी [आणि] अंतरिक्ष यांस [तेजानें] भरून टाकीत आहे.

२. तरुण स्त्रीच्या मागून पुरुष [जातो] तसा [हा] सूर्य तेजस्वी उषा देवीच्या मागून चालत आहे; ज्या वेळीं देवभजक लोक [आपलीं] कर्में करितात, कीं जेंणेंकरून सुखकारक [सूर्या]ला सुख होईल.

## HYMN 115.

To *Sûrya* (or Sun-God). By *Kutsa* (author of the foregoing hymn). Metre—*Trishtubh.*

1. The beautiful face of the gods has risen, the eye of Mitra, of Varuṇa, of Agni: Sûrya, the life of the moving and of the non-moving world, has filled heaven, earth and the atmosphere with his splendor.

2. Sûrya follows the brilliant goddess Ushas as a youth [follows] a young woman; when pious men perform their worship again, intending good to the good [Sûrya].

---

१. हेंहि सूक्त कुत्स ऋषीचेंच आहे. याची देवता सूर्य होय. 'सौरसूक्त' म्हणून जें म्हणत असतात त्यांत याचा पाठ आहे. यावरून अर्थशून्य ब्राह्मणांसहि या सूक्ताचा उत्तम परिचय आहे. शिवाय 'ग्रहयज्ञ,' 'विवाह,' 'तुला,' 'दुष्टजननशांति' आणि 'व्यतीपात' म्हणून जीं कर्में करितात त्यांत या सूक्ताचा पाठ म्हणत असतात.

'देवांचें मुख'=' देवानाम् अनीकम्.' ११३ व्या सूक्ताच्या १९ व्या ऋचेंत जसें उषेला 'अदितीचें मुख' असें म्हटलें आहे तसें सूर्याला येथें देवांचें मुख असें म्हटलें आहे. देदीप्यमान जे देव त्यांचें मुख सूर्य होय हें योग्यच आहे.

'मित्राचें...चक्षु.' सूर्यास मित्र, वरुण, आणि अग्नि यांचें चक्षु असें दुसरे पुष्कळ ठिकाणीं म्हटलें आहे. ऋ. ७. ६१. १ (उद्वां चक्षुर्वरुणा सुप्रतीकं),

भद्रा अश्वा॑ ह॒रित॑ः सूर्य॑स्य चि॒त्रा एत॑ग्वा अनु॒माद्या॑सः ।
न॒म॒स्यन्तो॑ दि॒व आ पृ॒ष्ठम॑स्थुः परि॒ द्यावा॑पृथि॒वी य॑न्ति स॒द्यः ॥३

भ॒द्राः । अश्वा॑ः । ह॒रित॑ः । सूर्य॑स्य । चि॒त्राः । एत॑ऽग्वाः । अ॒नु॒ऽमाद्या॑सः ।
न॒म॒स्यन्त॑ः । दि॒वः । आ । पृ॒ष्ठम् । अ॒स्थुः । परि॑ । द्यावा॑पृथि॒वी इति॑ । य॒न्ति॒ । स॒द्यः ॥ ३ ॥

## भाषायाम्.

३. भद्राः (=कल्याणा) हरितः (=हरिद्वर्णाश्) चित्राः (=रमणीया) एतग्वाः (=विचित्रवर्णा) अनुमाद्यासः (=अनुमाद्याः=" अनुक्रमेण सर्वैः स्तुत्याः ") सूर्यस्याश्वाः नमस्यन्तः (=सूर्यं स्तुवन्तः सन्तो) दिवः पृष्ठम् आ तस्थुः (=द्युलोकस्योपरिभागमारोहन्ति) [अपि च] सद्यः (=एकेनाह्ना) द्यावापृथिवी (=द्यावापृथिव्यौ) परि यन्ति (=परितो गच्छन्ति) ॥

७. ६३. १ (चक्षुर्मित्रस्य वरुणस्य देवः) वगैरे पहा. सूर्यास देवांचें मुख म्हणणें ही उत्तम कल्पना आहे यांत संशय नाहीं. आणि सकल जगातें पहाणारे जे मित्र, वरुण, आणि अग्नि हे मोठे देव, त्यांस सूर्याशिवाय दुसरा डोळा कोणता शोभेल?

अशी कल्पना केली पाहिजे कीं सूर्योदयसमयीं ऋषि उठून सूर्याकडेस पाहून व सूर्यप्रकाशानें जिकडे तिकडे प्रकाश पडलेला पाहून हें सूक्त गात आहे.

२. 'सूर्य...उषा देवीच्या मागून चालत आहे'=' सूर्यः उषसम् अभि एति पश्चात्.' म्हणजे लकलकीत जी उषा ती उगवल्यावर सूर्य उगवत आहे.

या मंत्राचा पूर्वार्ध जसा सोपा आहे तसा उत्तरार्ध सोपा नाहीं. 'युगानि वितन्वते' म्हणजे काय? सायणाचार्य निश्चयानें सांगूं शकत नाहींत, आणि तीन अर्थ वेगवेगळे सुचवितात, त्यांतून आम्हीं एक घेतला आहे. पण 'युगानि' याचा अर्थ कर्में असा होतो याविषयीं प्रमाण पाहिजे.

'युगम्' म्हणजे 'जूं,' 'जुकड,' आणि 'युगानि वितन्वते' म्हणजे जुकडें नांगरास जोडतात असा अर्थ होऊन त्याचा भावार्थ आपलें नित्याचें देवयज-

३. कल्याणकारक, पिंगट, सुंदर, चित्रविचित्र [ आणि ] वाखाणण्यास योग्य असे सूर्याचे घोडे [सूर्याची] स्तुति करीत करीत आकाशाच्या पाठीवर चढत असतात [ आणि ] एका दिवसांत द्युलोक आणि पृथिवी यांच्या सभोंवताली प्रदक्षिणा करितात.

3. Sûrya's blessed tawny horses, beautiful, variegated [ and ] fit to be applauded, ascend the surface of heaven, praising [ Sûrya ], and in a single day go round heaven and earth.

---

नकर्म करितात असा सायणाचार्यांनीं दिलेला आहे तसा होण्यास अडचण दिसत नाहीं. यास्तव आम्हीं तो घेतला आहे.

'भद्राय भद्रम्.' याचाहि अर्थ स्पष्ट समजत नाहीं. परंतु 'सुखकारक जो सूर्य त्याला सुख होई अशा रीतीनें' कर्मे करितात असा भावार्थ दिसतो तो आम्हीं दिला आहे. 'भद्र' शब्द पुढच्या मंत्रांत सूर्याच्या घोड्यांस लाविला आहे.

---

३. 'कल्याणकारक'='भद्राः.' तेजस्वी असाहि अर्थ होऊं शकेल, पण पूर्व ऋचेंत जो अर्थ भद्रशब्दाचा केला आहे तोच येथें करणें युक्त दिसतें.

'एका दिवसांत'='सद्यः.' म्ह० एकाच दिवसांत द्युलोक आणि पृथिवी यांसभोंताली प्रदक्षिणा करितात.

'स्तुति करीत करीत'='नमस्यन्तः.' सायणाचार्य 'आम्हांकडून स्तविले जाऊन' असा कर्मणि अर्थ करितात.

सूर्याचे घोडे म्हणजे त्याच्या रथास जोडलेले जे घोडे ते. पर्यवसानीं सूर्याचे किरण असाच भावार्थ समजावयाचा आहे.

तत्सूर्यस्य देवत्वं तन्महित्वं मध्या कर्तोर्विततं सं जभार ।
यदेदयुक्त हरितः सधस्थादाद्रात्री वासस्तनुते सिमस्मै ॥ ४ ॥

तत् । सूर्यस्य । देवऽत्वम् । तत् । महिऽत्वम् । मध्या । कर्तोः । विऽततम् । सम् । जभार ।
यदा । इत् । अयुक्त । हरितः । सधऽस्थात् । आत् । रात्री । वासः । तनुते । सिमस्मै ॥ ४ ॥

तन्मित्रस्य वरुणस्याभिचक्षे सूर्यो रूपं कृणुते द्योरुपस्थे ।
अनन्तमन्यद्रुशदस्य पाजः कृष्णमन्यद्धरितः सं भरन्ति ॥ ५ ॥

तत् । मित्रस्य । वरुणस्य । अभिऽचक्षे । सूर्यः । रूपम् । कृणुते । द्योः । उपऽस्थे ।
अनन्तम् । अन्यत् । रुशत् । अस्य । पाजः । कृष्णम् । अन्यत् । हरितः । सम् । भरन्ति ॥ ५ ॥

---

## भाषायाम्.

४. सूर्यस्य तद् देवत्वं (=तद्वक्ष्यमाणम् ईश्वरत्वं) [भवति] [अपि च] तत् [तस्य] महित्वं (=महत्त्वं) [भवति] [यत् स] कर्तोर्मध्या (=कर्मणो मध्यात्=अस्माभिर्मर्त्यैः प्रवृत्तस्यासमाप्तस्य कर्मणो मध्यात्) विततं (=विस्तारितं स्वकीयं किरणजालं) सं जभार (=संहृत्यापहरति)। [अपि च] यदा इत् (=...व) [स] हरितः सधस्थात् अयुक्त (="स्वस्थात्" स्थलजाताद्वा हरिद्वर्णान्स्वकीयान् अश्वान् वियुक्तान् करोति) आत् [इत्] (=तदैव) रात्री सिमस्मै (=सर्वस्मै=विश्वस्मै जगते) वासः (=आच्छादनं) तनुते (=विस्तारयति=सकलविश्वस्योपरि पर्याच्छादयितृ तमोरूपं वस्त्रं दधाति) ॥

५. तत् (=अतः कारणात्) सूर्यः मित्रस्य वरुणस्य अभिचक्षे (=मित्रस्य एतन्नामकस्य देवस्य वरुणनामकस्य देवस्य च लोकैर्दर्शनाय=जना मित्रं वरुणं च यथा पश्येयुस्तथा) द्योरुपस्थे (=नभसो मध्ये) रूपं कृणुते (=रूपं करोति=स्वकीयं रूपं प्रकटयति)। [तद्यथा] अस्य (=सूर्यस्य) रुशत् (=रोचमानं=तेजस्वि) अनन्तम् (=अन्तरहितम् अनन्तावकाशपूरकत्वान्निःसीमं) पाजः (=दिवसरूपं स्वरूपं) हरितः (=हरिद्वर्णाः सूर्यस्याश्वाः) [सं भरन्ति=निष्पादयन्ति=स्वसंचारेण प्रकटय-

४. सूर्याचें देवत्व इतक्यावरून दिसून येतें [ आणि] त्याचें माहात्म्य इतक्यावरून दिसून येतें [कीं] आमच्या कामाच्या मधूनच तो आपलें [ किरण]जाल काढून घेतो. रथापासून तो [ आपले ] पिंगट घोडे जेव्हां सोडून घेतो तेव्हांच रात्र एकदम सकळ विश्वावर पडदा टाकिते.

4. That is the divinity [ and ] that is the greatness of Sûrya that he withdraws [his] extended [ light ] from the midst of our work. As soon as he unharnesses his tawny horses from his car, night spreads her veil over all things.

५. तर मित्र [आणि] वरुण ह्यांचें दर्शन [लोकांस] व्हावें म्हणून सूर्य द्युलोकाच्या मध्यभागीं [ आपलें ] रूप प्रगट करितो. [त्याचे] पिंगट घोडे, [त्याचें] एक तेजस्वी अनंत रूप [ दिवसा ] आणि दुसरें काळें रूप [ रात्रीं ] पसरितात.

5. That people may recognise therein Mitra and Varuṇa, Sûrya manifests his form in the centre of heaven: his tawny horses expand [during day] one form of his that is endless [ and ] brilliant, and another that is dark [ during night ].

---

४. पूर्वार्धाचा भावार्थ असा कीं आम्हीं आपापलीं कृषिकर्मादिक अथवा दुसरीं अथवा घरगुती वगैरे कामें करण्यांत गुंतलेले असतां सूर्य एकाएकीं ( संध्याकाळीं ) आपला सर्व प्रकाश झटकन ओढून घेतो त्यावरून त्याचें देवत्व व महिमा हीं उघड दिसून येतात. म्हणजे सकळ मनुष्यें कामीं गुंतलेलींच आहेत, कोणाचें काम संपलें तर कोणाचें तसेंच चाललें आहे असें असतां सूर्य आपला प्रकाश या जगांतून जणुं सर्व ओढून घेतो. असा पराक्रम दुसऱ्या कोणाच्या आंगीं नाहीं.

'रथापासून घोडे सोडून घेतो'= 'हरितः सधस्थात् अयुक्त.' हा अर्थ सायणांस अनुसरून केला आहे आणि आम्हांस वाटतें, तो बरोबर आहे. कितीएक विद्वान् सधस्थ म्हणजे हें जें जग तद्रूप घर असा अर्थ करितात, पण जगद्रूप घरास 'सधस्थ' हें नांव कांहींच उपपदाशिवाय लाविलेलें असल्याचे प्रयोग उपलब्ध आहेत असें आम्हांस वाटत नाहीं. कदाचित् "स्थानापासून=सकल अवकाशापासून=जेथें जेथें सूर्याचे घोडे

अद्या देवा उदिता सूर्यस्य निरंहसः पिपृता निरवद्यात् ।
तन्नो मित्रो वरुणो मामहन्तामदितिः सिन्धुः पृथिवी उत द्यौः ॥
॥ ६ ॥ ७ ॥ १६ ॥

अद्य । देवाः । उत्ऽइता । सूर्यस्य । निः । अंहसः । पिपृत । निः । अवद्यात् ।
तत् । नः । मित्रः । वरुणः । ममहन्ताम् । अदितिः । सिन्धुः । पृथिवी । उत । द्यौः ॥ ६ ॥ ७ ॥ १६ ॥

---

न्ति ] अन्यत् ( =रात्रितमोरूपं ) कृष्णम् ( =अन्धकारमयं ) [ पाजः=रूपं ] [ रात्रौ ] [ ते ] हरितः ( =हरिद्वर्णा अश्वाः ) [ स्वसंचाराभावेन ] सं भरन्ति ( =निष्पादयन्ति ) ॥

इदमुक्तं भवति । सूर्यः स्वतेजसः प्रसारेणाहनि मित्रस्य रूपं प्रकटयति रात्रौ तु स्वतेजसोपहारेण वरुणस्य रूपं प्रकटयतीति सूर्यस्य मित्रावरुणयोरनुकूलत्वं प्रतिपादितम् ॥

---

## भाषायाम्.

६. हे देवाः ( =मित्रावरुणसवित्रादयः ), अद्य सूर्यस्य उदिता ( =उदितौ=उदये सति ) [ यूयम् अस्मान् ] अंहसः ( =पापात्=संकटात् ) निष्पिपृत (=पालयत) [ तथा ] अवद्यात् ( =दोषात् ) निष् [ पिपृत ] ( =पालयत ) । तत् ( =यच्चैतेन सूक्तेनास्माभिः प्रार्थितं तत् ) मित्रः, वरुणः, अदितिः ( =एतन्नाम्नी आदित्यानां माता ) सिन्धुः ( =समुद्राभिमानिनी देवता) पृथिवी उत द्यौः (=भूलोको द्युलोकश्च ) [ इत्येते ] नः मामहन्ताम् ( =अस्मभ्यं पूजयन्तु=ददतु ) ॥

---

फिरतात ( म्ह० त्याचे किरण पडतात ) त्या त्या ठिकाणाहून " असा अर्थ होईल. अशासारिखा कसाहि अर्थ केला तरी सूर्य अस्तास जातांच रात्र येते आणि सकल विश्वाच्या आंगावर अंधकाररूपी पडदा घालिते असें तात्पर्य स्पष्ट आहे.

' सूर्याचें देवत्व इतक्यावरून दिसून येतें...कीं.' अक्षरशः, ' सूर्याचें देवत्व तें [ होय ]...[ कीं ].'

५. मित्र म्हणून जी देवता वेदांत आहे ती दिवसाभिमानिनी देवता होय, म्हणजे दिवसरूपी देव होय. आणि वरुण म्हणजे रात्र्यभिमानिनी देवता होय, म्हणजे रात्रिरूपी होय. म्हणून ऋषि म्हणतो कीं, दिवस आणि रात्र अशीं

६. हे देव हो, आज सूर्योदयसमयीं [तुम्हीं आम्हांस] संकटापासून आणि दोषापासून मुक्त करा. आणि हें दान मित्र, वरुण, अदिति, सिंधु, पृथिवी आणि द्यू आम्हांस देओत.

6. This day at sun-rise, do ye, O gods, free us from danger [and] from blame. And may Mitra, Varuṇa, Aditi, the Sea, Earth and Heaven confirm this unto us.

दोन रूपें आहेत तीं सूर्य आकाशांत प्रगट करितो; त्यांपैकीं दिवसाच्या योगानें मित्रदेवतेचें ज्ञान लोकांस व्हावें म्हणून तो आपल्या प्रकाशानें प्रगटतो व रात्रीच्या योगानें वरुणाचें ज्ञान व्हावें म्हणून रात्रीच्या वेळीं आपलें तेज या जगांतून काढून घेऊन सर्वत्र काळोख करून टाकितो.

६. हा येथें या सुंदर सूक्ताचा उपसंहार आहे. ऋषि म्हणतो; 'याप्रमाणें आम्हीं सूर्याची स्तुति केली आहे आणि त्याच्या संबंधानें देवांचें, मित्र, वरुण आणि अग्नि यांचें (मं. १.), उषेचें (मं. २), द्यावापृथिवींचें (मं. १, ३), मित्र आणि वरुण यांचें (मं. ५) थोरपण वर्णिलें आहे. तर हे सकल देव हो, आज आतां सूर्य नुकाच उगवला आहे यास्तव आम्हांस पाप, संकट आणि दोष इत्यादिकांपासून तुम्ही रक्षा.'

या सूक्तांत सूर्याविषयीं फारच सुंदर स्वभावोक्ति आहे. तिचें खरें स्वरूप समजून न घेतां या सूक्ताचा निरुपयोगी, अर्थहीन, आणि भटभिक्षुकांच्या निर्वाहासाठीं प्रपंचित केलेल्या कर्माच्याठायीं उगीच आक्रोशानें पाठ करीत असतात.

कुत्स ऋषीचीं या अष्टकांतील सूक्तें येथें संपलीं. या सर्वांचा वरवर जरी विचार करून पाहिला तरी याच्या भाषणांत सौंदर्य, प्रसाद, भक्तिभाव, निष्कपट भजन, प्रसंगानुसारेंकरून अनन्यभावयुक्त देवसेवा हीं जरी उत्तम प्रकारचीं आहेत, तथापि त्यांत अमानुष, देवप्रणीत अथवा ईश्वरप्रणीत किंवा दिव्य चमत्कार करून दाखविण्याची शक्ति, किंवा विलक्षण ब्रह्मवर्चस्वाचें तेज, किंवा तपश्चर्याचरणाचें पुण्य आणि देवां दैत्यांस आणि मनुष्यांस जेर करणारें बळ इत्यादिक ज्या गुणांचा आरोप आपण प्राचीन ऋषींवर पुराणादिक ग्रंथांत करितों त्यांचा लवलेशहि दृष्टीस पडत नाहीं असें कोणासहि वाटल्याशिवाय राहणार नाहीं. आपल्या धर्माच्या आणि लोकव्यवहाराच्या संबंधानें पाहिलें तर आंगिरस कुत्सादिक जे अत्यंत प्राचीन आपले अतिपूज्य ऋषि त्यांचें खरें स्वरूप कसें होतें त्याचें ज्ञान आम्हांस यथार्थ होणें हें सर्व प्रकारच्या सुधारणेस अगदीं अवश्य आहे.

## सूक्तम् ११६.

उशिक्संज्ञायामङ्गराजस्य महिष्या दास्यां दीर्घतमसोत्पादितः कक्षीवान् अस्य सूक्तस्य ऋषिः। अश्विनौ देवता। त्रिष्टुप् छन्दः॥

**नासत्याभ्यां बर्हिरिव प्र वृञ्जे स्तोमाँ इयर्म्यभ्रियेव वातः।**
**यावर्भगाय विमदाय जायां सेनाजुवा न्यूहतू रथेन ॥ १ ॥**

नासत्याभ्याम्। बर्हिःऽइव। प्र। वृञ्जे। स्तोमान्। इयर्मि। अभ्रियाऽइव। वातः।
यौ। अर्भगाय। विऽमदाय। जायाम्। सेनाऽजुवा। निऽऊहतुः। रथेन ॥ १ ॥

---

### भाषायाम्.

१. बर्हिरिव (=यथा कश्चिद्यजमानो यज्ञार्थं कुशान् प्रवृङ्क्ते छिनत्ति=छित्त्वा रचयति तथा) नासत्याभ्यां स्तोमान् [अहं] प्र वृञ्जे (=अश्विभ्यां स्तोत्राणि रचयामि) [अपि च] वातः अभ्रियेव (=वायुः अभ्रसंबन्धीनि वचांसि=स्तनितानि यथा प्रेरयति तथा) इयर्मि (=प्रेरयामि=महता नादेनोच्चारयामि)। यौ [नासत्यौ] सेनाजुवा (=बाणवत् शीघ्रं गच्छता) रथेन अर्भगाय विमदाय (=अर्भकभूताय तरुणभूताय विमदनाम्ने राजर्षये) जायां नि ऊहतुः (=विमदगृहं प्रापयामासतुः)॥

अर्भगायेत्यादौ अर्भगाय बालाय स्वयंवरलब्धभार्याय विमदायैतत्संज्ञाय राजर्षये मध्ये मार्गे स्वयंवरार्थमागतैस्तामलभमानैरन्यैर्नृपैः सह योद्धुमशक्नुवतेपि तस्मै सेनाजुवा शत्रुसेनायाः प्रेरकेण शत्रुभिर्दुष्प्रापेण रथेन यावश्विनौ जायां भार्यां परैरनुक्रान्तां न्यूहतुः। शत्रून्निहत्य तदीयं गृहं प्रापयामासतुरिति सायणः॥

## सूक्त ११६.

ऋषि–कक्षीवान्. देवता–अश्वी. वृत्त–त्रिष्टुभ्.

१. मी नासत्यांकरितां, [ यजमान लोक ] दर्भ रचितात, त्याप्रमाणें स्तोत्रें रचितों, आणि वारा जशी मेघगर्जना करितो तशी स्तोत्रगर्जना करितों. जे नासत्य वाणासारिख्या चपल रथानें बाळ विमदाची स्त्री त्याच्या घरीं पोंहचविते झाले.

## HYMN 116.

To *the As'vins.* By *Kakshîvân* the son of Dîrghatamas begotten on *Us'ij* the slave of the queen of the king of the *Angas.* Metre— *Trishtubh.*

1. I compose [these] hymns to the Nâsatyas like kus'a grass, and sing them forth [ as loudly ] as the wind [ sends forth ] the voices of thunder: Nâsatyas, who brought home to young Vimada his wife in a car swift as an arrow.

---

१. या सूक्ताचा ऋषि कक्षीवान्. याचा इतिहास असा आहे कीं कक्षीवान् हा दासीपुत्र होता. त्याचा बाप दीर्घतमा आणि त्याची आई उशिज्. ही अंगदेशाच्या राजाच्या राणीची दासी होती. ही गोष्ट लक्ष्यांत ठेवण्याजोगी आहे. कारण कीं वेदमंत्रांचे कर्ते ( अथवा द्रष्टे ) ब्राह्मणच पाहिजे होते असें नाहीं. क्षत्रियांच्या दासीचे पुत्र असले तरी चिंता नाहीं. सू. १८ मं. १, सू. ५१ मं. १३, सू. ११२ मं. २१ यांजवरील टीपा पहा.

'वारा जशी मेघगर्जना करितो तशी'= 'अभ्रियेव वातः.' 'अभ्रिय' याचा मेघाचें उदक असा अर्थ करून "वायु जसा मेघोदकें सोडतो तशीं स्तोत्रें मी सोडितों" असें सायणाचार्य भाष्य करितात. परंतु अभ्रिय म्हणजे 'मेघगर्जनेप्रमाणें गंभीर' असा अर्थ होतो. 'यदभ्रियां वाचमुदीरयन्ति' असें ऋ. १. १६८. ८ यांत आहे तें पहा. त्यावरून अभ्रियम् हें मेघध्वनि या अर्थी नपुंसकलिंगी नाम आहे असें होतें. मेघगर्जनेप्रमाणें स्तोत्र गंभीर अशी उपमा वेदांत अन्यत्र आढळते.

'वाणासारिख्या चपल रथानें'= 'सेनाजुवा रथेन.' 'सेना' शब्दाचा मूळ अर्थ बाण असा होतो. ऋ. १. १४३. ५ या मंत्रांत 'सेना' शब्दाचा अर्थ सायणांनीं जरी बाण असा केलेला नाहीं तरी तसा करणें इष्ट आहे. अश्वींच्या रथास 'मनोजू' ( मनाप्रमाणें चपळ ) असें सू. ११९ मं. १ यांत म्हटलें आहे. सैन्याप्रमाणें चपळ असें विशेषण रथास लावण्यांत कांहीं अर्थ नाहीं, कारण सैन्यापेक्षां रथ

**वीळुपत्मभिराशुहेमभिर्वा देवानां वा जूतिभिः शाशदाना ।**
**तद्रासभो नासत्या सहस्रमाजा यमस्य प्रधने जिगाय ॥ २ ॥**

वीळुपत्मऽभिः । आशुहेमऽभिः । वा । देवानाम् । वा । जूतिऽभिः । शाशदाना ।
तत् । रासभः । नासत्या । सहस्रम् । आजा । यमस्य । प्रऽधने । जिगाय ॥ २ ॥

## भाषायाम्.

२. [ हे अश्विनौ ], [ युवां ] वीळुपत्मभिः (=बलवदुत्पतनैः) आशुहेमभिः (=त्वरितं गच्छद्भिर्वा ) [ युवयोरश्वैः ] देवानां वा जूतिभिः ( =अथवा इन्द्रादिदेवानां प्रेरणैः=अदृश्यमानैः प्रेरितैर्बलैः ) शाशदाना ( =शाशदानौ=विराजमानौ ) [ भवथः ] ( =युवां तादृशैरश्वैः अश्वैर्विना वेन्द्रादीनां देवानां केवलैः प्रेरितैर्बलैः संग्रामेषु युध्यथः ) । तत् ( =एवं सत्यपि ) हे नासत्या ( =नासत्यौ ), यमस्य ( =एतन्नामकस्य देवस्य ) प्रधने ( =प्रकृष्टहननयुक्ते=तुमुले ) आजा ( =आजौ ), रासभः (=युवयोर्गर्दभः) सहस्रं [ शत्रून् ] जिगाय ( =जितवान् ) ॥

सत्यपि प्रकृष्टाश्वानां तथा देवसाहाय्यानां साधने युवां केवलेन युवयोर्गर्दभेन यमस्य संग्रामे सहस्रशत्रून् जितवन्ताविति भावः ॥

स्वभावतः चपळ असतोच. मात्र 'सेना' शब्दाचा अर्थ बाण असा सायणांनीं कोठें केलेला नाहीं. चित्रसेन, धृष्णुसेन इत्यादि नांवांवरून तो अनुमेय आहे, आणि ऋ. १. १४३. ५. इत्यादि मंत्रांत तो दृष्ट आहे असें कितीएक पाश्चिमात्य विद्वानांबरोबर समजलें पाहिजे, असें वाटतें.

'नासत्य' हें अश्वींचें नांव आहे. त्याचा अर्थ 'खरे,' 'सत्य' असा होतो, असें सायणाचार्य म्हणतात.

'दर्भ रचितात त्याप्रमाणें'='बर्हिरिव प्रवृञ्जे.' ही उपमा जरी चमत्कारिक आहे तरी ती पुष्कळ ठिकाणीं येत असते.

'विमदाची स्त्री त्याच्या घरीं पोंहचविते झाले'='विमदाय जायां नि ऊहतुः.' स्वयंवर झाला त्यांत विमद राजाला कमद्यूनें वरिलें. नंतर दुसरे जे राजे आले होते, आणि कमद्यूनें विमदाला वरल्यामुळें निराश आणि क्रोधाविष्ट झाले होते ते विमदाबरोबर लढूं लागले. तेव्हां अश्वी देवांनीं त्याच्या साहाय्याला येऊन शत्रूंस मारून कमद्यूला रथांत घालून विमदाच्या घरीं पोंहचविली असें सायणाचार्य म्हणतात. तसें घेतलें पाहिजे असें आम्हांस वाटतें. विमद आणि त्याची स्त्री यांविषयीं सू. ११२ मं. १९ यांत उल्लेख आला आहे तो आणि त्याजवरील आमची टीप पहा.

२. आवेशानें उडणारे [आणि] त्वरेनें धांवणारे अशा घोड्यांनीं अथवा देवांच्या साहाय्यांनीं तुम्ही विराजत [ असतां ]; तथापि, हे नासत्यांनो, [तो तुमचा] गर्दभ यमाच्या तुमुल युद्धांत हजारोंस जिंकिता झाला.

2. You triumph with your swift-flying [and] quick-running horses or with the succurrent deeds of the gods; and yet [your] donkey conquered, O Nâsatyas, a thousand [enemies] in the slaughterous fight of Yama.

---

२. या ऋचेचा भावार्थ असा आहे कीं, ' हे अश्वी हो, तुम्हांस युद्धांत लढण्यास उत्तम घोडे असतात आणि त्यांहींकरून तुम्ही लढत असतां, किंवा केव्हां केव्हां तुम्ही घोड्यांनीं न लढतां देवांचें साहाय्य तुम्हांस असल्यामुळें त्याच्याच योगानें तुम्ही लढतां. असें असतां यमाचें युद्ध झालें त्यांत तुम्हीं आपल्या नेहमींच्या घोड्यांचा अथवा देवसाहाय्यांचा उपयोग न करितां तुमच्या रथाला जो गाढव जोडलेला असतो त्याच्या योगानें सहस्रावधि शत्रु मारिले.'

अश्वींच्या रथाला गाढव जोडलेला असतो असें वेदांत सांगितलेलें आहे. सू. ३४ मं. ९ आणि टीप पहा.

' देवांच्या साहाय्यांनीं '=' देवानां जूतिभिः.' अक्षरशः अर्थ ' देवांच्या प्रेरणांनीं ' असा आहे. दृष्टीस न पडणारे पण ' कार्य करण्याविषयीं समर्थ ' असे देवांचे प्रसाद असा अर्थ आहे.

' यमाच्या तुमुल युद्धांत '=' यमस्य प्रधने आजा.' यमाचें युद्ध कोणतें? सायणाचार्य म्हणतात कीं ' युद्धांत ' इतकाच अर्थ विवक्षित आहे. युद्धांत जितकीं माणसें मरतील तितकीं यमाला चांगलीं म्हणून ' यमाच्या ' ( यमस्य ) असें पद घातलें आहे. या उल्लेखाचा इतिहास कसाहि असला तरी आम्हीं दिलेला अर्थ अक्षरशः खरा आहे. यम याविषयीं सू. ३८ मं. ५ याजवरील टीप पहा.

**तुग्रो॑ ह भुज्युम॑श्विनोदमे॒घे र॒यिं न कश्चि॑न्ममृ॒वाँ अवा॑हाः ।**
**तमू॑हथुर्नौ॒भिरा॑त्म॒न्वती॑भिरन्तरिक्ष॒प्रुद्भि॒रपो॑दकाभिः ॥ ३ ॥**

तुग्रः॑ । ह॒ । भु॒ज्युम् । अ॒श्वि॒ना॒ । उ॒द॒ऽमे॒घे । र॒यिम् । न । कः॑ । चि॒त् । म॒मृ॒ऽवान् । अव॑ । अ॒हाः॒ ।

तम् । ऊ॒ह॒थुः॒ । नौ॒भिः॑ । आ॒त्म॒न्ऽवती॑भिः । अ॒न्त॒रि॒क्ष॒प्रुत्ऽभिः॑ । अप॑ऽउदकाभिः ॥ ३ ॥

## भाषायाम्.

३. हे अश्विना (=अश्विनौ), कश्चित् ममृवान् रयिं न (=मृतवान् कश्चिन्मनुष्यः स्वकीयं धनं त्यजति तद्वत्) तुग्रो ह भुज्युम् उदमेघे अव अहाः (=तुग्रः पिता भुज्युं पुत्रं समुद्रे त्यक्तवान्) तं (=भुज्युं) [युवाम्] आत्मन्वतीभिः (=जीवोपेताभिः=सचेतनवद्गतिमतीभिः) अन्तरिक्षप्रुद्भिः (=जलोपरिष्टादेव अन्तरिक्षे गच्छन्तीभिः) अपोदकाभिः (=अपगतजलाभिः=असंसृष्टजलाभिः) नौभिः ऊहथुः (=पितृसमीपे प्रापयामासथुः) ॥

अत्र सायणः । अत्रेयमाख्यायिका । तुग्रो नामाश्विनोः प्रियः कश्चिद्राजर्षिः । सच द्वीपान्तरवर्तिभिः शत्रुभिरत्यन्तमुपद्रुतः सन् तेषां जयाय स्वपुत्रं भुज्युं सेनया सह नावा प्राहैषीत् । सा च नौर्मध्ये समुद्रमतिदूरं गता वायुवशेन भिन्नासीत् । तदानीं स भुज्युः शीघ्रमश्विनौ तुष्टाव । तौ च स्तुतौ सेनया सहितमात्मीयासु नौष्वारोप्य पितुस्तुग्रस्य समीपं त्रिभिरहोरात्रैः प्रापयामासतुरिति । अयमर्थ इदमादिकेन तृचेन प्रतिपाद्यते । हशब्दः प्रसिद्धौ । तुग्रः खलु पूर्वं शत्रुभिः पीडितः सन् तज्जयार्थमुदमेघे । उदकैर्मिह्यते सिच्यत इत्युदकमेघः समुद्रः । तस्मिन्भुज्युमेतत्संज्ञं प्रियं पुत्रमवाहाः । नावा गन्तुं पर्यत्याक्षीत् । तत्र दृष्टान्तः । ममृवान् म्रियमाणः सन्धनलोभी कश्चिन्मनुष्यो रयिं न । यथा धनं परित्यजति तद्वत् । हे अश्विनौ तं च भुज्युं मध्ये समुद्रं निमग्नं नौभिः पितृसमीपमूहथुः । युवां प्रापितवन्तौ । कीदृशीभिः । आत्मन्वतीभिः । आत्मीयाभिः । युवयोः स्वभूताभिरित्यर्थः । यद्वा धृतिरात्मा । धारणवतीभिरित्यर्थः । अन्तरिक्षप्रुद्भिः । अतिस्वच्छत्वादन्तरिक्षे जलस्योपरिष्टादेव गन्त्रीभिः । अपोदकाभिः । सुश्लिष्टत्वादपगतोदकाभिः । अप्रविष्टोदकाभिरित्यर्थः ॥ इति ॥

३. हे अश्वी हो, कोणी एकादा मरणोन्मुख [ मनुष्य ] आपलें वित्त [ सोडून देतो ] तसा तुग्र भुज्यूला समुद्रांत सोडून देता झाला. मग त्याला तुम्ही जीवयुक्त [आणि] अंतरिक्षांतून चालणाऱ्या [आणि] पाण्याला स्पर्श न करणाऱ्या नावांच्या योगेंकरून [ घरीं ] पोंहचविते झालां.

3. O As'vins, Tugra, as it is said, left Bhujyu on the sea as a dying man leaves [ his ] wealth. Him you brought home in live ships that moved in the air [and that were] free from contact with the water.

३. सायणाचार्य म्हणतात कीं, 'पूर्वी तुग्र म्हणून एक राजा असे. त्याला द्वीपांतरींचे लोक येऊन उपद्रव करूं लागले. तेव्हां त्यांचें पारिपत्य करण्यासाठीं म्हणून त्याणें आरमार तयार करून आपला मुलगा भुज्युनामक राजपुत्र सैन्यासहित समुद्रांतून पाठविला. इतक्यांत त्याचीं जहाजें वादळांत सांपडून फुटलीं, आणि भुज्यु बुडून मरूं लागला; त्याणें अश्वींची स्तुति केल्यामुळें अश्वींनीं त्याला आणि त्याच्या सेनेला आपल्या जहाजांत घालून तीन दिवस आणि तीन रात्रींपर्यंत तीं जहाजें चालवून त्याचा बाप तुग्र याजवळ आणून सोडिलें.' अशी कथा असावी यांत संशय नाहीं. तिचा उल्लेख अश्वींविषयींच्या पुष्कळ सूक्तांत आला आहे.

भुज्यूविषयीं सू. ११२ मं. ६ आणि टीप पहा.

'जीवयुक्त '=' आत्मन्वतीभिः.' म्हणजे जीवंत असल्याप्रमाणें चालणाऱ्या. ऋ. १. १८२. ५ यांतहि अश्वींनीं भुज्यूला 'आत्मन्वन्त ' नावेंत घालून आणिलें असें सांगितलें आहे. तेथें सायणाचार्य ' दृढ ' असा अर्थ करितात.

' अंतरिक्षांतून चालणाऱ्या आणि पाण्याला स्पर्श न करणाऱ्या '=' अन्तरिक्षप्रुद्भिः अपोदकाभिः'. म्हणजे पाण्यांतून न चालतां हवेंतून चालणाऱ्या. विमानें जरी प्राचीनकाळीं नसतील तरी विमानाची कांहींशी कल्पना होती असें या मंत्रावरून सिद्ध होतें.

त्याप्रमाणेंच या ऋचेवरून असेंहि सिद्ध होतें कीं, वेदकाळींचे राजर्षि जहाजांत बसून समुद्रांत पर्यटण करीत असत इतकेंच नव्हे पण आरमारानिशीं जाऊन परद्वीपस्थ शत्रूंचा पराजय करण्याचीहि त्यांची चाल असे. नावेंत बसूं नये, बसेल तो भ्रष्ट होय असें सांगणारे ग्रामर्षि तेव्हांच्या काळीं जन्मले नव्हते यांत संशय नाहीं.

**तिस्रः क्षपस्त्रिरहातिव्रजद्भिर्नासत्या भुज्युमूहथुः पतंगैः ।**
**समुद्रस्य धन्वन्नार्द्रस्य पारे त्रिभी रथैः शतपद्भिः षळश्वैः ॥ ४ ॥**

तिस्रः । क्षपः । त्रिः । अहा । अतिव्रजत्ऽभिः । नासत्या । भुज्युम् । ऊहथुः । पतंगैः ।
समुद्रस्य । धन्वन् । आर्द्रस्य । पारे । त्रिऽभिः । रथैः । शतपत्ऽभिः । षट्ऽअश्वैः ॥ ४ ॥

**अनारम्भणे तदवीरयेथामनास्थाने अग्रभणे समुद्रे ।**
**यदश्विना ऊहथुर्भुज्युमस्तं शतारित्रां नावमातस्थिवांसम् ॥५॥८॥**

अनारम्भणे । तत् । अवीरयेथाम् । अनास्थाने । अग्रभणे । समुद्रे ।
यत् । अश्विनौ । ऊहथुः । भुज्युम् । अस्तम् । शतऽअरित्राम् । नावम् । आतस्थिऽवांसम् ॥ ५ ॥ ८ ॥

---

## भाषायाम्.

४. हे नासत्या (=नासत्यौ=असत्यरहितावश्विनौ), तिस्रः क्षपः त्रिः अहा (=त्रीण्यहोरात्राणि) अतिव्रजद्भिः (=अतिक्रामद्भिः) पतंगैः (=पक्षिभिः) [नौरूपैः] [अथवा] शतपद्भिः (=पादशतोपेतैः) षळश्वैः (=अश्वषट्कनियुक्तैः) [त्रिभी रथैः] आर्द्रस्य समुद्रस्य (=उदकोपेतस्य सागरस्य) धन्वन् पारे (=उदकरहिते तीरे) भुज्युम् ऊहथुः (=भुज्युनामकं राजर्षिं युवां प्रापयामासथुः) ॥

५. हे अश्विनौ, अनारम्भणे (=निरालम्बे) अनास्थाने (=तीरादिकेन निर्जलेन स्थलेन विरहिते) अग्रभणे (=हस्तग्राह्येण वृक्षशाखादिना विरहिते) समुद्रे (=सागरे) [युवां] शतारित्रां (=शतेनारित्रैर्नाम नौपार्श्वबद्धैर्जलविलोडनकाष्ठैर्युक्तां नावम्) आतस्थिवांसं भुज्युं (=तं तादृश्यां नौकायां स्थापयित्वा) यद् अस्तम् ऊहथुः (=गृहं=पितुर्गृहं प्रापयामासथुः) तद् [युवाम्] अवीरयेथाम् (=विक्रान्तं कृतवन्तौ=महच्छौर्यकर्म कृतवन्तौ भवथः) ॥

४. हे नासत्य हो, तुम्ही तीन रात्री [ आणि ] तीन दिवसपर्यंत धांवत असणाऱ्या पक्ष्यांच्या योगें-करून—शंभर शंभर पाय असले-ल्या तीन रथांच्या योगानें—सहा घोड्यांच्या योगानें, भुज्यूला उदक-मय समुद्राच्या निर्जल तीरावर पोंहचविते झालां.

4. O truthful [ As'vins ], you carried Bhujyu on the wings of [ the ] birds that travelled during three nights and three days—in three cars of a hundred wheels—on six horses—to the dry shore of the humid sea.

५. हे अश्वी हो, तुम्ही आ-धाररहित [ आणि ] स्थानरहित [ आणि ] धारणरहित समुद्रांत जे भुज्यूला शंभर वल्ह्यांच्या नावेंत ब-सवून घरीं नेते झालां तो तुम्हीं मो-ठा पराक्रम केला.

5. O As'vins, that was an act of your heroism that you in the bottomless, shoreless and supportless ocean placed Bhujyu in the hundred-oared ship and safely took him to his house.

---

४. भावार्थः—' हे अश्वी हो, वरच्या मंत्रांत सांगितल्याप्रमाणें भुज्यु आणि त्याचें सैन्य जाहाजें फुटल्यामुळें समु-द्रांत बुडून मरत असतां त्यास तुम्हीं पक्ष्यांप्रमाणें उडत उडत जाणाऱ्या, अ-थवा शेकडो चाकें असलेल्या रथांप्रमाणें सत्वर चालणाऱ्या तारवांत घालून भु-ज्यूच्या बापाच्या घरीं तीन दिवसांमध्यें नेऊन पोंहचविलें.

' यांत सहा घोडे जे सांगितले आ-हेत ते दर रथाला दोन दोन याप्रमाणें तीन रथांचे मिळून सहा असें समजावें.'

' तीन रात्री आणि तीन दिवस कां? आणि तीन रथ कां? यानें उत्तर असें दिसतें कीं, अश्वींचा कांहीं तरी पराक्रम वर्णावयाचा असला म्हणजे अश्वींनीं तीन दिवस असें केलें, तीन मनुष्यांवर प्र-साद केला, त्यांनीं तीनदां यावें, तीन रथांत बसावें इत्यादि तीन या संख्येचा प्रयोग फार येत असतो. सू. ३४ पहा; आणि विशेषेंकरून सू. ३४ मं. २ या-वरची टीप पहा.'

' धांवत असणाऱ्या पक्ष्यांच्या योगें-करून '= ' अतिव्रजद्भिः पतंगैः. ' म्हण-जे पक्ष्यांप्रमाणें जलद चालणाऱ्या तार-वांच्या योगानें.

५. भुज्यूला समुद्रांतून तीरावर आ-णून त्याच्या बापाच्या घरीं सुखरूप पोंह-चविलें ही जी गोष्ट वर सांगितली तिज-विषयीं ऋषि म्हणतो, ' हे अश्वी हो,

**यमश्विना ददथुः श्वेतमश्वमघाश्वाय शश्वदित्स्वस्ति ।**
**तद्वां दात्रं महि कीर्तेन्यं भूत्पैद्वो वाजी सदमिद्धव्यो अर्यः ॥ ६ ॥**

यम् । अश्विना । ददथुः । श्वेतम् । अश्वम् । अघऽअश्वाय । शश्वत् । इत् । स्वस्ति ।
तत् । वाम् । दात्रम् । महि । कीर्तेन्यम् । भूत् । पैद्वः । वाजी । सदम् । इत् । हव्यः । अर्यः ॥ ६ ॥

---

## भाषायाम्.

६. हे अश्विना (=अश्विनौ), अघाश्वाय (=हिंसकाश्वाय=हिंसकः अपजयस्य कर्ताश्वो यस्य तस्मै) [ पेदवे नाम कस्मै चिदुपासकाय] [ युवां ] शश्वद् इत् स्वस्ति (=नित्यमेव जयस्य कर्तारं) यं श्वेतम् (=शुभ्रवर्णम्) अश्वं ददथुः तत् (=तादृशाश्वदानरूपं) वां (=युवयोर्) दात्रं (=दानं) महि (=महत्) कीर्तेन्यं (=कीर्तनीयं=स्तुत्यं) [ च ] भूत् (=अभूत्) । अर्यः पैद्वो वाजी (=स पेदोः संबन्धी श्रेष्ठोश्वः) सदम् इत् (=सदैव) हव्यः (=अस्मादृशादिभिर्जनैरपि देववत् आह्वातव्यो) [ भूत्=अभूत्=जातोस्ति ] ॥

दुष्टाश्वाय पेदवे यस्माद्युवामुत्तममश्वं ददथुस्तस्माद्युवयोरौदार्यं सर्वत्र प्रकीर्तितमस्ति । स चाश्वोधुनापि जिगीषुभिः पुरुषैरिन्द्रादिदेववदाहूयत इति भावः ॥

---

खालीं ज्याला आधार नाहीं, कोठें उभें राहावयाला ठिकाण नाहीं, फांदीला धरावें म्हटलें तर जेथें वृक्ष नाहीं, अशा समुद्रांत भुज्यु बुडून मरत असतां त्याला शेकडों वल्हीं असलेल्या नावेंत घालून तुम्हीं पार पाडिला आणि त्याच्या घरीं नेऊन पोंहचविलें हा तुमचा मोठा पराक्रम होय.'

६. हे अश्वी हो, तुम्ही [पेदूचा] घोडा हिंसक होता, त्याला नित्य जयच मिळविणारा शुभ्र वारू जो देते झालां तें तुमचें मोठें वाखाणण्याजोगें औदार्य होय. पेदूच्या श्रेष्ठ वारूचा [दुसऱ्यांनीं] नित्य धांवा करण्यास योग्य [झाला आहे.]

6. O As'vins, that has become [renowned as] your great [and] praiseworthy generosity, that you gave to [Pedu], who had an evil horse, a white horse [that] ever [brought] success: the noble steed of Pedu has become worthy of perpetual invocation [by others].

---

६. यांत अश्वींचा दुसरा एक पराक्रम वर्णिला आहे. तो हा कीं, 'पेदु म्हणून एक योद्धा होता त्याचा घोडा वाईट असे त्यामुळें युद्धांत त्याचा अपजय होत असे, त्याला अश्वींनीं सदैव जय प्राप्त करून देणारा शुभ्र वारू दिला, त्यामुळें अश्वींची औदार्याविषयीं मोठी कीर्ति झाली, आणि पेदूचा घोडा इतका प्रसिद्ध झाला कीं, तो मरून पुष्कळ वर्षें झालीं तरी अजूनहि जय इच्छिणारे लोक युद्धांत त्याचा धांवा आणि नवस करितात.'

पेदु या नांवाचा कोणी एक उपासक होता. त्याला अश्वींनीं एक उत्तम आणि शुभ्र वर्णाचा घोडा दिला तेणेंकरून तो युद्धांत नित्य यशस्वी होत असे आणि शत्रूंचा पराजय करून त्यांचें धन हरण करीत असे असें चार पांच मंत्रांत आलें आहे, (ऋ. १. ११७. ९; ११८. ९; ११९. १०; इ०).

वृत्तानुरोधेंकरून दुसरा आणि तिसरा हे पाद खालीं दाखविल्याप्रमाणें म्हटले पाहिजेतः—

अघाशुआयें शॅश्वदित्सुअस्ति ।
तद्वां दॉत्रं मॅहि कीॅर्तेनिअं भूत् ॥

युवं नरा स्तुवते पज्रियाय कक्षीवते अरदतं पुरंधिम् ।
कारोतराच्छफादश्वस्य वृष्णः शतं कुम्भाँ असिञ्चतं सुरायाः ॥७

युवम् । नरा । स्तुवते । पज्रियाय । कक्षीवते । अरदतम् । पुरम्ऽधिम् ।
कारोतरात् । शफात् । अश्वस्य । वृष्णः । शतम् । कुम्भान् । असि-
ञ्चतम् । सुरायाः ॥ ७ ॥

## भाषायाम्.

७. हे नरा (=नरौ शूरावश्विनौ), युवं (=युवां) स्तुवते (=स्तोत्रं कुर्वते) पज्रियाय कक्षीवते (=पज्रकुलोत्पन्नाय कक्षीवते मह्यं) पुरंधिं (=प्रभूतां बुद्धिम्) अरदतम् (=प्रायच्छतम्)। [युवां युवयोर्] वृष्णः (=सेचनसमर्थस्य=वीर्यवतः) अश्वस्य कारोतरात् शफात् (=कारोतरसदृशात् खुरात्) सुरायाः शतं कुम्भान् (=मद्यस्य असंख्यान् कुम्भान्) असिञ्चतम् (=अपूरयतम्) ॥

पज्रा इत्यङ्गिरसामाख्या। पज्रा वा अङ्गिरस इत्याम्नातत्वात्। तेषां कुले जाताय कक्षीवते * * *। कारोतरो नाम वैदलश्चर्मवेष्टितो भाजनविशेषो यस्मिन्सुरायाः स्रावणं क्रियते इति सायणः ॥

पुरंधिरिति प्रभूतस्य धनस्य नामेति यद्यास्मन आह तदाधारसापेक्षमिति भाति ॥

७. हे शूर [अश्वी] हो, तुम्ही तुमची स्तुति करणारा पज्रिय कक्षीवान् याला मोठी प्रज्ञा देते झालां. तुम्ही [तुमच्या] वीर्यवान् घोड्याच्या दभड्या[सारिख्या ] खुरापासून मद्याचे शंभर घडे भरिते झालां.

7. You, O heroes, gave wisdom to pious Kakshîvân the descendant of Pajra; you filled a hundred pitchers of liquor from the hoof of [your] heroic steed as from a wicker vessel.

---

७. या मंत्रांत अश्वींचा आणखी एक पराक्रम वर्णिला आहे. तो हाः–' अश्वींनीं पज्रियकुळांत जन्मलेल्या कक्षीवान् ऋषीला ( म्हणजे मलाच ) मोठी बुद्धि दिली; आणि शंभर घडे सुरा (=दारू) आपल्या बळवान् घोड्याच्या खुरापासून काढिली.'

कक्षीवान् हा या सूक्ताचा कर्ता होय. त्याला अश्वींनीं मोठी प्रज्ञा दिली असें वेदांत सांगितलें आहे; आणि अश्वी देव यांनीं आपल्या बळवान् घोड्याच्या खुरापासून शंभर घडे दारू वाहविली असेंहि वर्णिलें आहे. ऋ. १. ११७. ६ पहा.

' पज्रिय.' पज्रकुळाविषयीं सू. ५१ मं. १४ आणि त्याजवरील टीप पहा.

' दभड्या[सारिख्या ] ' = ' कारोतरात्.' ' कारोतर ' शब्द पुनः आलेला नाहीं. परंतु त्याचा अर्थ सायणाचार्य करितात तो असाः– ' वेळूचें एक भांडें कीं ज्यावर चामडें मढविलेलें असतें आणि ज्यांत दारू ओतून ठेवितात तें.' यावरून कारोतर म्हणजे दारू ठेवण्याचें दभड्यासारिखें एक भांडें असावें असें उघड होतें. अशा प्रकारचीं भांडीं अजूनहि दारूच्या पिप्यांत मुंबईत वापरतात.

या मंत्रावरून स्पष्ट होतें कीं सुरा म्हणजे दारू जी ती वैदिक युगांत प्रसिद्ध होती आणि ती लोक पीत होते. सुरा शब्द आणखी दोन वेळ ऋग्वेदांत आला आहे. पण तेथेंहि दारू असाच अर्थ आहे (ऋ. ७. ८६. ६; ८. २. १२). सोमापासून जो कैफ येत असे त्यापेक्षां सुरेचा कैफ अधिक असें या शेवटच्या मंत्रावरून दिसून येतें.

**हिमेनाग्निं घ्रंसमवारयेथां पितुमतीमूर्जमस्मा अधत्तम् ।**
**ऋबीसे अत्रिमश्विनावनीतमुन्निन्यथुः सर्वगणं स्वस्ति ॥ ८ ॥**

हिमेन । अग्निम् । घ्रंसम् । अवारयेथाम् । पितुऽमतीम् । ऊर्जम् । अस्मै । अधत्तम् ।
ऋबीसे । अत्रिम् । अश्विना । अवऽनीतम् । उत् । निन्यथुः । सर्वऽगणम् । स्वस्ति ॥ ८ ॥

---

## भाषायाम्.

८. [ हे अश्विनौ ] [ युवां ] हिमेन ( =शीतोदकेन ) [ अत्रेर्नाम कस्यचिदुपासकस्य ] घ्रंसम् अग्निम् अवारयेथाम् ( =" दीप्यमानमत्रेर्बाधनार्थमसुरैः प्रक्षिप्तं तुषाग्निं " निवारितवन्तौ ) । [ युवां ] पितुमतीम् ऊर्जम् ( =अन्नोपेतं बलम्=अन्नं बलं च ) अस्मै ( =अत्रये ) अधत्तम् ( =प्रायच्छतम् ) । हे अश्विना ( =अश्विनौ ), [ युवाम् ] ऋबीसे अवनीतम् ( =पीडायन्त्रगृहे अवाङ्मुखतया प्रापितम् ) अत्रिम् ( =एतन्नामकं पूर्वोक्तमुपासकं ) सर्वगणं (=पुत्रपौत्रादिगणैर्युक्तं ) स्वस्ति ( =सुखं यथा तथा ) उन्निन्यथुः ( =तस्माद् ऋबीसाद् उद्धृतवन्तौ ) ॥

अत्र सायणः । अत्रेदमाख्यानम् । अत्रिमृषिमसुराः शतद्वारे पीडायन्त्रगृहे प्रवेश्य तुषाग्निनाबाधिषत । तदानीं तेन ऋषिणा स्तुतावश्विनावग्निमुदकेनोपशमय्य, तस्मात्पीडागृहादविकलेन्द्रियवर्गं सन्तं निरगमयतामिति । तदेतत्प्रतिपाद्यते । हे अश्विनौ हिमेन हिमवच्छीतेनोदकेन घ्रंसं दीप्यमानमत्रेर्बाधनार्थमसुरैः प्रक्षिप्तं तुषाग्निमवारयेथाम् । युवां निवारितवन्तौ । शीतीकृतवन्तावित्यर्थः । अपि च । अस्मा असुरपीडया कार्श्यं प्राप्तायात्रये पितुमतीम् । पितुरित्यन्ननाम । अन्नयुक्तमूर्जं बलप्रदं रसात्मकं क्षीरादिकमधत्तम् । पुष्ट्यर्थं प्रायच्छतम् । ऋबीसेऽपगतप्रकाशे पीडायन्त्रगृहेऽवनीतमवाङ्मुखतयासुरैः प्रापितमत्रिं सर्वगणम् । गणः समूहः सर्वेषामिन्द्रियाणां पुत्रादीनां वा गणेनोपेतं स्वस्ति अविनाशो यथा भवति तथोन्निन्यथुः । तस्माद्गृहादुद्गमय्य युवां स्वगृहं प्रापितवन्तौ । यद्वा । हिमेन शीतेन वृष्ट्युदकेनाग्निमग्निवत्तीक्ष्णं घ्रंसम् । अहर्नामैतत् । सामर्थ्यान्निदाघकालीनमहरवारयेथाम् । तस्याह्नस्तैक्ष्ण्यं निवारितवन्तौ । अपि च । अस्मा अग्नये पितुमतीं चरुपुरोडाशादिलक्षणान्नोपेतमूर्जं बलकरं रसात्मकमुपस्तरणाभिघारणात्मकं घृतमधत्तम् । वृष्ट्युत्पादनेनाग्नेर्योगार्थं हवींषि निष्पादितवन्तावित्यर्थः । ऋबीसेऽपगततेजस्के पृथिवीद्रव्येऽवनीतमोषधीनामुत्पादनायावस्तान्नीतम् । पार्थिवाग्निना परिपक्वा उदकेन क्लिन्ना ह्योषधिवनस्पतयो विरोहन्ति । अत्रिं हविषामत्तारमोषधिवनस्पत्यादीनां वा । एवंविधमग्निं सर्वगणं व्रीह्याद्योषधिगणोपेतं हे

८. [ हे अश्वी हो ], [तुम्ही] शैत्याच्या योगानें [अत्रीचा] दाहक अग्नि निवारण करिते झालां आणि त्या [ अत्री]ला अन्नयुक्त बळ देते झालां. हे अश्वी हो, अग्निकुंडामध्यें बुडालेला जो अत्रि त्याला तुम्ही सपरिवार सुखरूपपणें वर काढिते झालां.

8. You warded off with cold the glowing fire [ of Atri ], [ and ] conferred upon him strength and food: O As'vins, you did safely raise, with all his followers, Atri who was sinking in the fire-pit.

---

८. अत्रि म्हणून एक देवभक्त असे. त्याला असुरांनीं एका शंभर दारें असलेल्या पीडागृहांत घालून ते त्याच्या आंगाला गवत बांधून त्याला आग लावून जाळूं लागले. तेव्हां अश्वींनीं त्याजवर कृपा करून त्याचा अग्नि शांत केला आणि त्याला मुक्त करून अन्न दिलें आणि बळवान् केलें अशी कथा आहे ती यांत सांगितली आहे. सू. ५१, मं. ३ आणि त्याजवरील टीप पहा. त्या सूक्तांत अत्रीला बाहेर काढिलें तें अग्नीनें काढिलें असें सांगितलें आहे, आणि या प्रस्तुत सूक्तांत अश्वींनीं काढिलें असें म्हटलें आहे. अत्रि म्हणून कोणी एक महापुरुष होता, आणि त्याचा छळ दुष्टांनीं केला, तेव्हां मोठया संकटांतून चमत्कारिक रीतीनें त्याची मुक्ति झाली इतकी प्रसिद्धि एक वेळ झाल्यावर, मग ज्या देवाची जो ऋषि ( म्हणजे कवि ) स्तुति करील त्या देवानें ती सुटका केली, असें त्यानें म्हणावें यांत नवल नाहीं.

'अग्नि '=' अग्निम्.' हा अग्नि म्हणजे ' तुषाग्नि ' होय. कितीएक एतद्देशीय राज्यांत अपराधी मनुष्याच्या आंगाला गवत बांधून त्या गवताला आग लावून त्यास जाळून मारण्याची चाल आलीकडे थोडक्या दिवसांतच बंद झाली. सांवतवाडी प्रांतांत उसपकार देसाई यांनीं कांहीं वर्षांपूर्वी उमगांवस या नांवाच्या एका मनुष्याला कोलूनें ( गवतानें ) बांधून मारण्याची अगदी तयारी केली होती ही गोष्ट त्या प्रांतांत प्रसिद्ध आहे. तर असा जो आंगाला बांधलेल्या गवताला लावून पेटविलेला अग्नि त्याला तुषाग्नि असें संस्कृतांत म्हणतात आणि तसलाच अग्नि अत्रीच्या आंगापासून अश्वींनीं शांत केला असें सायणभाष्यावरून समजतें.

वृत्तानुरोधेंकरून ' स्वस्ति ' याच्या ठिकाणीं ' सुअस्ति ' असें वाचलें पाहिजे.

परावतं नासत्यानुदेथामुच्चाबुंधं चक्रथुर्जिह्मबारम् ।
क्षरन्नापो न पायनाय राये सहस्राय तृष्यते गोतमस्य ॥ ९ ॥

परा । अवतम् । नासत्या । अनुदेथाम् । उच्चाऽबुंध्रम् । चक्रथुः । जिह्मऽबारम् ।
क्षरन् । आपः । न । पायनाय । राये । सहस्राय । तृष्यते । गोतमस्य ॥ ९ ॥

---

अश्विनौ युवां स्वस्ति अविनाशो यथा भवति तथोन्निन्यथुः । व्रीह्याद्योषधिवनस्पतिरूपेण भूमेरुपरिष्टान्नीतवन्तौ । कारणात्मना पार्थिवाग्नौ वर्तमानं सर्वमोषधिवनस्पत्यादिकमश्विनौ प्रकर्षेण व्यक्तीकृतवन्तावित्यर्थः। अयं पक्षो यास्केन हिमेनोदकेनेत्यादिनोक्तः । नि० ६. ३५ ॥ पितुमतीं ह्रस्वनुड्भ्यां मतुबिति मतुप उदात्तत्वम् । ऋबीसे । अत्र यास्कः ऋबीसमपगतभासमपचितभासमपहृतभासं गतभासं वेति । नि० ६. ३५ ॥

---

## भाषायाम्.

९. हे नासत्या ( =नासत्यौ=एतन्नामकावश्विनौ ), [ युवाम् ] अवतं परा अनुदेथां ( =कूपं दूरदेशे वर्तमानमुत्खाय गोतमस्य स्थलसमीपेगमयताम् ) [ अपि च ] [ तं कूपम् ] उच्चाबुध्नम् ( =उपरिष्टाद्गतमूलं ) जिह्मबारम् ( =अधःस्थितद्वारं च ) चक्रथुः ( =कृतवन्तौ स्थः ) । [ तदनन्तरं ] तृष्यते गोतमस्य ( ?=तृषाक्रान्तस्य गोतमनामकस्य कस्यचिदुपासकस्य ) पायनाय ( =पानाय ) सहस्राय राये न (=सहस्रसंख्याकं धनमिव ) आपः क्षरन् ( =उदकानि ततः कूपात् प्रवाहरूपेण निरगमन् )॥

दुर्बोधतरोत्तरार्धामेतामृचं सायण एवं व्याख्यातवान् । अत्रेदमाख्यानम् । कदाचिन्मरुभूमौ वर्तमानस्य स्तोतुर्गोतमस्य ऋषेः समीपं देशान्तरे वर्तमानं कूपमुत्खायाश्विनौ प्रापयताम् । प्रापय्य च तं कूपं स्नानपानादिसौकर्यायोपरिमूलमधोबिलमवास्थापयतामिति तदेतदाह । हे नासत्या सत्यभावौ सत्यस्य नेतारौ नासिकाप्रभवौ वा । एतत्संज्ञावश्विनौ युवामवतम् । कूपनामैतत् । अवस्तात्ततं कूपं परानुदेथाम् । गोतमस्य ऋषेः समीपे प्रेरिषाथाम् । तदनन्तरं तं कूपमुच्चाबुध्नम् । उच्चैरुपरिष्टाद्बुध्नो मूलं यस्य स तथोक्तः । जिह्मबारम् । जिह्ममधस्ताद्वर्तमानं तथा वक्रं बारं द्वारं यस्य स तथोक्तः । एवंगुणविशिष्टं चक्रथुः । युवामकृषाथाम् । तस्मात्कूपात्तृष्यते पिपासतो गोतमस्य पायनाय पानार्थमापो न आपश्च । अयं नशब्दश्चार्थे । क्षरन् । प्रवाहरूपेण निरगमन् । कीदृशस्य । हवींषि दत्तवतः । सहस्राय सहनशीलाय । यद्वा सहस्रसंख्याकाय राये धनाय । एतत्संख्यधनलाभार्थं चाक्षरन् ॥ इति ॥

९. हे नासत्य हो, तुम्ही कूप खोदून जवळ आणिला [ आणि ] त्याचा तळ वर आणि तोंड खालीं केलें. [ त्यापासून ] तृषाक्रांत गोतमाकारणें सहस्रावधि संपत्ति [लोटल्या]प्रमाणें उदकप्रवाह वाहूं लागला.

9. You, O Nâsatyas, dug up and removed the spring, and placed it bottom upwards and mouth downwards. Then there flowed waters for thirsty Gotama to drink, like a thousandfold wealth.

९. गोतम म्हणून एक उपासक किंवा ऋषि असे. त्याला तहान लागली असतां पाण्याचा कूप दूर होता तो खोदून काढून गोतमाजवळ अश्वींनीं आणिला आणि त्याचा तळ वर केला आणि त्याचें तोंड खालीं केलें. त्यामुळें गोतमाला श्रमाशिवाय पाणी सहज मिळालें आणि त्यांतून संपत्तीच्या धारा वाहिल्याप्रमाणें पाण्याचे प्रवाह वाहूं लागले अशी सायणांनीं सांगितलेली कथा या मंत्रांत आहे.

'नासत्य' हें अश्वींचें नांव आहे. त्याचा अर्थ 'खरे' असा करण्याचा प्रचार प्रायः आहे.

'गोतमाकारणें.' हें नांव पूर्वी पुष्कळ ठिकाणीं आलेंच आहे. सू. ६० मं. ५; ६१. १६; ६२. १३; ७८, २; ७२. ४, १०; ८५. ११ इत्यादि मंत्र आणि त्यांजवरील टिपा पहा.

'सहस्रावधि संपत्ति लोटल्याप्रमाणें' =' राये सहस्राय न.' या मंत्राचा सगळा उत्तरार्ध कठिण आहे. सायणांनींहि कसें तरी करून निर्वाह केला आहे, तो आम्हीं भाषेंत उतरून घेतला आहे.

वृत्तानुरोधेंकरून प्रथम चरण 'परावतं नासतिआतुदेथाम्' असा म्हटला पाहिजे.

**जुजुरुषो नासत्योत वव्रिं प्रामुञ्चतं द्रापिमिव च्यवानात् ।**
**प्रातिरतं जहितस्यायुर्दस्रादित्पतिमकृणुतं कनीनाम् ॥ १० ॥ ९ ॥**

जुजुरुषः । नासत्या । उत । वव्रिम् । प्र । अमुञ्चतम् । द्रापिम्ऽइव । च्यवानात् ।
प्र । अतिरतम् । जहितस्य । आयुः । दस्रा । आत् । इत् । पतिम् । अकृणुतम् । कनीनाम् ॥ १० ॥ ९ ॥

**तद्वां नरा शंस्यं राध्यं चाभिष्टिमन्नासत्या वरूथम् ।**
**यद्विद्वांसा निधिमिवापगूळ्हमुद्दर्शतादूपथुर्वन्दनाय ॥ ११ ॥**

तत् । वाम् । नरा । शंस्यम् । राध्यम् । च । अभिष्टिऽमत् । नासत्या । वरूथम् ।
यत् । विद्वांसा । निधिम्ऽइव । अपऽगूळ्हम् । उत् । दर्शतात् । ऊपथुः । वन्दनाय ॥ ११ ॥

## भाषायाम्.

१०. उत (=अपि च) हे नासत्या (=नासत्यौ), [युवां] जुजुरुषः (=जीर्णात्=जराक्रान्तात्) च्यवानात् (=च्यवननाम्नः कस्माचिदुपासकात्) वव्रिं (=जरां) द्रापिमिव (=कवचमिव) प्रामुञ्चतम् (=प्रकर्षेणामोचयतं=दूरीकृतवन्तौ), [तथा] हे दस्रा (=दस्रौ=शौर्योपेतकर्माणौ), जहितस्य (=हीनस्य=पुत्रपौत्रादिभिः परित्यक्तस्य) [च्यवनस्य] आयुः (=जीवनं) प्रातिरतम् (=अवर्धयतम्) आद् इत् (=अनन्तरमेव=तत्क्षणमेव च) [तं] कनीनां (=कन्यानां स्त्रीणां=तरुणस्त्रीणां) पतिम् अकृणुतम् (=अकुरुतम्) ॥

अत्र सायण इमामाख्यायिकामाह । वलीपलितादिभिरुपेतो जीर्णाङ्गः पुत्रादिभिः परित्यक्तश्च्यवनाख्य ऋषिरश्विनौ तुष्टाव । स्तुतावश्विनौ तस्मै ऋषये जरामपगमय्य पुनर्यौवनमकुरुतामिति ॥

११. हे नरा (=नरौ=शूरौ) नासत्या (=नासत्यौ=अश्विनौ), तद् (=वक्ष्यमाणं) वां (=युवयोर्) वरूथं (=रक्षणं) शंस्यं (=स्तुत्यं) राध्यम् (=आराधनीयम्=आराधनयोग्यं=वाञ्छाविषयभूतं) च (=अपि च) अभिष्टिमत् (=अभ्येषणयुक्तम्=आभिमुख्येन प्राप्तव्यम्=अत्यायासेन विनैव प्राप्तव्यं) [भवति] यद्, वि-

१०. आणि हे नासत्य हो, तुम्ही म्हाताऱ्या च्यवनाच्या आंगावरून कवचाप्रमाणें म्हातारपण काढून घेतलें. हे पराक्रमशाली [अश्वी] हो, तुम्ही अनाथ [च्यवना]चें आयुष्य वाढविते झालां [आणि] [त्याला] एकाएकीं तरूण मुलींचा पति करिते झालां.

१०. And, O Nâsatyas, you stripped age-worn Chyavana of his old age as though of a coat. O achievers of brave deeds, you prolonged the life of forlorn Chyavana, and immediately made him the husband of young girls.

११. हे शूर नासत्य हो, जाणत्या पुरुषांनीं निधीला [काढिल्या]प्रमाणें दृष्टीस पडणाऱ्या [कूपा]पासून अदृश्य अशा रीतीनें लपविलेल्या वंदनाला तुम्ही जे वर काढिते झालां, तो तुमचा स्तुत्य [आणि] वांछनीय [आणि] सदय प्रसाद होय.

11. That, O brave As'vins, was your praiseworthy [and] desirable [and] gracious act of help that you, like experts [finding] buried treasure, took up from the visible [well] Vandana that lay concealed [in it].

---

१०. च्यवन म्हणून कोणी एक उपासक होता, तो म्हातारपणामुळें अगदी विगलितगात्र झाला आणि त्याला त्याच्या मुलांबाळांनीं आणि कुटुंबानें टाकून दिलें. तेव्हां त्याणें दुःखी होऊन अश्वींची स्तुति केल्यावरून त्यांनीं प्रसन्न होऊन त्याच्या आंगावरून जसा एकादा आंगरखा ओढून काढावा, तसें त्याचें म्हातारपण एकदम ओढून काढिलें, आणि त्याला तरूण करून तरूण स्त्रिया प्राप्त करून दिल्या अशी एक कथा आहे ती यांत सांगितली आहे.

‘ आयुष्य वाढविते झालां ’=‘ आयुः प्रातिरतम्.’ म्हणजे त्याला तारूण्य दिलें आणि पुष्कळ दिवस वांचविलें त्यामुळें अर्थात् त्याचें आयुष्य वाढविल्यासारखें झालें.

‘ तरूण मुलींचा पति ’=‘ कनीनां पतिम्.’ हें अनेकवचन लक्षांत ठेवण्यासारिखें आहे. यावरून एकाहून अधिक स्त्रिया करण्याची चाल वेदकाळीं होती असें अनुमान होतें.

११. वन्दन या नांवाचा एक भक्त असे त्याला अनार्य जनांनीं रानांत नेऊन एका जुन्या आणि खोल विहिरींत लोटून दिलें; तींतून त्याला बाहेर या-

तद्वां नरा सनये दंस उग्रमाविष्कृणोमि तन्यतुर्न वृष्टिम् ।
दध्यङ् ह यन्मध्वाथर्वणो वामश्वस्य शीर्ष्णा प्र यदीमुवाच ॥ १२

तत् । वाम् । नरा । सनये । दंसः । उग्रम् । आविः । कृणोमि । तन्यतुः । न । वृष्टिम् ।
दध्यङ् । ह । यत् । मधु । आथर्वणः । वाम् । अश्वस्य । शीर्ष्णा । प्र । यत् । ईम् । उवाच ॥ १२ ॥

---

द्वांसा निधिमिव ( =विद्वांसौ भूमौ निक्षिप्तं धनं यथा तत्स्थलं जानन्तौ निष्कासयतस्तथा.) [ विद्वांसा=विद्वांसौ जानन्तौ=वन्दनस्थानस्य ज्ञातारौ ] दर्शतात् (=दृश्यात्=दृष्टिगोचरात् ) [ कूपात् ] अपगूळ्हम् ( =" अरण्ये निर्जने देशे कूपमध्येऽसुरैर्निगूढं ") वन्दनाय ( =वन्दनम् एतन्नामकं कंचिद् उपासकम् ) उद् ऊपथुः ( =उन्निन्यथुः=उद्धृतवन्तौ ) ॥.

अत्र सायण एतामाख्यायिकां कथयति । वन्दनो नाम कश्चिदृषिः । स चासुरैः कूपे निखात उत्तरीतुमशक्नुवन्नश्विनावस्तौत् । तमश्विनौ कूपादुन्निन्यतुरिति ॥

---

## भाषायाम्.

१२. हे नरा ( =नरौ=शूरौ=अश्विनौ ), तन्यतुर्न वृष्टिम् ( =मेघमहानादो यथा जलवृष्टिमाविष्करोति सर्वत्र प्रकटयति तथा ) [ अहं ] तद् वाम् उग्रं दंसः ( =तद्वक्ष्यमाणं श्रेष्ठं युवयोः कर्म) सनये (=धनलाभाय) आविष्कृणोमि (=उच्चारेण प्रकटयामि ) यत् ह ( =यत् किल ) वाम् अश्वस्य शीर्ष्णा ( =युवाभ्यां संहितेन अश्वसंबन्धिना शिरसा ) आथर्वणो दध्यङ् ( =अथर्वणः पुत्रो दध्यङ्नाम कश्चिदुपासकः ) ईम् ( =युवाभ्यां ) मधु प्रोवाच ( =मधुविद्यां कथितवान् ) ॥

अत्र सायण एतामाख्यायिकामाह । इन्द्रो दधीचे प्रवर्ग्यविद्यां मधुविद्यां चोपदिश्य यदीमामन्यस्मै वक्ष्यसि शिरस्ते छेत्स्यामीत्युवाच । ततोऽश्विनावश्वस्य शिरश्छित्त्वा दधीचः शिरः प्रच्छिद्यान्यत्र निधाय तत्राश्व्यं शिरः प्रत्यधत्ताम् । तेन च दध्यङ् ऋचः सामानि यजूंषि च प्रवर्ग्यविषयाणि मधुविद्याप्रतिपादकं ब्राह्मणं चाश्विनावध्यापयामास । तदिन्द्रो ज्ञात्वा वज्रेण तच्छिरोऽच्छिनत् । अथाश्विनौ तस्य स्वकीयं मानुषं शिरः प्रत्यधत्तामिति शाट्यायनवाजसनेययोः प्रपञ्चेनोक्तम् इति ॥

१२. हे शूर [ अश्वी हो ], आथर्वण दध्यङ् तुम्ही लाविलेल्या घोड्याच्या डोक्यानें तुम्हांला मधु-[विद्या ] सांगता झाला हा तुमचा मोठा पराक्रम, मेघनाद वृष्टि [ प्रगट करितो] तसा, धनलाभार्थ मी प्रगट करितों.

12. As thunder sends forth showers, so I send forth, O brave [ As'vins ], that mighty exploit of yours for [ my ] benefit, that Dadhyanch the son of Atharvan, with your horse's head, declared to you the knowledge of the honey.

---

वयास येईना तेव्हां त्याणें अश्वींची स्तुति केल्यावरून त्यांनीं त्याची स्तुति ऐकून त्याला बाहेर काढिलें ' हा जो तुमचा प्रसाद तो अति स्तुत्य, वांछनीय आणि भक्तलभ्य होय.'

' निधीला '=' निधिम्.' म्हणजे जमिनींत पुरून ठेविलेला द्रव्याचा हांडा.

' वन्दनाला.' सू. ११२ मं.५ याजवरील टीप पहा.

' सदय '=' अभिष्टिमत्.' अक्षरशः अर्थ ' साहाय्यानें भरलेला;' म्हणजे भक्तांनीं मारलेली धांव ऐकतांच केलेला.

---

१२. या ऋचेंत आणखी एक अश्वींचा पराक्रम सांगून त्याविषयीं मेघगर्जनेप्रमाणें मी स्तोत्रघोष करितों असें ऋषि म्हणतो. पराक्रम हा कीं, अश्वींचा प्रसाद झाल्यामुळें दध्यङ् म्हणून कोणी एक उपासक अथर्व नांवाच्या उपासकाचा पुत्र असे त्याणें घोड्याच्या शिराच्या योगानें अश्वींला मधुविद्या सांगितली.

आतां ही मधुविद्या म्हणजे काय आणि तो घोड्याच्या तोंडानें कशी सांगितली आणि कोणाला कोणत्या प्रसंगीं, याविषयीं संहितेंत सविस्तर आणि स्पष्ट कथा कोठें आढळत नाहीं. परंतु 'शाट्यायन' आणि ' वाजसनेय ' या वेदोत्तरकालीन ग्रंथांमध्यें सांगितली आहे ती सायणांनीं आपल्या भाष्यांत उतरून घेतली आहे, ती सू. ८० मं. १६ याजवरील टीपेंत भा. २ पृष्ठ २६२ येथें आम्हीं लिहिली आहे ती पहा.

' मेघनाद ' इ०. या उपमेचें तात्पर्य इतकेंच दिसतें कीं, वादळ होतें आणि वृष्टि होत असते तेव्हां जसा मेघनाद मोठ्यानें होतो, तसा तुमच्या महापराक्रमाचा स्तोत्रघोष मी मोठ्यानें करितों.

अजोहवीन्नासत्या करा वां महे यामन्पुरुभुजा पुरंधिः ।
श्रुतं तच्छासुरिव वध्रिमत्या हिरण्यहस्तमश्विनावदत्तम् ॥ १३ ॥

अजोहवीत् । नासत्या । करा । वाम् । महे । यामन् । पुरुऽभुजा । पुरम्ऽधिः ।
श्रुतम् । तत् । शासुःऽइव । वध्रिऽमत्याः । हिरण्यऽहस्तम् । अश्विनौ । अदत्तम् ॥ १३ ॥

आस्नो वृकस्य वर्तिकामभीके युवं नरा नासत्यामुमुक्तम् ।
उतो कविं पुरुभुजा युवं ह कृपमाणमकृणुतं विचक्षे ॥ १४ ॥

आस्नः । वृकस्य । वर्तिकाम् । अभीके । युवम् । नरा । नासत्या । अमुमुक्तम् ।
उतो इति । कविम् । पुरुऽभुजा । युवम् । ह । कृपमाणम् । अकृणुतम् । विऽचक्षे ॥ १४ ॥

---

## भाषायाम्.

१३. हे नासत्या (=नासत्यावश्विनौ), हे पुरुभुजा (=पुरुभुजौ=पुरूणां बहूनां पालकौ), पुरंधिः (=बहुप्रज्ञा) [वध्रिमती] महे यामन् (=महति यामनि=महति स्तोत्रे) करा (=करौ=पराक्रमकर्मकर्तारौ) वां (=युवाम्) अजोहवीत् (=पुनः पुनः स्तुत्वा आहूतवती)। वध्रिमत्याः (=एतन्नाम्न्याः कस्याश्चित् स्त्रियस्) तत् [आह्वानं] शासुरिव (=शासनमिव) श्रुतं (=युवामशृणुतम्) [अपि च] हे अश्विनौ, [युवां तस्यै] हिरण्यहस्तं [नाम पुत्रम्] अदत्तं (=प्रायच्छतम्)॥

अत्रेमामाख्यायिकां सायण आह। वध्रिमती नाम कस्यचिद्राजर्षेः पुत्री नपुंसकभर्तृका। सा पुत्रलाभार्थमश्विनावाजुहाव। तदाह्वानं श्रुत्वाश्विनावागत्य तस्यै हिरण्यहस्ताख्यं पुत्रं ददतुः। इति॥

१४. हे नरा नासत्या (= नरौ नासत्यौ=शूरावश्विनौ), युवं (=युवां) वृकस्य (=अरण्यशुनः) आस्नः (=आस्यात्=मुखात्) अभीके (=समीपे=साक्षाद्वृकस्य मुखात्) वर्तिकां (= चटकसदृशीं पक्षिणीम्) अमुमुक्तम् (=अमोचयतम्)। उतो (=अपि च) हे पुरुभुजा (=पुरुभुजौ=बहूनां पालकौ), युवं ह (=युवां खलु) कृपमाणं (=दृष्टिलाभार्थं स्तुवन्तं) कविम् (=एतन्नामानं कंचिदुपासकं) विचक्षे (=विशेषेण द्रष्टुं=स यथा स्पष्टं पश्येत् तथा) अकृणुतम् (=अकुरुतम्=लब्धदृष्टिमकुरुतम्)॥

१३. हे बहुपालक अश्वी हो, महापराक्रमी जे तुम्ही त्या तुम्हांला बुद्धिसंपन्न [वध्रिमती] मोठें स्तोत्र करून भजली. तें वध्रिमतीचें स्तोत्र तुम्ही आज्ञेप्रमाणें ऐकिते झालां, [आणि] हे अश्वी हो, तुम्ही तिला हिरण्यहस्त देते झालां.

१४. हे शूर नासत्य हो, तुम्ही चिमणीला लांडग्याच्या तोंडांतून सोडविते झालां. आणि हे बहुपालक [ अश्वी ] हो, तुम्ही स्तोत्र करणाऱ्या कवीला पहाण्याची शक्ति देते झालां.

13. O Nâsatyas, O defenders of many, the wise [ Vadhrimatî ] in a great hymn invoked you, the achievers of great deeds. That call of Vadhrimatî you heard like a mandate: As'vins, you conferred Hiraṇyahasta [ upon her ].

14. From the jaws of the wolf did you, O brave Nâsatyas, free the sparrow. And you, O defenders of many, made Kavi, who praised you, to see.

---

१३. यांत अश्वींचा आणखी एक पराक्रम वर्णिला आहे. तो हा कीं, त्यांनीं वध्रिमती म्हणून कोणी एक उपासक स्त्री होती तिला पुत्र नव्हता, तेव्हां अश्वींची उपासना केल्यावरून तिची ती उपासना ऐकून तिला हिरण्यहस्त या नांवाचा पुत्र दिला.

सायणाचार्य म्हणतात कीं, वध्रिमती ही एका राजाची कन्या होती आणि तिचा नवरा नपुंसक होता म्हणून तिणें पुत्रलाभार्थ अश्वींची उपासना केली त्यावरून तिला हिरण्यहस्त नांवाचा पुत्र दिला. वस्तुतः वध्रिमती ही कोणत्या राजाची मुलगी आणि तिचा नवरा कोण असे यांविषयीं कांहीं इतिहास ठाऊक नाहीं, मात्र वध्रिमती हें नांव ऋग्वेदांत चार पांच ठिकाणीं आलें आहे तेथें वध्रिमतीनें आह्वान ऐकून अश्वींनीं तिला हिरण्यहस्त म्हणून एक पुत्र दिला असें सांगितलें आहे. आतां तिचा नवरा नपुंसक होता ही कथा 'वध्रिमती' या नांवाच्या निर्वचनावरून निर्माण झाली असावी; कारण कीं, 'वध्रि' शब्दाचा अर्थ नपुंसक असा आहे.

'हिरण्यहस्त' हें नांव ऋग्वेदसंहितेंत दोनच वेळ आलें आहे. पण वध्रिमतीला हिरण्यहस्त हा पुत्र दिला याहून हिरण्यहस्ताविषयीं कांहीं इतिहास ठाऊक नाहीं.

१४. सू. ११२ मं. ८ याच्या उत्तरार्धांत जो अश्वींचा पराक्रम वर्णिला

चरित्रं हि वेरिवाच्छेदि पर्णमाजा खेलस्य परितक्म्यायाम् ।
सद्यो जङ्घामायसीं विश्पलायै धने हिते सर्तवे प्रत्यधत्तम् १५॥१०

चरित्रम् । हि । वेःइव । अच्छेदि । पर्णम् । आजा । खेलस्य । परिऽतक्म्यायाम् ।
सद्यः । जङ्घाम् । आयसीम् । विश्पलायै । धने । हिते । सर्तवे । प्रति । अधत्तम् ॥ १५ ॥ १० ॥

## भाषायाम्.

१५. [ हे अश्विनौ ], वेः पर्णम् इव ( =पक्षिणः पतत्रमिव ) [ विश्पलायाश् ] चरित्रं ( =चरणः=पाद ) आजा ( =आजौ=संग्रामे ) अच्छेदि ( =शत्रुभिश्छिन्नमभूत् ) । [ तथा सति ] परितक्म्यायाम् (=अन्त्यरात्रे ) खेलस्य (=एतन्नामकस्य राज्ञः पत्न्यै ) [ तस्यै ] विश्पलायै ( =एतदाख्यायै कस्यैचित् स्त्रियै ), धने हिते सर्तवे (=संग्रामे पुनरपि प्रसक्ते सति सर्तुं=संचाराय ), [ युवाम् ] आयसीं जङ्घां (=लोहमयं पादं ) सद्यः ( =शीघ्रं ) प्रत्यधत्तं ( =" संधानम् एकीकरणं कृतवन्तौ ") ॥

" अगस्त्यपुरोहितः खेलो नाम राजा । तस्य संबन्धिनी विश्पला नाम स्त्री संग्रामे शत्रुभिश्छिन्नपादासीत् । पुरोहितेनागस्त्येन स्तुतावश्विनौ रात्रावागत्यायोमयं पादं समधत्तां तदेतदाह " इति सायणः ॥

---

आहे तोच या मंत्राच्या पूर्वार्धांत सांगितला आहे. त्या मंत्रावरील टीप पहा. यास्क म्हणतात कीं ' वर्तिका ' म्हणजे उषा आणि 'वृक' (लांडगा) म्हणजे सूर्य असा लाक्षणिक अर्थ आहे; आणि सूर्य उषेला आपल्या तेजाच्या योगानें जणूं गिळून टाकितो इ०.

' कवीला '=' कविम्.' येथें ' कवि ' हें विशेषनाम आहे असें समजून आम्हीं भाषांतर केलें आहे. हा कवि म्हणजे कोण होता तें कळत नाहीं. उशना ऋषीला कवि अशी उपसंज्ञा पुष्कळ ठिकाणीं येत असते, तोच हा असेल की काय ? उशनाविषयीं सू. ५१ मं. १०

१५. [ हे अश्वी हो], पक्ष्याचा पंख तोडल्याप्रमाणें लढाईंत [ विश्पलेचा ] पाय तोडला गेला; [ तेव्हां ] पहांटेला त्या खेलाच्या विश्पलेला लोखंडाचा पाय [करून] पुनः युद्धांत संचार करण्यासाठीं तुम्ही एकाएकीं लाविते झालां.

15. [Her] foot, as is well known, was severed in battle like the wing of a bird: early in the morning did you, [O A'svins], at once substitute an iron foot for Vis'palâ of Khela that she might walk [again] at the time of battle.

याजवरील टीप पहा. सायणाचार्यांच्या छापील भाष्यांत प्रस्तुत मंत्राच्या उत्तरार्धाचें भाष्य नाहीं.

वृत्तसुखासाठीं दुसऱ्या चरणांत 'नासतिआमुमुक्तम्' असें म्हटलें पाहिजे.

१५. 'विश्पला' नांवाची एक शूर स्त्री 'खेल' या राजाची बायको असे. ती लढाईंत लढत असतां शत्रूंनीं तिचा पाय पांखराचा पंख तोडल्याप्रमाणें तोडला; तेव्हां तिला लोखंडाचा पाय करून अश्वींनीं जोडला आणि दुसऱ्या दिवसीं सकाळीं ती पुनः लढाईंत आपल्या पायांनीं चालूं सके असें केलें, अशी एक प्रसिद्ध कथा आहे ती या मंत्रांत सांगितली आहे. सू. ११२ मं. १० आणि त्याजवरील टीप पहा. अश्वींचे जे अनेक अद्भुत पराक्रम वेदांत जाणविले आहेत त्यांत त्यांनीं विश्पलेला लोखंडाचा पाय करून जोडला हा एक होय.

वृत्तसुखासाठीं दुसऱ्या चरणांत 'परितक्मिआयाम्' असें म्हटलें पाहिजे.

शतं मेषान्वृक्ये चक्षदानमृज्राश्वं तं पितान्धं चकार ।
तस्मा अक्षी नासत्या विचक्ष आधत्तं दस्रा भिषजावनर्वन् ॥१६

शतम् । मेषान् । वृक्यै । चक्षदानम् । ऋज्रऽअश्वम् । तम् । पिता । अन्धम् । चकार ।
तस्मै । अक्षी इति । नासत्या । विऽचक्षे । आ । अधत्तम् । दस्रा । भिषजौ । अनर्वन् ॥ १६ ॥

## भाषायाम्.

१६. वृक्ये (=वृकस्त्रियै) शतं (=शतसंख्याकान्) मेषान् चक्षदानं (=भक्षणार्थं शकलीकुर्वन्तं) तं (=प्रसिद्धम्) ऋज्राश्वम् (=एतन्नामकं कंचिदुपासकं) पिता (=तस्य ऋज्राश्वस्य पिता वृषागीः) अन्धं चकार (=विगतनयनं कृतवान्)। हे नासत्या (=नासत्यौ), हे दस्रा भिषजौ (=महाकर्मकारिणौ वैद्यभूतावश्विनौ), [युवां] तस्मै (=ऋज्राश्वाय) विचक्षे (=विविधं दर्शनाय=विविधं यथा पश्यति तथा) अनर्वन् अक्षी (=अप्रत्यृते=अप्रतिगते=अप्रतिहते अक्षिणी) आधत्तम् (=प्रायच्छतम्) ॥

अत्र सायण इमाम् आख्यायिकामाह । वृषागिरः पुत्र ऋज्राश्वो नाम राजर्षिः । तस्य समीपेऽश्विनोर्वाहनभूतो रासभो वृकीभूत्वावतस्थे । स च तस्या आहारार्थमेकोत्तरशतसंख्याकान् पौरजनानां स्वभूतान् मेषान् शकलीकृत्य प्रददौ । ऋज्राश्वः शतमेकं च मेषानिति मन्त्रान्तरे दर्शनात् । एवं पौराणामहिते प्रवृत्तं पिता शापेन नेत्रहीनमकरोत् । तेन स्तूयमानावश्विनावस्मद्वाहननिमित्तमस्यान्धता जातेति जानन्तौ तस्मा अक्षिणी प्रायच्छतामिति तदाह इति ॥

१६. शंभर मेंढे लांडगीला कापून घालणाऱ्या त्या ऋज्राश्वाला त्याच्या पित्यानें अंध केलें; [तेव्हां] हे पराक्रमी वैद्य नासत्य हो, तुम्ही त्याला दिसण्यासाठीं अप्रतिहत डोळे देते झालां.

16. Ṛijrâs'va who cut one hundred sheep for the she-wolf—his father made him blind. To him you gave, O brave physicians, O Nâsatyas, irresistible eyes for to see.

---

१६. ऋज्राश्व याच्या संबंधानें अश्वींनीं जो पराक्रम केला तो या ऋचेंत सांगितला आहे. ऋज्राश्व हा कोण होता याविषयीं सू. १०० मं. १६ यांजवर दिलेली टीप पहा.

ऋज्राश्वानें लांडगीकडून शंभर मेंढरीं खावविलीं आणि त्यामुळें त्याचे डोळे त्याच्या बापानें फोडिले; तेव्हां अश्वींनीं त्याला पुनः डोळे दिले इतकें ऋग्वेदसंहितेच्या मंत्रांवरून समजतें; बाकी शाप देऊन डोळे काढिले वगैरे कथा मागाहून लाविल्या असतील, कारण शाप देतांच डोळे जाणें इत्यादि अद्भुत चमत्कार होत असत अशा गोष्टी वेदाच्या वेळीं प्रसिद्ध असल्याप्रमाणें दिसत नाहींत, पुराणादिक वेदोत्तरकाळींच्या ग्रंथांत पुष्कळ आहेत.

'वैद्य'=' भिषजौ.' जसें 'रुद्र' या देवतेला वेदांत वैद्य म्हणतात आणि तो रोग बरे करितो आणि आरोग्य देतो असें सांगितलें आहे (सू. ११४ मं. ५ आणि त्याजवरील टीप पहा), तसेंच 'अश्वी' देवांलाहि 'वैद्य' (भिषजौ) असें म्हटलेलें आहे. ते रोग्याचे वैद्य होत असें सांगितलें आहे (ऋ. १०. ३९. ४). ऋ. ८. १८. ८ यांत त्यांस 'दैव्या भिषजा' असें म्हटलें आहे, पण त्याचा अर्थ देवांचे वैद्य असा नाहीं, देव असून वैद्य असा आहे. आणि अश्वी हे देवांचे वैद्य होत असें ऋग्वेदसंहितेंत आढळत नाहीं. वेदोत्तरकाळींचे जे ब्राह्मण, पुराणें इत्यादिक ग्रंथ यांत मात्र अश्वी हे देवांचे वैद्य होत, ते देवांस औषध देऊन बरे करितात वगैरे कथा आहेत त्या, अश्वींचें 'भिषज' हें जें विशेषण संहितेंत येतें त्याजवरून उत्पन्न झाल्या असाव्या.

'दिसण्यासाठीं अप्रतिहत डोळे देते झालां'=' अक्षी अनर्वन् विचक्षे आ अधत्तम्.' म्हणजे त्याला पुनः दृष्टि दिली आणि ती उत्तम अशी दिली, दिपणारी किंवा अर्धी अशी नव्हे.

वृत्तानुरोधानें पहिल्या चरणांत 'वृकिए,' दुसऱ्या चरणांत 'ऋज्राशुअं,' आणि तिसऱ्या चरणांत 'नासतिआ' असें म्हणावें लागतें.

**आ वां रथं दुहिता सूर्यस्य कार्ष्मेवातिष्ठदर्वता जयन्ती ।**
**विश्वे देवा अन्वमन्यन्त हृद्भिः समु श्रिया नासत्या सचेथे ॥१७**

आ । वाम् । रथम् । दुहिता । सूर्यस्य । कार्ष्मऽइव । अतिष्ठत् । अर्वता । जयन्ती ।
विश्वे । देवाः । अनु । अमन्यन्त । हृत्ऽभिः । सम् । ऊम् इति । श्रिया । नासत्या । सचेथे इति ॥ १७ ॥

---

## भाषायाम्.

१७. [ हे अश्विनौ ], सूर्यस्य दुहिता ( =सूर्या नाम सूर्यस्य कन्या ), अर्वता ( =अश्वेन ) [ आजिं ] जयन्ती कार्ष्मेव ( =यथा काचिद्योषिद् आज्यवधिम् ) [ आरोहति तथा ] वां ( =युवयो ) रथम् आ अतिष्ठत् ( =आरूढवती ) । [ तदानीं ] विश्वे देवाः ( =सर्वेपि देवा ) हृद्भिः ( =अन्तःकरणैः=सादरं यथा तथा ) अन्वमन्यन्त (=अन्वजानन्=सम्यकृतं साधुसाध्वित्यनुमोदनेन सहाब्रुवन् ) । [ तदा ] हे नासत्या ( =नासत्यौ=अश्विनौ ), [ युवां ] श्रिया ( =सूर्याप्राप्तिरूपया संपदा ) सम् उ सचेथे ( =संगच्छेथे=संगतौ भूतौ ) ॥

अत्र सायणः । सविता स्वदुहितरं सूर्याख्यां सोमाय राज्ञे प्रदातुमैच्छत् । तां सूर्यां सर्वे देवा वरयामासुः । तेऽन्योन्यमूचुः । आदित्यमवधिं कृत्वाजिं धावाम । योऽस्माकं मध्य उज्जेष्यति तस्येयं भविष्यतीति । तत्राश्विनावुदजयताम् । सा च सूर्या जितवतोस्तयो रथमारुरोह । अत्र प्रजापतिर्वै सोमाय राज्ञे दुहितरं प्रायच्छदित्यादिकं ब्राह्मणमनुसंधेयम् । इदं चाख्यानं सूर्याविवाहस्य स्तावकेन सत्येनोत्तभिता भूमिरिति सूक्तेन विस्पष्टयिष्यते । हे अश्विनौ वां युवयो रथं कार्ष्मेव । कार्ष्मशब्दः काष्ठवाची । यथा काष्ठमाजिधावनस्यावधितया निर्दिष्टं लक्ष्यमाशुगामी कश्चित्सर्वेभ्यो धावद्भ्यः पूर्वं प्राप्नोति । एवमेव सर्वेभ्यो देवेभ्यः पूर्वमर्वता शीघ्रमवधिं प्राप्नुवता युष्मदीयेनाश्वेन करणभूतेन युवाभ्यां जयन्ती जीयमाना सूर्यस्य सवितुर्दुहितातिष्ठत् । आरूढवती । विश्वे सर्व इतरे देवा एतदारोहणस्थानं हृद्भिर्हृदयैरन्वमन्यन्त । अन्वजानन् । तदानीं हे नासत्यावश्विनौ श्रिया ऋक्सहस्रलाभरूपया संपदा कान्त्या वा युवां संसचेथे । संगच्छेथे । इति ॥

१७. हे अश्वी हो, सूर्याची कन्या, वारूच्या योगानें [शर्यतींत] जय पावून अवधिकाष्ठावर [ चढल्या]प्रमाणें तुमच्या रथावर चढून बसली. [ तेव्हां ] सकळ देवांनीं अंत:करणापासून अनुमोदन दिलें; [ आणि ] हे नासत्य हो, [तुम्ही] भाग्याप्रत पावलां.

17. The daughter of Sûrya ( the sun ) mounted your car, as though she [ mounted ] the goal winning [ it ] with a race-horse. All the gods heartily consented. [ Then ] O Nâsatyas, [ you] attained good fortune.

१७. ब्राह्मणें, पुराणें इ० वेदोत्तर ग्रंथांत अशी कथा आहे कीं सूर्य अथवा सविता याची रूपवती कन्या 'सूर्या' या नांवाची होती. तिचें लग्न सोमाशीं करून द्यावें असें सूर्यानें मनांत आणिलें. तेव्हां सर्वच देव म्हणाले, हिला मी वरीन, हिला मी वरीन, तेव्हां त्यांनीं अशी तोड काढिली कीं आपण सर्वांनीं शर्यत ( आजि ) खेळावी, आणि जो सर्वांच्या पुढें धांवून जाईल त्याणें सूर्येला आपली स्त्री करावी. शर्यतींत अश्वी देव सर्वांच्या पुढें गेले, तेव्हां सूर्या अश्वींच्या रथावर जाऊन बसली. त्या कथेला अनुलक्षून सायणांनीं या ऋचेचा अर्थ केला आहे, तो आम्हीं भाषेंत उतरून घेतला आहे. आमचें भाषांतर त्याला अनुसरूनच आहे, मात्र दुसऱ्या चरणांतील उपमेचा अर्थ आम्हीं शब्दार्थास आणि सरळ अन्वयास राखून केला आहे.

या ऋचेवरून आणि ऋग्वेदांतील दुसऱ्या अनेक मंत्रांवरून असें दिसतें कीं वेदकाळीं आर्य लोक शर्यती खेळण्याविषयीं फार लंपट असत, आणि घोड्यावर बसणें, घोड्याची गाडी हांकणें यांविषयीं, जशी नलादिक वेदोत्तरकालीन राजांची आसक्ति फार असे तशीच अतिप्राचीन आर्य लोकांचीहि असे.

'जय पावून '=' जयन्ती.' सायणाचार्य 'अश्वींनीं जिंकली जाऊन' असें म्हणतात.

'अवधिकाष्ट '=' काष्मं.' म्हणजे ज्या ठिकाणापर्यंत धांवावयाचें तेथें एक लांकूड लावून ठेविलेलें असतें तें.

'अनुमोदन दिलें '=' अन्वमन्यन्त.' म्हणजे आतां ही अश्वींची स्त्री झाली, हिला त्यांच्या रथांत बसूं दे.

वृत्तानुरोधानें प्रथम पादांत 'सूरिअस ' आणि चवथ्या चरणांत 'नासतिआ ' असें म्हटलें पाहिजे.

**यदयातं दिवोदासाय वर्तिर्भरद्वाजायाश्विना हयन्ता ।**
**रेवदुवाह सचनो रथो वां वृषभश्च शिंशुमारश्च युक्ता ॥ १८ ॥**

यत् । अयातम् । दिवःऽदासाय । वर्तिः । भरत्ऽवाजाय । अश्विना । हयन्ता ।
रेवत् । उवाह । सचनः । रथः । वाम् । वृषभः । च । शिंशुमारः । च । युक्ता ॥ १८ ॥

**रयिं सुक्षत्रं स्वपत्यमायुः सुवीर्यं नासत्या वहन्ता ।**
**आ जह्नावीं समनसोप वाजैस्त्रिरह्नो भागं दधतीमयातम् ॥१९॥**

रयिम् । सुऽक्षत्रम् । सुऽअपत्यम् । आयुः । सुऽवीर्यम् । नासत्या । वहन्ता ।
आ । जह्नावीम् । सऽमनसा । उप । वाजैः । त्रिः । अह्नः । भागम् । दधतीम् । अयातम् ॥ १९ ॥

## भाषायाम्.

१८. हे अश्विना (=अश्विनौ), यद् (=यदा) [ युवां ] हयन्ता (=हयन्तौ=प्रीणयन्तौ=हितैषिणौ सन्तौ) भरद्वाजाय दिवोदासाय वर्तिः अयातं (=वाजं हविरन्नं बिभ्रते=यजमानाय दिवोदासाय नाम ऋषये=दिवोदासस्य गृहं प्रति अगच्छतं) [ तदानीं ] वां (=युवयोः) सचनः (=सेवनो=दयालू) रथो रेवत् (=धनम्) उवाह (=आनीतवान्) [ अपि च तस्मिन् रथे ] वृषभश्च शिंशुमारश्च (=अनड्वान् ग्राहश्चेत्येतौ) युक्ता (=युक्तावास्ताम्) ॥

हयन्तेत्यत्र हयन्ता स्तुतिभिराहूयमानाविति सायणः ॥

१९. हे नासत्या (=नासत्यौ), वाजैः (=हविरन्नैः) अह्नो भागं त्रिर्दधतीं (=दिवसस्य आहुतिं त्रिषु कालेषु धारयन्तीं=प्रतिदिनं त्रिराहुतिमर्पयन्तीं) जह्नावीम् उप (=जह्नोर्नाम कस्यचित् पुरुषस्य प्रजां प्रति) [ युवां ] सुक्षत्रं रयिं (=शोभनबलयुक्तं धनं) स्वपत्यम् आयुः (=शोभनसंततियुक्तम् आयुष्यम्) [ अपि च ] सुवीर्यं (=शोभनवीर्यम्=उत्तमं शौर्यं) वहन्ता (=वहन्तौ=आनयन्तौ) समनसा (=समानमनस्कौ) आ अयातम् (=आगच्छतम्) ॥

१८. हे अश्वी हो, तुम्ही जेव्हां यजक दिवोदासाच्या घरीं प्रीतीनें आलां तेव्हां तुमच्या दयाळू रथानें द्रव्य वाहून आणिलें, [आणि] त्या रथाला बैल आणि सुसर हीं दोनीहि जोडलीं होतीं.

18. When, O As'vins, you came lovingly to the house of Divodâsa the sacrificer, your dear chariot bore wealth in it: both the bull and the crocodile were yoked to it.

१९. हे नासत्य हो, हवींच्या योगेंकरून दिवसाला तीन वेळ तुम्हांला आहुति देणारें जें जह्नूचें कुळ त्याजप्रत तुम्ही उत्तम बलयुक्त संपत्ति, उत्तम संततियुक्त दीर्घायुष्य [ आणि ] उत्तम शौर्य हीं घेऊन एका मनानें येते झालां.

19. O Nâsatyas, to the posterity of Jahnu, who offered oblation thrice daily with food, you did come with one mind, bringing with you wealth accompanied by excellent power, long life accompanied by excellent progeny, [and] excellent prowess.

१८. यांत अश्वींविषयीं हा पराक्रम सांगितला आहे कीं, दिवोदास म्हणून जो एक अति प्रसिद्ध महाभक्त असे त्याचे घरीं अश्वींनीं प्रसन्न होऊन रथांत बसून आगमन केलें तेव्हां त्यांनीं दिवोदासाला देण्याकरितां पुष्कळ द्रव्य आणिलें, आणि त्या वेळीं त्यांच्या रथाला सुसर आणि बैल असे जोडिले होते.

‘ यजक ’=‘ भरद्वाजाय.’ म्हणजे हातांत हवि घेऊन तें अश्वींला अर्पण करणारा.

‘ बैल आणि सुसर ’=‘ वृषभश्च शिंशुमारश्च.’ अश्वींच्या रथाला एकच गाढव जोडलेला असतो असें अन्यत्र आलें आहे. जसा महादेवाला बैल प्रिय, विष्णूला गरूड प्रिय, गणपतीला उंदीर प्रिय, त्याप्रमाणेंच वैदिक अश्वींला गाढव, बैल आणि सुसर हे प्रिय होत.

‘ दिवोदास.’ सू. ११२ मं. १४ याजवरील टीप पहा.

१९. जह्नु म्हणून कोणीएक भक्त असे त्याच्या पुत्रपौत्रांनीं अश्वींची आराधना नित्य तीन वेळ हवि देऊन केली तेव्हां अश्वी प्रसन्न होऊन त्यांनीं त्यांस धन, अधिकार, चांगलीं मुलें बाळें, दीर्घायुष्य, आणि शौर्य हीं दिलीं अशी प्रसिद्धि असलेली या मंत्रांत सांगितली आहे.

परंतु ‘ जह्नु ’ हा कोण होता याविषयीं ऋग्वेदसंहितेंत कांहीं आढळत नाहीं. एक ‘ जह्नु ’ नांवाचा राजा पुराणांत

**परिविष्टं जाहुषं विश्वतः सीं सुगेभिर्नक्तमूहथू रजोभिः ।**
**विभिन्दुना नासत्या रथेन वि पर्वताँ अजरयू अयातम् ॥२०॥११॥**

परिऽविष्टम् । जाहुषम् । विश्वतः । सीम् । सुऽगेभिः । नक्तम् । ऊहथुः । रजःऽभिः ।
विऽभिन्दुना । नासत्या । रथेन । वि । पर्वतान् । अजरयू इति । अयातम् ॥ २० ॥ ११ ॥

**एकस्या वस्तोरावतं रणाय वशमश्विना सनये सहस्रा ।**
**निरहतं दुच्छुना इन्द्रवन्ता पृथुश्रवसो वृषणावरातीः ॥ २१ ॥**

एकस्याः । वस्तोः । आवतम् । रणाय । वशम् । अश्विना । सनये । सहस्रा ।
निः । अहतम् । दुच्छुनाः । इन्द्रऽवन्ता । पृथुऽश्रवसः । वृषणौ । अरातीः ॥ २१ ॥

---

## भाषायाम्.

२०. हे नासत्या (=नासत्यौ), विश्वतः सीं (=सर्वतः) परिविष्टं (=परिवेष्टितं) जाहुषं [नाम कंचित्प्रसिद्धमुपासकं] नक्तं (=रात्रौ) सुगेभी रजोभिः (=अनायासेन गन्तव्यैर्मार्गैः) ऊहथुः (=निर्गमितवन्तौ=बहिर्नीतवन्तौ)। अजरयू (=जरारहितौ=नित्यतरुणौ) [युवां] विभिन्दुना [युवयो] रथेन (=विशेषेण भेदकेन रथेन) पर्वतान् वि अयातं (=पर्वतान् विभिद्य गतवन्तौ)॥

जाहुषो नाम कश्चिद्राजा । तं शत्रुभिः परिवृतं सन्तमश्विनौ शत्रुसमूहान्निरगमयतामिति सायणः ॥

२१. हे अश्विना (=अश्विनौ), [युवां] वशम् (=एतन्नामानं कंचिदुपासकम्) एकस्या वस्तोः (=एकस्मिन्नहनि) रणाय (=रतये=स आनन्दितो यथा भवेत्तथा) [अपि च] सहस्रा सनये (=सहस्राणि सनितुं=सहस्राणि धनानि लब्धुं=सहस्रसंख्याकं धनं स यथा लभेत तथा) आवतम् (=अरक्षतम्)। हे वृषणौ (=वीर्यवन्तावश्विनौ), इन्द्रवन्ता (=इन्द्रवन्तौ=इन्द्रेण युक्तौ) [युवां] पृथुश्रवसः (=एतन्नामकस्य कस्यचिदुपासकस्य=“कानीतस्य पृथुश्रवःसंज्ञस्य राज्ञो”) दुच्छुनाः (=दुःखस्य कर्तॄन्) अरातीः (=शत्रून्) निरहतं (=नितरां हतवन्तौ)॥

| | रु. आ. पै. |
|---|---|
| रा. सा. श्रीधर गणेश जीनशीवाले.... .... .... | १२-१२-० |
| ,, बाबाजी लक्ष्मण सावत, सब जज्ज. .... .... | १२-१२-० |
| रा. रा. शंकरराव व्यंकटेश वकील.... .... .... | ६-१२-० |
| ,, बाळकृष्ण हरी हेगडे..... .... .... .... | ६- ०-० |
| ,, विठ्ठल नारायण पाठक.... .... .... .... | ६- ६-० |
| ,, वामन केशव भट.... .... .... .... .... | १२-१२-० |
| ,, नारायण वल्लाळ ओक. . .... .... .... | १२-१२-० |
| ,, येसाबा दादाजी मुंबई .... .... .... .... | ६- ०-० |
| ,, भास्कर हरी भागवत मुंबई. .... .... .... | ६- ०-० |
| ,, केशवराव वासुदेव मुंबई.... .... .... .... | ६- ०-० |
| ,, आत्माराम बापू दळवी मुंबई. .... .... .... | ६- ०-० |
| ,, जनार्दन गोपाळ दांडेकर. .... .... .... | ०-१०-६ |
| ,, अंताजी केशव कार्ले..... .... .... .... | ६- ६-० |
| जमसेटजी एन. ऊनवाला..... .... .... .... | १२-१२-० |
| शेट मथुरादास लवजी........ .... .... .... | १२- ०-० |

Registered No. 110 of 1878.

# NOTICE.

The second Volume of the Vedârthayatna will be finished with the last hymn ( 121 ) of the first Ashṭaka of the Rigveda Samhitâ, that is, in about two or three more parts.

# विशेष सूचना.

पहिल्या अष्टकाचे शेवटील सूक्त ( १२१ ) संपलें म्हणजे सुमारें आणखी २ किंवा ३ अंक झाले म्हणजे हा वेदार्थयत्नाचा दुसरा भाग संपेल.

# सूचना.

| | रु. | आ. |
|---|---|---|
| वर्षाची वर्गणी, आगाऊ | ६ | ० |
| मुंबईबाहेर राहणारांस टपाल हंशिलाबद्दल दरवर्षाचे | ० | ६ |

All communications to be addressed to the Manager Mr. Mahâdev Nârâyan Pandit, No. 29 *Moroba Popatji's Oart, Kalka Devi Road, Bombay.*

ग्रंथकर्त्याच्या नावचा वगैरे सर्व प्रकारचा पत्रव्यवहार मुंबई मोरोबा पोपटजीची वाडी घर नंबर २९, या पत्त्यावर रा. रा. महादेव नारायण पंडित "म्यानेजर वेदार्थयत्न" यांच्याशीं ठेवावा.

**विशेष सूचना.**—आमच्या कितीएक वर्गणीदारांकडे गेल्या वर्षाचीं बाकी येणें आहे ती त्यांणीं मेहेरबानी करून लवकर पाठवून द्यावी. बाकीचा उलगडा झाल्याविना अंक पाठविण्याचें बंद करण्यांत येणार नाहीं.

तिकिटें पाठविणें झाल्यास अर्ध्या आण्याच्या दराचीं असून दर रुपयास अर्धा आणा वर्तावळा असावा. नाटपेड पत्र घेतलें जाणार नाहीं.

THE

# VEDÂRTHAYATNA

OR

## AN ATTEMPT TO INTERPRET THE VEDAS.

---

# वेदार्थयत्न.

---

## ऋग्वेदसंहिता

पदांसहित व

तिचें मराठी आणि इंग्रजी भाषांतर.

पुस्तक २. अंक १५. आगष्ट सन १८७८.      मासिक भाग २९.
Vol II      Augt 1878      No. 29

मुंबईः
"निर्णयसागर" छापखान्यांत छापिलें.

माझे

# सर्व आर्य बंधु व भगिनी

यांस

हें भाषांतर

सादर समर्पण केलें आहे.

भाषांतरकर्ता.

२०. [ हे नासत्य हो ], सर्व बाजूंनीं वेष्टिलेला [ जो ] जाहुष [ त्या]ला तुम्ही रात्रीच्या वेळीं चांगल्या मार्गांनीं [ बाहेर ] नेते झालां. हे नासत्य हो, अजरापीडित असे जे तुम्ही [ ते ] अतिशयेंकरून भेदक [ अशा तुमच्या ] रथाच्या योगानें पर्वतांचे पर्वत भेदून बाहेर पडलां.

20. You drove at night [ in your car ] along easy paths Jâhusha [ who was ] surrounded on all sides. With [ your ] very penetrating car, O Nâsatyas, you, never growing old, drove through the mountains.

२१. हे अश्वी हो, तुम्ही वशावर प्रसाद करून त्याला एका दिवसीं आनंदासहित सहस्रावधि द्रव्य मिळवून देते झालां. हे वीर्यवंत [ अश्वी ] हो, तुम्ही इंद्राला बरोबर घेऊन पृथुश्रव्याचे उपद्रवकारक शत्रु मारून टाकिते झालां.

21. You, O As'vins, favoured Vas'a that he might obtain with delight on one day a thousandfold wealth. You accompanied by Indra, O puissant As'vins, slew the noxious enemies of Prithus'ravas.

---

प्रसिद्ध आहे, परंतु हा कोण आणि त्याचा संबंध या मंत्रांतील लोकांच्या कुळपुरुषाशीं कांहीं आहे कीं नाहीं तें समजत नाहीं.

‘एका मनानें’=‘समनसा.’ म्हणजे दोघेहि अश्वी एकच सुप्रसन्नतेचा अभिप्राय मनांत धरून.

वृत्तासाठीं प्रथम पादांत ‘सुअपत्यमायुः,’ आणि द्वितीय पादांत ‘सुवीरिअं नासतिआ वहन्ता’ असें म्हटलें पाहिजे.

---

२०. ‘जाहुष’ या नांवाचा एक राजा. त्याला शत्रूंनीं सर्व बाजूंनीं वेष्टिलें असतां अश्वींनीं त्याला आपल्या रथांत घालून मोठमोठे पर्वत चारी बाजूंनीं होते तरी त्यांच्या मधून आपला रथ हाकून उत्तम सपाट मार्गांनीं नेल्याप्रमाणें शत्रूंच्या व्यूहांतून बाहेर काढून नेलें हा एक अश्वींचा पराक्रम या मंत्रांत सांगितला आहे.

जाहुष राजाविषयीं दुसऱ्या एकच मंत्रांत ( ७. ७१. ५ यांत ) सांगितलें आहे, कीं त्याला त्याच्या शत्रूंनीं राज्यभ्रष्ट केला असतां अश्वींनीं पुनः राज्यपदापन्न केलें. याशिवाय दुसरा इतिहास कांहीं प्रसिद्ध नाहीं.

शरस्यं चिदार्चत्कस्यावतादा नीचादुच्चा चक्रथुः पातवे वाः ।
शयवे चिन्नासत्या शचीभिर्जसुरये स्तर्यं पिप्यथुर्गाम् ॥ २२ ॥

शरस्य । चित् । आर्चत्ऽकस्य । अवतात् । आ । नीचात् । उच्चा ।
चक्रथुः । पातवे । वारिति वाः ।
शयवे । चित् । नासत्या । शचीभिः । जसुरये । स्तर्यम् । पिप्यथुः ।
गाम् ॥ २२ ॥

## भाषायाम्.

२२. आर्चत्कस्य शरस्य चित् (=ऋचत्कनामकस्य पुत्रस्य शरनाम्नः कस्यचिदुपासकस्य) पातवे (=पानाय) [युवां] नीचाद् अवतात् (=नीचीनात् कूपात्) वाः (=उदकम्) उच्चा आ चक्रथुः (=उच्चैः कृतवन्तौ)। हे नासत्या (=नासत्यौ), [युवां] जसुरये शयवे चित् (=श्रान्ताय शयुनाम्ने कस्मैचिदुपासकाय) शचीभिः (=युवयोः कौशलकर्मभिः) स्तर्यं गां (=स्तरीं गां=विगतप्रसवां गां) पिप्यथुः (=पयसा पूरितवन्तौ) ॥

अत्र सायणः। आर्चत्कस्य ऋचत्कपुत्रस्य शरस्यैतत्संज्ञस्यापि स्तोतुः पिपासितस्य पातवे पानार्थं नीचान्नीचीनादवतात्कूपादुच्चा उच्चैरुपरिष्टाद्वारुदकं हे अश्विनौ युवामाचक्रथुः। आभिमुख्येन कृतवन्तौ। तथा हे नासत्यावश्विनौ शचीभिर्युष्मदीयैः कर्मभिः परिचरणैर्जसुरये श्रान्ताय शयवे चित् शयुनाम्ने ऋषये स्तर्यं निवृत्तप्रसवां गामग्निहोत्रार्थस्य पयसो दोग्ध्रीं पिप्यथुः। पयसा युवामापूरितवन्तौ ॥ इति ॥

'अतिशयेंकरून भेदक'='विभिन्दुना.' म्हणजे पर्वतांमधून, झाडांमधून इत्यादि पाहिजे त्या प्रदेशांतून उत्तम मार्गानें चालल्याप्रमाणें चालणारा.

वृत्तासाठीं तिसऱ्या चरणांत 'नासतिआ' असें वाचलें पाहिजे.

२१. यांत अश्वींचीं दोन पराक्रमकृत्यें सांगितलीं आहेत. एक हें कीं, त्यांनीं वश नांवाच्या उपासकावर प्रसाद केला आणि त्याला एका दिवसाला मोठा आनंद आणि एक हजार द्रव्य मिळे असें करून दिलें; आणि दुसरा हा कीं त्यांनीं इन्द्राला आपल्याबरोबर घेऊन पृथुश्रवा या नांवाच्या दुसऱ्या एका उपासकानें दुःखकारक शत्रु मारून टाकिले.

'वश.' हा कोण आहे त्याविषयीं सू. ११२ मं. १० आणि त्याजवरील टीप पहा. तेथें जें लिहिलें आहे त्याच्या संबंधानें असें सांगणें अवश्य दिसतें कीं

२२. [ तुम्हीं ] आर्चत्क शराला पिण्यासाठीं खोल कुव्यांतून पाणी वर काढिते झालां; हे नासत्य हो, श्रमलेल्या शयूसाठीं [तुम्ही आपल्या ] पराक्रमानें [ त्याची ] वांझ गाय दुधानें भरून देते झालां.

22. You raised up from the deep spring the water for Richatka's son S'ara to drink. And O Nâsatyas, you through your deeds filled the barren cow with milk for exhausted S'ayu.

'वश' याचें जें 'अश्व्य' असें आडनांव आढळतें तें वश हा अश्वींच्या प्रीतींतला होता म्हणून तसें आडनांव पडलें असावें.

'प्रसाद करून...आनंदानें सहस्रावधि द्रव्य मिळवून देते झालां'=' रणाय सनये सहस्रा आवतम्.' अक्षरशः अर्थ 'आनंदासाठीं आणि सहस्र [धनें] मिळण्यासाठीं प्रसाद करिते झालां' असा आहे. 'सनये' ही 'सनि' शब्दाची चतुर्थी तुमन्त अव्ययार्थी आहे. ( भाषा पहा ).

'पृथुश्रवा.' हा एक अश्वींचा भक्त, आणि देवांचा उपासक असे. त्याचें आडनांव 'कानीन' पण विशेष इतिहास कांहीं ठाऊक नाहीं. मात्र ऋ. ८. ४६. २४ यांत सांगितलें आहे कीं महा उदार कानीन पृथुश्रवा हा मोठीं दानें देत असे; त्यामुळें तो मोठा दाता आणि विद्वान् झाला, व त्याची मोठी कीर्ति झाली. आणि त्याच सूक्ताच्या २१ व्या मंत्रांत वश आणि पृथुश्रवा यांचीं नांवें एकत्र आलीं आहेत आणि पृथुश्रव्यानें वशाला धन दिलें असें जाणविलें आहे. प्रस्तुत मंत्रांत सांगितलेले पृथुश्रव्याचे दुःखकारक शत्रु ते कोण तें समजण्यास कांहीं आधार ऋग्वेदसंहितेंत दिसत नाहीं.

२२. या मंत्रांतहि अश्वींचे दोन पराक्रम वर्णिले आहेतः एक हा कीं, ऋचत्काचा पुत्र शर याला ताहान लागून तो व्याकूळ होऊन पडला असतां खोल कुव्यांतून अश्वींनीं पाणी काढून त्याला पाजिलें; आणि दुसरा हा कीं, शयु नांवाच्या उपासकाची गाय वांझ असताहि तिला अश्वींनीं दुधानें भरून तिचें दूध तो थकला होता तेव्हां त्याला पाजिलें.

'शर.' याच्या बापाचें नांव 'ऋचत्क' म्हणूनच त्याला 'आर्चत्क' असें आडनांव पडलें आहे. पण ऋचत्क अथवा शर यांविषयीं इतिहास कांहींच ठाऊक नाहीं. शर हें विशेषनाम ऋग्वेदसंहितेंत पुनः सायणाच्या भाष्याप्रमाणें तर ( ऋ. ८. ६९. १३. १४ ) आलेलें नाहीं.

**अवस्यते स्तुवते कृष्णियाय ऋजूयते नासत्या शचीभिः ।**
**पशुं न नष्टमिव दर्शनाय विष्णाप्वं ददथुर्विश्वकाय ॥ २३ ॥**

अवस्यते । स्तुवते । कृष्णियाय । ऋजुऽयते । नासत्या । शचीभिः ।
पशुम् । न । नष्टम्ऽइव । दर्शनाय । विष्णाप्वम् । ददथुः । विश्वऽकाय ॥ २३ ॥

**दश रात्रीरशिवेना नव द्यूनवनद्धं श्नथितमप्स्वन्तः ।**
**विप्रुतं रेभमुदनि प्रवृक्तमुन्निन्यथुः सोममिव स्रुवेण ॥ २४ ॥**

दश । रात्रीः । अशिवेन । नव । द्यून् । अवऽनद्धम् । श्नथितम् । अप्ऽसु । अन्तरिति ।
विऽप्रुतम् । रेभम् । उदनि । प्रऽवृक्तम् । उत् । निन्यथुः । सोमम्ऽइव । स्रुवेण ॥ २४ ॥

---

## भाषायाम्.

२३. हे नासत्या (=नासत्यौ), [युवाम्] अवस्यते (=रक्षणमात्मन इच्छते), स्तुवते (=स्तोत्रं कुर्वते), ऋजूयते (=आर्जवमिच्छते=ऋजु यथा तथा चरते) कृष्णियाय (=कृष्णस्य नाम कस्यचित् पुरुषस्य पुत्रभूताय) विश्वकाय (=एतन्नामकाय कस्मैचिदुपासकाय) शचीभिः (=युवयोः कौशलकर्मभिः) पशुं न नष्टमिव (=विनष्टं पशुमिव) विष्णाप्वं (=विष्णापूनामानं पुत्रं) दर्शनाय (=द्रष्टुं=यथा स पुनस्तं पश्येत्तथा) ददथुः (=दत्तवन्तौ) ॥

२४. [हे अश्विनौ), [युवाम्] अशिवेन ["दाम्ना"] (=अशुभेन=दुःखकारिणा पाशेन) अवनद्धं (=पाशबद्धम्) अप्सु अन्तः (=अपां मध्ये) दश रात्रीः नव द्यून् (=दशरात्रनवदिवसपर्यन्तं कालं) श्नथितं (=पीडितं) विप्रुतं (=विप्लुतम्=इतस्ततः सर्वत्र व्याक्षिप्तसर्वाङ्गम्) उदनि प्रवृक्तं (=उदकमध्ये संतप्यमानं) रेभम् (=एतन्नामकं कंचिदुपासकं) स्रुवेण सोममिव (=स्रुवेण यथा सोमं स्थालीमध्यात् कश्चिदध्वर्युरुन्नयति तद्वत्) उत् निन्यथुः (=उद्धृतवन्तौ) ॥

अत्र सायणः ।.पुरा खलु रेभमृषिं पाशैर्बद्ध्वासुराः कूपे कस्यचिद्दिवसस्य सायंकाले प्रचिक्षिपुः । स चाश्विनौ स्तुवन् दश रात्रीर्नवाहानि च कूपमध्ये तथैवावतस्थे दशमेऽहनि प्रातरश्विनौ तं कूपादुदतारयतामिति तदाह । अप्सु कूपान्तर्वर्तमाना-

२३. हे नासत्य हो, तुम्ही रक्षणेच्छू, स्तोत्र करणारा आणि सन्मार्गगामी अशा कृष्णिय विश्वकाप्रत चुकलेला पशु दिल्याप्रमाणें, आपल्या पराक्रमानें विष्णापूला [ आणून ] देऊन त्याचें पुनः दर्शन करविलें.

२४. [ हे अश्वी हो ], रेभाला अभद्र दोरीनें बांधून, मुटकून, पाण्यांत दहा रात्री आणि नऊ दिवसपर्यंत इकडे तिकडे फेकून कंठगतजीव करून ठेविला असतां, तुम्ही पळीनें सोम काढिल्याप्रमाणें त्याला वर काढिते झालां.

23. To Vis'vaka Krishniya, who was praying for [ your ] grace, who was praising [ you ], [and] who was righteous; you O Nâsatyas, gave through [your] deeds Vishnâpû to see [ again ] like a lost animal.

24. You, [O As'vins], raised, like Soma with the ladle Rebha, who, tied with the ominous [ tie ] and beaten in the waters for ten nights and nine days, was tossed about [ and ] distressed in the stream.

---

'शयु.' सू. ११२ मं. १६ आणि त्याजवरील टीप पहा.

वृत्तासाठीं तिसऱ्या चरणांत 'नासतिआ' असें आणि चवथ्यांत 'स्तरिअं' असें म्हणावें लागतें.

---

२३. यांत अश्वींचा असा पराक्रम सांगितला आहे कीं, कृष्ण या नांवाच्या मनुष्याचा पुत्र विश्वक म्हणून कोणी एक उपासक असे, त्याचा पुत्र हरवला तेव्हां त्याणें अश्वींची स्तुति केली आणि त्यांनीं प्रसन्न व्हावें म्हणून नम्रभावानें प्रार्थना केली; तेव्हां ते प्रसन्न झाले आणि चुकून गेलेलें गुरूं आणून द्यावें तसें त्याच्या मुलाला आणून देते झाले. त्या मुलाचें नांव विष्णापू असें होतें.

'कृष्ण' हा एक ऋषि असे. तो ऋ. ८. ८५, ८६, ८७ या तीन सूक्तांचा कर्ता अथवा द्रष्टा होय. हीं तीनहि सूक्तें अश्वींविषयीं आहेत. शिवाय, ऋ. १०. ४२, ४३, ४४ या सूक्तांचाहि तोच कर्ता होय, मात्र त्यांची देवता इंद्र होय. कृष्ण ऋषि अंगिरसकुळांतील असे. 'विश्वक' हा अश्वींचा भक्त असे. त्याचा मुलगा हरवला असतां त्याला अश्वींनीं परत आणून दिलें असें ऋग्वेदांत इतर ठिकाणींहि (११७. ७; १०. ६५. १२ यांत) सांगितलेलें आहे. याशि-

**प्र वां दंसांस्यश्विनाववोचमस्य पतिः स्यां सुगवः सुवीरः ।**
**उत पश्यन्नश्नुवन्दीर्घमायुरस्तमिवेज्जरिमाणं जगम्याम् ॥ २५ ॥ १२**

प्र । वाम् । दंसांसि । अश्विनौ । अवोचम् । अस्य । पतिः । स्याम् । सुऽगवः । सुऽवीरः ।
उत । पश्यन् । अश्नुवन् । दीर्घम् । आयुः । अस्तम्ऽइव । इत् । जरिमाणम् । जगम्याम् ॥ २५ ॥ १२ ॥

स्वन्तर्मध्येऽसुरैः पातितमशिवेन दुःखहेतुना दाम्नावनद्धं बद्धं श्रथितं शत्रुभिर्हिंसितं. दश रात्रीर्दशसंख्याका निशा नव द्यून् नवसंख्याकान्यहानि च । अत्यन्तसंयोगे द्वितीया. । एतावन्तं कालं तत्रैव कूपेऽवस्थितम् । अत एवोदन्युदके विप्रुतं विप्लुतं व्याक्षिप्तसर्वाङ्गम् । प्रवृक्तम् । लुप्तोपममेतत् । प्रवृजनेन संतप्तं घर्ममिव व्यथया संतप्यमानम् । एवंभूतं रेभं हे अश्विनौ युवामुन्निन्यथुः । तस्मात्कूपादुन्नीतमुत्तीर्णं कृतवन्तौ । तत्र दृष्टान्तः । सोममिव । यथाग्निहोत्रहोमार्थमभिषुतं सोमरसं कूपसदृशेऽग्निहोत्रस्थालीमध्ये वर्तमानं स्रुवेणाध्वर्युरुन्नयत्यूर्ध्वं नयति तद्वत् ॥

## भाषायाम्.

२५. हे अश्विनौ, [ अनेन प्रकारेण ] वां दंसांसि ( =युवयोः कर्माणि=युवाभ्यां पुरा कृतानि कर्माणि ) प्र अवोचं ( =अहं प्रोक्तवान् ) । [ अतः कारणात् ] सुगवः ( =शोभनाभिर्गोभिर्युक्तः ) सुवीरः ( =शोभनैर्वीरैश्च युक्तः ) [ सन्नहम् ] अस्य [ " राष्ट्रस " ] पतिः स्याम् ( =यथा पतिर्भवेयं तथा कुरुतम् ) उत ( =अपि च ) पश्यन् ( =अक्षिभ्यां पश्यन्=दृष्टिक्षमः सन् ) दीर्घम् आयुः अश्नुवन् ( =दीर्घमायुष्यं प्राप्नुवंश्च ) अस्तमित् ( =गृहमिव=यथा कश्चित् प्रेम्णा स्वगृहं प्रविशति तथैव ) जरिमाणं जगम्यां ( =जरां गच्छेयं=प्रविशेयम् ) ॥

वाय विश्वकाविषयीं विशेष कथा कांहीं ठाऊक नाहीं. ' विष्णापू ' हा विश्वकाचा पुत्र, आणि तो हरवला असतां त्याचा लाभ पुनः विश्वकाला अश्वींनीं करून दिला. याशिवाय त्याविषयीं विशेष कांहीं इतिहास ठाऊक नाहीं.

वृत्तासाठीं दुसऱ्या चरणांत ' नासतिआ ' आणि चवथ्यांत ' विष्णापुअं ' असें म्हणावें लागतें.

२४. रेभ म्हणून कोणीएक उपासक. त्याला दुष्टांनीं नऊ दिवस आणि दहा रात्रींपर्यंत बांधून पाण्यांत टाकून ठेविला असतां त्यावर अश्वींनीं कृपा करून त्याला बाहेर काढिलें हा अश्वींचा प्रसि-

२५. [ या प्रकारेंकरून ] हे अश्वी हो, तुमचे पराक्रम म्यां वर्णिले आहेत. [म्हणून] मी उत्तम गाईंसहित [ आणि ] उत्तम वीरांसहित या [राष्ट्रा]चा पति होईन असें करा. आणि मी डोळ्यांनीं चांगलें पहात असतां [आणि] दीर्घ आयुष्याचा उपभोग घेत असतां, घरांत शिरावें तसें म्हातारपणांत शिरेन असें करा.

25. [Thus] O As'vins, have I sung your deeds. May I, master of excellent cows and excellent heroes, be the lord of this [kingdom]; and may I, seeing with my eyes and enjoying a long life, enter into old age as into [my] home.

---

ह पराक्रम यांत सांगितला आहे.

'रेभ' याविषयीं सू. ११२ मं. ५ याजवरील टीप पहा.

'अभद्र [दोरीनें]'='अशिवेन.' कितीएक 'अशिवेन' म्हणजे राक्षसानें अथवा पिशाच्यानें असा अर्थ करितात. अभद्र शत्रु असा तरी अर्थ होण्यास काहीं अडचण दिसत नाहीं ( ऋ. १०. २३. ५ पहा ).

'पळीनें सोम काढिल्याप्रमाणें'='सोममिव स्रुवेण.' अनायासानें, इतकेंच या उपमेचें तात्पर्य दिसतें.

दुसऱ्या चरणांत 'अप्सु अन्तः' असें वृत्तासाठीं म्हणावें लागतें.

---

२५. हा या सूक्ताचा उपसंहार आहे. कक्षीवान् ऋषि म्हणतो, 'हे अश्वी हो, या प्रकारेंकरून मी तुमचे पराक्रम वर्णिले आहेत. आणि आतां शेवटीं अशी प्रार्थना आहे कीं, उत्तम गुरें ढोरें आणि पुत्रपौत्र, अनुचर भृत्य इत्यादिक उत्तम वीर मला प्राप्त होओत, आणि यांसहित मी आपल्या राष्ट्राचा नित्य धनी राहीन असें तुम्ही करा; आणि मला दीर्घायुष्य प्राप्त होओ, पण डोळे वगैरे इंद्रियें स्वाधीन राहोत आणि सुखानें म्हातारपण येओ, म्हणजे आपल्या घरांत शिरतांना जसा कोणा एकाद्याला आनंद होतो तसाच म्हातारपणाचा उपभोग घेण्यास आरंभ करणाऱ्या मला आनंद होईल, दुःख होणार नाहीं.'

यांतील कक्षीवान् ऋषीची प्रार्थना काय आहे त्यांजकडे वाचकांनीं लक्ष्य पुरवावें. तो मागतो ते वर ऐहिक असून साधारण मनुष्य सांप्रतकाळीं जे मागतात तसलेच आहेत. यावरून प्राचीन ऋषि स्वभावतः आम्हां दीन मर्त्यांसारिखेच होते, हजारो वर्षें जगणारे, सतत तरुण असणारे, महातपश्चर्येच्या

## सूक्तम् ११७.

उशिक्संज्ञायामङ्गराजस्य महिष्या दास्यां दीर्घतमसोत्पादितः
कक्षीवानृषिः । अश्विनौ देवता । त्रिष्टुप् छन्दः ॥

**मध्वः सोमस्याश्विना मदाय प्रत्नो होता विवासते वाम् ।**
**बर्हिष्मती रातिर्विश्रिता गीरिषा यातं नासत्योप वाजैः ॥ १ ॥**

मध्वः । सोमस्य । अश्विना । मदाय । प्रत्नः । होता । आ । विवासते । वाम् ।
बर्हिष्मती । रातिः । विऽश्रिता । गीः । इषा । यातम् । नासत्या । उप । वाजैः ॥ १ ॥

---

### भाषायाम्.

१. हे अश्विना (=अश्विनौ), [ अयं ] प्रत्नो होता (=प्राचीनो देवानामाह्वाता) मध्वः सोमस्य मदाय (=मधुरस्य सोमरसस्य हर्षाय=यथा युवामागत्य प्रार्पितस्य मधुरस्य सोमस्य पानेन जातहर्षौ भवेतं तथा) वां (=युवाम्) आ विवासते (=आविवासति=परिचरति)। रातिः (=हविरन्नं) बर्हिष्मती (=बर्हिषि स्थापिता) [ भवति ] । गीः (=स्तुतिः) विश्रिता (=विरचिता) [ भवति ]। [ अतः कारणात् ] हे नासत्या (=नासत्यौ), इषा वाजैः (=अस्मभ्यं दातव्येनान्नेन दातव्यैर्बलैश्च) उप यातम् (=आयातम्) ॥

---

योगानें गुरें ढोरें धनसंपत्ति पाहिजे ती उत्पन्न करणारे असे असत म्हणून पुराणादिकें आम्हांस सांगलात तसे नव्हते हें उघड आहे.

'या [ राष्ट्रा ]चा पति '=' अस्य पतिः.' सूक्तकर्ता कक्षीवान् ऋषि हा राजा असे हें ध्यानांत ठेविलें पाहिजे.

वृत्तासाठीं संहितापाठांत. ' दंसांसि अश्विनाववोचम् ' असें पहिल्या चरणांत वाचावें.

## सूक्त ११७.

ऋषि– पूर्वं सूक्ताचा जो कक्षीवान् तोच. देवता–अश्वी. वृत्त–त्रिष्टुभ्.

१. हे अश्वी हो, गोड सोमाचा तुम्हांला हर्ष व्हावा म्हणून हा जुना होता तुमची आराधना करीत आहे. [ तुम्हांकरितां ] हवि दर्भावर ठेविलें आहे [ आणि ] स्तोत्र रचून सिद्ध केलें आहे. [ तर ] हे नासत्य हो, तुम्ही [आम्हांकरितां ] अन्न [ आणि ] सामर्थ्य घेऊन या.

## Hymn 117.

To the *As'vins.* By *Kakshîvân* (same as the author of the previous hymn). Metre—*Trishtubh.*

1. This ancient invoker, O As'vins, is worshipping you that you may [ come and] be exhilarated with the sweet Soma. The oblation [ is ] placed on the Kus'a grass, [ and ] the hymn [ is ] composed. Come, O Nâsatyas, with food [and] power [ for us ].

---

१. हेंहि सूक्त कक्षीवान् ऋषीचेंच आहे आणि याचीहि देवता अश्वी देवच होत. कक्षीवान् म्हणतोः– 'हे अश्वी हो, मधुर सोम तुम्हांला अर्पण केला आहे, तो तुम्ही या आणि प्या; तुम्हांसाठीं हवि कुशांवर ठेविलें आहे आणि तुम्हांसाठीं स्तोत्र रचिलें आहे, तर हे अश्वी हो, तुम्ही आम्हांसाठीं अन्न आणि अनेक प्रकारचें सामर्थ्य घेऊन या.'

'गोड सोमाचा तुम्हांला हर्ष व्हावा म्हणून '=' मध्वः सोमस्य मदाय.' अक्षरशः अर्थ 'गोड सोमाच्या हर्षासाठीं' असा आहे.

वृत्तासाठीं पहिल्या पादांत 'सोमस्य अश्विना,' दुसऱ्या पादांत 'प्रत्नो होता विवआसते वाम्,' तिसऱ्यांत 'बर्हिष्मती राअतिः विश्रिता गीः' आणि चवथ्यांत 'नासतिओप वाजैः' असें वाचावें लागतें.

यो वा॒मश्वि॑ना॒ मन॑सो॒ जवी॑यान्र॒थः स्व॒श्वो॒ विश॑ आ॒जिगा॑ति ।
येन॒ गच्छ॑थः सु॒कृतो॑ दु॒रो॒णं तेन॑ नरा व॒र्तिर॒स्मभ्यं॑ यातम् ॥ २ ॥

यः । वा॒म् । अ॒श्विना । मन॑सः । जवी॑यान् । र॒थः । सु॒ऽअश्वः॑ । विशः॑ । आ॒ऽजिगा॑ति ।
येन॑ । गच्छ॑थः । सु॒ऽकृतः॑ । दु॒रो॒णम् । तेन॑ । न॒रा । व॒र्तिः । अ॒स्म॒भ्यम् । या॒तम् ॥ २ ॥

ऋषिं॑ नरा॒वंह॑सः॒ पाञ्च॑जन्यमृ॒बीसा॒दत्रिं॑ मुञ्चथो ग॒णेन॑ ।
मि॒नन्ता॒ दस्यो॒रशि॑वस्य मा॒या अ॑नुपू॒र्वं वृ॑षणा चो॒दय॑न्ता ॥ ३ ॥

ऋषि॑म् । न॒रौ । अंह॑सः । पाञ्च॑ऽजन्यम् । ऋ॒बीसा॑त् । अत्रि॑म् । मु॒ञ्च॒थः॒ । ग॒णेन॑ ।
मि॒नन्ता॑ । दस्योः॑ । अशि॑वस्य । मा॒याः । अ॒नु॒ऽपू॒र्वम् । वृ॒ष॒णा॒ । चो॒दय॑न्ता ॥ ३ ॥

---

## भाषायाम्.

२. हे अश्विना (=अश्विनौ), वां (=युवयोर्) यो मनसो जवीयान् (=शीघ्रतरः) स्वश्वः (=युक्तशोभनाश्वो) रथो विश आजिगाति (=प्रजाः=प्रजानां वसतीः प्रति गच्छति) [अपि च] येन [युवां] सुकृतो दुरोणं (=यागादिसदाचारान् आचरतो मनुष्यस्य गृहं) गच्छथः, नरा (=नरौ=हे शौर्योपेतौ देवौ), तेन [रथेन] अस्मभ्यं वर्तिर्यातम् (=अस्मदर्थं अस्माकं गृहं प्रति आगच्छतम्)॥

३. हे नरौ (=शूरावश्विनौ), हे वृषणा (=वृषणौ=सेचनसमर्थौ=वीर्योपेतौ देवौ), अशिवस्य दस्योः (=अकल्याणस्य=दुःखकारिणः शत्रोर्) मायाः (=अत्रौ प्रयुक्तानि कूटकर्माणि) अनुपूर्वम् (=आनुपूर्व्येण=प्रथममेकां ततोऽन्यामिति क्रमेण) चोदयन्ता (=चोदयन्तौ=निवारयन्तौ) [तथा कृत्वा च ता] मिनन्ता (=मिनन्तौ=हिंसन्तौ=नाशयन्तौ) [युवां] पाञ्चजन्यं (=पञ्चजनेभ्यो हितम्) अत्रिम् ऋषिम् (=अत्रिनामानं प्रख्यातं कंचिद् उपासकम्) अंहसः ऋबीसात् (=दुःखभूतात् तुषाग्नेः सकाशाद्) गणेन मुञ्चथः (=पुत्रपौत्रादीनां परिवारेण सह अमोचयतम्)॥

अत्र सायणः । हिमेनाग्निम् (१. ११६. ८) इत्यनयोक्त एवार्थः पुनः प्रकारान्तरेणानया प्रतिपाद्यते । अतस्तत्रोक्तं सर्वमत्रापि द्रष्टव्यम् । अक्षरार्थस्तु हे नरौ नेता-

२. हे अश्वी हो, तुमचा जो मनाहून शीघ्र [ आणि ] उत्तम घोडे जोडलेला रथ लोकवस्तींत शिरतो [ आणि ] ज्यांत बसून [ तुम्ही ] सदाचारी [ मनुष्या]-च्या घरीं जात असतां त्यांत बसून हे शूर [अश्वी हो], [ तुम्ही ] आमचे घरीं या.

३. हे शूर [ अश्वी ] हो, पांचंजन्य अत्रि ऋषीला तुम्ही महासंकटरूप तुषाग्नीपासून त्याच्या परिवारासहित मुक्त करिते झालां, आणि हे वीर्यवंत अश्वी हो, दुःखकारक शत्रूचीं कपटें एकामागून एक निवारून त्यांचा नाश करिते झालां.

2. In that chariot, O As'vins, [which is] swifter than fancy, which, drawn by excellent horses, enters the habitation of men, [ and ] in which you go to the house of the righteous [ man ], come you brave [ gods ] to our house.

3. You, O brave [As'vins ], liberated the sage Atri, dear to the five tribes, from the dangerous abyss, with all his followers; warding off [ and ] frustrating, O manly [ gods ], the schemes of the unholy enemy one after another.

२. 'सदाचारी '=' सुकृतः.' म्हणजे यज्ञयागादि कृत्यें देवांप्रीत्यर्थ करणारा.

वृत्तसुखासाठीं दुसऱ्या चरणांत ' रथो सुअश्वः' असें म्हणावें लागतें.

३. ' अत्रि ' या नांवाचा ऋषि असे त्याला दुष्ट जनांनीं ( सायणाप्रमाणें असुरांनीं ) त्रास देऊन काळोंखी खळग्यांत घालून विस्तव लावून मारण्याची युक्ति केली असतां अश्वींनीं त्याचा तो अग्नि शांत केला आणि त्याला मुक्त केलें असें सू. ११६ मं. ८ यांत सांगितलें आहे तीच कथा पुनः या ऋचेंत आणिली आहे.

' पांचजन्य '=' पाञ्चजन्यम्.' म्हणजे पांच प्रकारचे जे लोक त्यांस प्रिय. 'पांच प्रकारचे लोक ' याविषयीं सू. ८९ मं. १० याजवरील पृष्ठ ४०६ भाग १ येथील आमची टीप पहा.

अश्वं न गूळ्हमश्विना दुरेवैर्ऋषिं नरा वृषणा रेभमप्सु ।
सं तं रिणीथो विप्रुतं दंसोभिर्न वां जूर्यन्ति पूर्व्या कृतानि ॥ ४ ॥

अश्वम् । न । गूळ्हम् । अश्विना । दुःऽएवैः । ऋषिम् । नरा । वृषणा । रेभम् । अप्ऽसु ।
सम् । तम् । रिणीथः । विऽप्रुतम् । दंसःऽभिः । न । वाम् । जूर्यन्ति । पूर्व्या । कृतानि ॥ ४ ॥

---

रौ. वृषणा कामानां वर्षितारावश्विनौ पाञ्चजन्यम् । निषादपञ्चमाश्चत्वारो वर्णाः पञ्चजनाः । तेषु भवम् । स्वर्भानुना गृहीतममुं सूर्यं मोचयन्नत्रिः सर्वेषां हिताचरणात्तत्र भव इत्युच्यते । तादृशमृषिमंहसः पापरूपादृबीसात् शतद्वारे यन्त्रगृहेऽत्रेः पीडार्थमसुरैः प्रक्षिप्तात्तुषाग्नेः सकाशाद्गणेनेन्द्रियवर्गेण पुत्रपौत्रादिगणेन वा सह मुञ्चथः । अमोचयतम् । किं कुर्वन्तौ । मिनन्ता शत्रून् हिंसन्तौ दस्योरुपक्षपयितुरशिवस्य दुःखकारिणोऽसुरस्य संबन्धिनीस्तस्मिन्नत्रौ प्रयुक्ता मायाश्चानुपूर्वमानुपूर्व्येण चोदयन्ता प्रेरयन्तौ निवारयन्तौ । इति ॥

---

## भाषायाम्.

४. हे नरा (=नरौ=शौर्योपेतौ) वृषणा (=वृषणौ=वीर्योपेतौ) अश्विना (=अश्विनौ), दुरेवैः (=दुराचरणैः=" असुरैः ") अश्वं न (=अश्वमिव) अप्सु गूह्लम् (=उदकेषु निगूढं निखातं) विप्रुतं [च] (=विश्लिष्टावयवं च) तं रेभम् ऋषिं (=रेभनामकं तं स्तोतारं) दंसोभिः (=युवयोः प्रभावकर्मभिः) सं रिणीथः (=" समधत्तम् "=" सर्वैरवयवैरुपेतमकुरुतम् ") । वां (=युवयोः) पूर्व्या (=पूर्व्याणि=चिरंतनानि=पुरा कृतानि) कृतानि (=चरितानि) न जूर्यन्ति (=न जीर्णानि भवन्ति) ॥

४. हे वीर्यवंत शूर अश्वी हो, दुष्टांनीं घोड्याप्रमाणें रेभ ऋषीला पाण्यांत लोटून फाडून टाकिलें असतां त्याला तुम्ही आपल्या पराक्रमांनीं पुन: सांधिते झालां. तुमचीं पुरातन चरितें जुनीं होत नाहींत.

4. O As'vins, O brave [ and ] manly [ gods ], you through your miraculous deeds restored the sage Rebha [ who was ], like a horse, buried in the waters by the wicked [ ones ] [and was] distressed. Your ancient exploits do not become old.

---

४. 'रेभ' ऋषीला दुष्ट जनांनीं कूपांत लोटून देऊन फार पीडिलें तेव्हां त्याची तेथून अश्वींनीं मुक्ति केली असें पूर्वीं सू. ११२ मं. ५, सू. ११६ मं. २४ यांत दोनदा सांगितलें तेंच पुनः तिसऱ्यांनें येथें सांगतो, आणि म्हणतो कीं, 'हे अश्वी हो, तुमचीं हीं पुरातन चरितें कितीहि वेळ कथिलीं तरी तीं जुनीं होत नाहींत, ताजीं आणि नवीं असल्याप्रमाणेंच गोड लागतात, म्हणून मी पुनः वर्णीत आहें.

वृत्तासाठीं चवथ्या चरणांत ' पूर्विआ कृतानि ' असें वाचलें पाहिजे.

**सुषुप्वांसं न निर्ऋतेरुपस्थे सूर्यं न दस्रा तमसि क्षियन्तम् ।**
**शुभे रुक्मं न दर्शतं निखातमुदूपथुरश्विना वन्दनाय ॥ ५॥१३॥**

सुसुप्वांसम् । न । निःऽऋतेः । उपऽस्थे । सूर्यम् । न । दस्रा । तमसि । क्षियन्तम् ।
शुभे । रुक्मम् । न । दर्शतम् । निऽखातम् । उत् । ऊपथुः । अश्विना । वन्दनाय ॥ ५ ॥ १३ ॥

**तद्वां नरा शंस्यं पज्रियेण कक्षीवता नासत्या परिज्मन् ।**
**शफादश्वस्य वाजिनो जनाय शतं कुम्भाँ असिञ्चतं मधूनाम् ॥६॥**

तत् । वाम् । नरा । शंस्यम् । पज्रियेण । कक्षीवता । नासत्या । परिऽज्मन् ।
शफात् । अश्वस्य । वाजिनः । जनाय । शतम् । कुम्भान् । असिञ्चतम् । मधूनाम् ॥ ६ ॥

---

## भाषायाम्.

५. हे दस्रा अश्विना (=दस्रावश्विनौ=महाकर्माणावश्विनौ), [युवां] निर्ऋतेरुपस्थे (=मृत्युदेवताया उत्सङ्गे) सुषुप्वांसं न (=सुप्तवन्तं पुरुषमिव) [अथवा] तमसि क्षियन्तं सूर्यं न (=अन्धतमसि पतितं तत्र च निवसन्तं सूर्यमिव) [अथवा] निखातं दर्शतं रुक्मं न (=भूम्यां निगूढं रमणीयं सुवर्णमिव) वन्दनाय (=वन्दनम् ऋषिं) शुभे उद् ऊपथुः (=शोभनीय उद्धृतवन्तौ=युवाभ्याम् उद्धृतो यथा शोभेत तथाकुरुतम्) ॥

६. हे नरा नासत्या (=नरौ नासत्यौ=शूरौ नासत्यौ), तद् वां (=युवयोः) [कर्म] पज्रियेण कक्षीवता (=पज्रकुलोत्पन्नेन=आङ्गिरसेन कक्षीवता मया) परिज्मन् (=परिज्मनि=परितो गमने=यत्रकुत्रापि गमने सति=सर्वत्र) शंस्यं (=प्रकर्षेण स्तवनीयं) [भवति] [यद्] [युवां] जनाय (="अपेक्षमाणाय पुरुषाय"=उपासकजनार्थं मह्यं कक्षीवते?) मधूनां (=मद्यानां) शतं कुम्भान् (=शतसंख्याकान् घटान्) वाजिनः अश्वस्य शफात् (=वेगवतोऽश्वस्य खुरात्) असिञ्चतम् (=अक्षारयतम्=अवाहयतम्) ॥

परिज्मन्नित्यत्र परिगमनेऽभीष्टस्य प्रापणे निमित्तभूते सतीति सायणः ॥

५. हे पराक्रमी अश्वी हो, मृत्यूच्या मांडीवर निजलेल्या [ पुरुषा]सारिखा, अंधकारांत पडलेल्या सूर्यासारिखा, पुरून गेलेल्या देदीप्यमान सुवर्णासारिखा जो वन्दन त्याला तुम्ही वर काढून शोभविते झालां.

६. हे शूर नासत्य हो, हा तुमचा पराक्रम पज्रिय कक्षीवंतानें हिंडतां फिरतां वाखाणण्यास योग्य होय कीं, तुम्ही [ भक्त ]जनार्थे मद्याचे शंभर घडे वेगवंत घोड्याच्या खुरापासून वाहविते झालां.

5. Like a man lying asleep on the lap of Death; like the sun dwelling in the midst of darkness, like brilliant gold buried [under the earth], you raised Vandana, O mighty As'vins, and made him shine.

6. That your miracle, O manly Nâsatyas, deserves to be praised everywhere by Pajriya Kakshivân, [that] you caused to flow forth for the worshipper a hundred pitchers of wine from the hoof of [your] swift horse.

---

५. 'वन्दन' नांवाचा कोणीएक ऋषि होता त्याचा कूपांतून अश्वींनीं उद्धार केला असें सू. ११२ मं. ५ आणि सू. ११६ मं. ११ यांत सांगितलें आहे त्याच 'वन्दन' ऋषीविषयीं ही ऋचा आहे.

या ऋचेंतील उपमा चमत्कारिक आहेत. त्या सर्वांचें तात्पर्य असें दिसतें कीं, कोणी मनुष्य मृत्यूच्या मांडीवर निजला असतां त्याची जशी सुटका करावी, अथवा सूर्यासारिखा तेजस्वी गोल जर मोठा अंधारमय खाड्यांत पडला तर त्याची मोकळीक करावी तशी, अथवा एकादा सुंदर सोन्याचा दागिना मातींत पडून पुरला गेला तर तो जसा तेथून काढावा त्याप्रमाणें 'वन्दन' ऋषि कूपांत पडला असतां त्याची तेथून अश्वींनीं मुक्ति केली.

'जो वन्दन त्याला'='वन्दनाय.' ही चतुर्थी द्वितीयार्थी आहे. असें सायण म्हणतात. तसें घेतल्याशिवाय निर्वाह नाहीं. ( सू. ११६ मं. ११ याजवरील सायणभाष्य पहा ).

'वर काढून शोभविते झालां'='शुभे वन्दनाय उदूऊपथुः.' अक्षरशः 'शोभण्यासाठीं वर काढिते झालां.'

६. अश्वींनीं कोणा एका उपासकासाठीं आपल्या घोड्याच्या खुरापासून शंभर घागरी मद्य वाहविलें असें पूर्वीं सू. ११६ मं. ७ यांत सांगितलें आहे तीच गोष्ट पुनः यांत सांगतो.

युवं नरा स्तुवते कृष्णियाय विष्णाप्वं ददथुर्विश्वकाय ।
घोषायै चित्पितृषदे दुरोणे पतिं जूर्यन्त्या अश्विनावदत्तम् ॥ ७ ॥

युवम् । नरा । स्तुवते । कृष्णियाय । विष्णाप्वम् । ददथुः । विश्वकाय । घोषायै । चित् । पितृऽसदे । दुरोणे । पतिम् । जूर्यन्त्यै । अश्विनौ । अदत्तम् ॥ ७ ॥

---

## भाषायाम्.

७. हे नरा (=नरौ=शूरौ), युवं (=युवां) स्तुवते (=स्तोत्रं कुर्वते) कृष्णियाय विश्वकाय (=कृष्णपुत्राय विश्वकाय नामोपासकाय) विष्णाप्वं (=विष्णापूनामानं विनष्टं पुत्रं) ददथुः (=पुनरपि प्रापयामासथुः)। [अपि च] हे अश्विनौ, दुरोणे जूर्यन्त्यै (=मातापित्रोर्गृहे जरां प्राप्नुवत्यै) पितृषदे (=पितृसमीपे विवाहेन विनैव तिष्ठन्त्यै) घोषायै चित् (=घोषानाम्न्यै मम कन्याया अपि) पतिम् अदत्तं (=प्राप्तपतिकामकुरुतम्) ॥

घोषा नाम ब्रह्मवादिनी कक्षीवतो दुहिता। सा कुष्ठिनी सती कस्मैचिद्वरायादत्ता पितृगृहे विषण्णा जीर्णासीत्। साश्विनोरनुग्रहान्नष्टकुष्ठा सती पतिं लेभ इति सायणः ॥

---

'हिंडतां फिरतां'=' परिज्मन्.' म्हणजे जिकडे तिकडे आणि जेव्हां तेव्हां. सायणाचार्य किंचित् निराळा अर्थ करितात, पण आमचा अर्थ अक्षरशः आहे.

'पज्रिय कक्षीवन्तानें'=' पज्रियेण कक्षीवता.' 'पज्रिय' हें कक्षीवन्ताचें उपनांव, 'पज्रकुळांत झालेला' असा अर्थ. सू. ५१ मं. १४ आणि त्याजवरील टीपा पहा.

'[भक्त] जनार्थ'='जनाय.' हा कोण भक्त आणि कोणत्या प्रसंगीं अश्वींनीं हे दारूचे शंभर घडे घोड्याच्या खुरापासून काढिले तें समजत नाहीं. सू. ११६ मं. ७ आणि प्रस्तुतचा हे दोन्ही मंत्र पहातां कदाचित् सूक्तकर्ता कक्षीवान् याजकरितां हा आश्चर्यकारक पराक्रम केला असेल, असें समजलें तर 'जनाय' म्हणजे 'अस्मै जनाय=मह्यम्' असा अर्थ चांगला संभवतो. 'जन' शब्दाचा हा अर्थ आधुनिक संस्कृतांत तर प्रसिद्ध आहेच.

वृत्तसुखार्थ पहिल्या पादांत 'शंसिअं' आणि दुसऱ्यांत 'नासतिआ' असें वाचावें लागतें.

७. हे शूर [ अश्वी ] हो, स्तोत्र करणारा कृष्णाचा पुत्र विश्वक याला तुम्ही विष्णापूची प्राप्ति करून देते झालां, आणि हे अश्वी हो, बापाचे जवळ राहून माहेरीं म्हातारी होणारी घोषा इला तुम्ही नवरा मिळवून देते झालां.

7. You, O brave [ As'vins ], gave [ back ] Vishṇâpû to praying Vis'vaka the son of Krishṇa; to Ghoshâ also, [ who was ] living with [ her ] father [ and ] growing old in the home [of her parents], you, O As'vins, gave a husband.

---

७. विश्वकाचा पुत्र विष्णापू हा हरवला असतां त्याला आणून दिलें हें पूर्वी सू. ११६ मं. २३ यांत सांगितलेलें पुनः एथें सांगतो. दुसरा पराक्रम हा कीं, घोषा नांवाच्या स्त्रीला नवरा न मिळाल्यामुळें ती आपल्या माहेरींच राहून म्हातारी होत चालली होती तिला नवरा मिळे असें केलें.

सायणाचार्य सांगतात कीं घोषा ही कक्षीवन्ताचीच कन्या होय आणि ती ब्रह्मवादिनी ( म्हणजे ब्रह्मज्ञानी आणि ब्रह्मज्ञानाविषयीं उपदेश करणारी) असे, पण तिला कुष्ठ असल्यामुळें तिला नवरा मिळेना. तेव्हां तिणें अश्वींची आराधना केल्यामुळें तिचें कुष्ठ गेलें आणि मग तिला नवरा मिळाला.

वृत्तासाठीं दुसऱ्या पादांत ' विष्णापुअं ' असें वाचावें लागतें.

०२

युवं श्यावाय रुशतीमदत्तं महः क्षोणस्याश्विना कण्वाय ।
प्रवाच्यं तद्वृषणा कृतं वां यन्नार्षदाय श्रवो अध्यधत्तम् ॥ ८ ॥
युवम् । श्यावाय । रुशतीम् । अदत्तम् । महः । क्षोणस्य । अश्विना । कण्वाय ।
प्रऽवाच्यम् । तत् । वृषणा । कृतम् । वाम् । यत् । नार्सदाय । श्रवः । अधिऽअधत्तम् ॥ ८ ॥

## भाषायाम्.

८. युवं (=युवां) श्यावाय (="कुष्ठरोगेण श्यामवर्णाय"= एतन्नामकायर्षये) रुशतीम् अदत्तं (=दीप्तत्वचं स्त्रियं प्रायच्छतम्) [अपि च] हे अश्विना (=अश्विनौ), क्षोणस्य कण्वाय (=क्षोणाय कण्वाय =तमसि पतिताय कण्वाय नाम कस्मैचिदुपासकाय) महः (=तेजः=प्रकाशम्) [अदत्तम्], हे वृषणा (=वृषणौ=वीर्यवन्तावश्विनौ), तद्वां कृतं (=तद्वक्ष्यमाणं युवयोश्चरितं) प्रवाच्यं [भवति] यद् [युवां] नार्षदाय (=नृषत्पुत्राय कस्मैचित्पुरुषाय) श्रवः (=श्रवणशक्तिम्) अध्यधत्तम् (=अदत्तम्) ॥

क्षोणस्येत्यत्र सायण एवमाह । क्षोणस्य क्षोणाय दृष्टिराहित्येन गन्तुमशक्तायैकस्मिन्नेव स्थाने निवसते कण्वाय ऋषये * * * अपर आह । ब्राह्मण्यस्य परीक्षार्थमसुराः कण्वमृषिं गूढे तमसि निदधुः । अत्रैव स्थितः सन् व्युष्टामुषसं विजानीहि यदि त्वं ब्राह्मणोसीति । तमश्विनावागत्योचतुः । व्युष्टायां हर्म्यस्योपरि वीणां वादयन्तावावामागमिष्यावः । तं शब्दं श्रुत्वा व्युष्टामुषसं ब्रूहि । तदेतत्प्रतिपाद्यते । हे वृषणा कामानां वर्षितारावश्विनौ वां युवयोस्तत्कृतं कर्म प्रवाच्यं प्रशंसनीयम् । यन्नार्षदाय नृषत्पुत्राय कण्वाय क्षोणस्य । क्षोणः शब्दकारी वीणाविशेषः । महो महतः क्षोणस्य श्रवः शब्दमध्यधत्तम् । उषसो विज्ञानार्थमधिकमकुरुतम् । इति ॥

८. हे अश्वी हो, तुम्ही श्यावाला गोरी स्त्री देते झालां, [आणि] अंधारांत पडलेल्या कण्वाला प्रकाश देते झालां; हे वीर्यवंत [अश्वी] हो, हें तुमचें चरित वर्णन करण्यास योग्य [होय] कीं [तुम्हीं] नृषदाच्या मुलाला कान देते झालां.

8. You gave a fair [wife] to S'yâva; [you gave], O As'vins, light to Kaṇva confined in the dark. That your deed, O manly [As'vins], deserves to be praised, that you restored the sense of hearing to the son of Nrishad.

८. या ऋचेंत दुसरे तीन पराक्रम वर्णिले आहेतः १ अश्वींनीं श्याव म्हणून कोणी एक असे त्याला गोरी बायको मिळवून दिली, २ कण्व अंधारांत पडला असतां त्याला प्रकाश दिला, आणि ३ नृषद् नांवाच्या मनुष्याच्या मुलाला ऐकूं येई असें केलें.

सायण म्हणतात, श्याव म्हणजे कुष्ठरोगानें आंग काळें झालें होतें असा एक पुरुष होता त्याला गोरी स्त्री दिली. ऋ. १०. ६५. १२ यांत श्याव पुत्र वध्रिमतीला अश्वींनीं दिला असें सांगितलें आहे. पण या ठिकाणीं श्याव म्हणजे श्याव नांवाचा पुत्र असें नसेल, वध्रिमतीला दिलेल्या पुत्राचें नांव हिरण्यहस्त असें असे (. सू. ११६. मं. १३). कसेंहि असलें तरी याशिवाय दुसरा इतिहास श्यावाविषयीं समजण्यास साधनें नाहींत.

'कण्व.' हें नांव पूर्वीं पुष्कळ वेळ आलें आहे. पण या मंत्रांत सांगितलेला प्रसंग कोणता होय तें समजण्यास आधार नाहीं. 'क्षोणस्य कण्वाय' यांत "क्षोणस्य,' हें 'कण्वाय' याचें विशेषण सायणांनीं सांगितल्याप्रमाणें आहे यांत संशय नाहीं. आलीकडील संस्कृतांत तरी चतुर्थी आणि षष्ठी यांचा केव्हां केव्हां विनिमय होतो; मराठींत जशा द्वितीया आणि चतुर्थी ह्या विभक्त्या रूपानें आणि अर्थानें जवळ जवळ असल्यामुळें एकमेकांच्या ऐवजीं योजण्यांत येतात, तशाच चतुर्थी आणि षष्ठी यांची स्थिति संस्कृतांत आहे असें वाटतें.

'नृषदाच्या मुलाला'=' नार्षदाय.' हा नृषदाचा पुत्र म्हणजे कण्वच होय असें कोणी समजतात असें सायणांनीं उतरून घेतलेल्या कोणाएक भाष्यकाराच्या भाष्यावरून दिसतें; आणि ऋ. १०. ३१. ११ (उत कण्वं नृषदः पुत्रमाहुः) यावरून त्या समजुतीस बळकटी येते. 'नृषद्' हा कोण होता याविषयीं कांहीं इतिहास ठाऊक नाहीं,

**पुरू वर्पांस्यश्विना दधाना नि पेदव ऊहथुराशुमश्वम् ।**
**सहस्रसां वाजिनमप्रतीतमहिहनं श्रवस्यं१तरुत्रम् ॥ ९ ॥**

पुरु । वर्पांसि । अश्विना । दधाना । नि । पेदवे । ऊहथुः । आशुम् । अश्वम् ।
सहस्रऽसाम् । वाजिनम् । अप्रतिऽइतम् । अहिऽहनम् । श्रवस्यम् । तरुत्रम् ॥ ९ ॥

**एतानि वां श्रवस्या सुदानू ब्रह्माङ्गूषं सदनं रोदस्योः ।**
**यद्वां पज्रासो अश्विना हवन्ते यातमिषा च विदुषे च वाजम् ॥**
**॥ १० ॥ १४ ॥**

एतानि । वाम् । श्रवस्या । सुदानू इति सुऽदानू । ब्रह्म । आङ्गूषम् । सदनम् । रोदस्योः ।
यत् । वाम् । पज्रासः । अश्विना । हवन्ते । यातम् । इषा । च । विदुषे । च । वाजम् ॥ १० ॥ १४ ॥

---

## भाषायाम्.

९. हे अश्विना (=अश्विनौ), पुरू वर्पांसि (=पुरूणि वर्पांसि=बहूनि रूपाणि) दधाना (=दधानौ=धारयन्तौ) [ युवां ] पेदवे [ नाम कस्मैचिद्युवयोर्भक्ताय ] आशुं (=शीघ्रं) सहस्रसां (=सहस्रसंख्याकस्य धनस्य युद्धे जेतारं) वाजिनं (=बलवन्तम्) अप्रतीतम् (=शत्रुभिरप्रतिगतम्=अप्रतिहतम्) अहिहनं (=शत्रूणां हन्तारं) श्रवस्यं (=श्रवोयोग्यं=स्तुतियोग्यं=स्तवनीयं) तरुत्रं (=तरितारं=दुःखेभ्यः पालयितारम्) अश्वं नि ऊहथुः (=आनीय दत्तवन्तौ) ॥

१०. हे सुदानू (=शोभनदानौ) [ अश्विनौ ], एतानि (=समनन्तरोक्तानि) वां (=युवयोः) श्रवस्या (=श्रवस्यानि=श्रवणीयानि=स्तवनीयानि) [ चरितानि भवन्ति ] ब्रह्म (=उपासकैः कृतं स्तोत्रं) [ युवयोर् ] आङ्गूषं (=महिमकीर्तनं) [ भवति ] [ वां ] सदनं (=गृहं) रोदस्योः (=द्यावापृथिव्योर्मध्ये) [ भवति ] । हे अश्विना (=अश्विनौ), यद् (=यस्मात्) पज्रासः (=आङ्गिरसा) वां हवन्ते (=रक्षणार्थम् आह्वयन्ति) [ तस्मात् ] इषा च (=तेभ्यो दातव्येनान्नेन च) यातम् (=आयातं) विदुषे (=मह्यं कवये च) वाजं (=बलम्) [ आनयतम् ] ॥

९. हे अश्वी हो, अनेक रूपें धारण करणारे [ जे ] तुम्ही [ ते ] पेदूकारणें वेगवान्, सहस्रावधि लूट जिंकणारा, बळवान्, अप्रतिहत, शत्रूचा नाश करणारा, वर्णनीय [आणि] तारून नेणारा [ असा ] घोडा देते झालां.

९. You, O As'vins, who assume many forms, brought down and gave to Pedu a swift horse, able to win a thousand booties, powerful, irresistible, destructive of the enemy, fit to be praised [ and ] able to carry [ his rider ] through danger.

१०. हे महोदार [ अश्वी ] हो, अशा प्रकारचीं तुमचीं चरितें [होत]. [ भक्तांनीं केलेलें ] सूक्त [हें तुमचें] कीर्तिकथन [ होय ]. [तुमचें]घर द्यावापृथिवींत [आहे]. हे अश्वी हो, तुम्हांला पज्र जन ज्यापेक्षां बोलावीत आहेत [ त्यापेक्षां ] [ तुम्ही ] अन्नसंपत्ति घेऊन या आणि [ मज ] कवीला बळ घेऊन या.

10. These, O bounteous [ gods ], [ are ] your renowned [exploits]; a worshipper's hymn [ is your ] fame ; [ your ] home [ is ] in the Earth and Heaven. Since, O As'vins, the Pajras are invoking you, come [ you ] with food [to them] and bring strength to the poet.

तें नांवच पुन: ऋक्संहितेंत आलेलें आढळत नाहीं. नृषदाचा पुत्र म्हणजे कण्वच असें समजल्यास सगळ्या ऋचेचा कसा अर्थ करावयाचा त्याविषयीं सायणभाष्यांतून घेतलेला उतारा पहा.

वृत्तसुखार्थ तिसऱ्या चरणांत ' प्रवाचिअं ' असें वाचलें पाहिजे.

९. या ऋचेंत अश्वींचा असा एक पराक्रम वर्णिला आहे कीं त्यांनीं एक अति उत्तम घोडा पेदु नांवाच्या उपासकाला आणून दिला. पेदु या नांवाच्या माणसाविषयीं जरी उच्चार पुष्कळ वेळां आला आहे तरी त्याविषयीं कथा किंवा इतिहास म्हणून कांहीं ठाऊक नाहीं. सू. ११८ मं. ९ आणि सू. ११९ मं. १० यांत पेदूला शुभ्रवर्णाचा घोडा अश्वींनीं दिला असें सांगितलें आहे. ऋ. ७. ७१. ५ आणि १०. ३९. १० यांतहि तसेंच सांगितलें आहे. पण अश्वींनीं जो हा शुभ्र वारू पेदूला दिला, तो कोणत्या प्रसंगीं दिला याविषयीं कांहीं कथा समजण्यास

**सूनोर्मानेनाश्विना गृणाना वाजं विप्राय भुरणा रदन्ता ।**
**अगस्त्ये ब्रह्मणा वावृधाना सं विश्पलां नासत्यारिणीतम् ॥ ११॥**

सूनोः । मानेन । अश्विना । गृणाना । वाजम् । विप्राय । भुरणा । रदन्ता ।
अगस्त्ये । ब्रह्मणा । ववृधाना । सम् । विश्पलाम् । नासत्या । अरिणीतम् ॥ ११ ॥

सायणस्त्वेवमाह । हे सुदानू शोभनदानावश्विनौ वां युवयोः संबन्धीन्येतानि समनन्तरोक्तानि वीर्याणि श्रवस्या श्रवणीयानि सर्वैर्ज्ञातव्यानि भवन्ति । तदर्थं रोदस्योर्द्यावापृथिव्यात्मना वर्तमानयोर्युवयोः । उक्तं च यास्केन । तत्कावश्विनौ द्यावापृथिव्यावित्येक इति । तथा च तैत्तिरीयकम् । इमे अश्विना संवत्सरोग्निर्वैश्वानर इति । तयोर्युवयोः संदनं स्तोतृसमीपे निवेशनं प्रसादनहेतुभूतं वाङ्घूषमाघोषणीयं ब्रह्म मन्त्ररूपं स्तोत्रं निष्पन्नमिति शेषः । यद्यदा पज्रासोङ्गिरसां गोत्रोत्पन्ना यजमाना हे अश्विनौ वां युवां हवन्ते । स्तुतिभिरात्मसंरक्षणार्थमाह्वयन्ति । तदानीमिषा दातव्येनान्नेन सह यातम् । आगच्छतं च विदुषे युष्मद्विषयं स्तोत्रं जानते मह्यं च वाजमन्नं बलं वा प्रयच्छतमिति शेषः । इति ॥

## भाषायाम्.

११. हे भुरणा (=भुरणौ=अन्नदानेन भर्तारौ) अश्विना (=अश्विनौ), सूनोः [ब्रह्मद्वारा] मानेन गृणाना (=पुत्रस्य स्तोत्रद्वारा मानेन ऋषिणा गृणानौ=मानस्य नाम ऋषेः पुत्रस्यागस्त्यस्य स्तोत्रेण स्तुतौ सन्तौ) विप्राय (=मानायर्षये) वाजं रदन्ता (=अन्नं निष्पादयन्तौ ददतौ) [अपि च] ब्रह्मणा (=अगस्त्यकृतया सस्तोत्रयाराधनया) अगस्त्ये (=अगस्त्यविषये) वावृधाना (=वावृधानौ=वर्धितौ=जातानन्दौ) [युवां] हे नासत्या (=नासत्यौ), विश्पलाम् (=एतन्नामिकां खेलराजस्य स्त्रियं) सम् अरिणीतं (=जङ्घया पुनरयोजयतम्) ॥

सायणस्त्वेवमाह । भुरणा भर्तारौ पोषकौ नासत्या सत्यस्वभावौ हे अश्विनौ सूनोः कुम्भात्प्रसूतस्यागस्त्यस्य खेलपुरोहितस्य संबन्धिना मानेन स्तुत्यस्य परिच्छेदकेन स्तोत्रेण गृणाना स्तूयमानौ विप्राय मेधाविने भरद्वाजाय ऋषये वाजमन्नं रदन्ता विलिखन्तौ निष्पादयन्तौ युवां विश्पलां संग्रामे छिन्नजङ्घां खेलस्य संबन्धिनीं स्त्रियं समरिणीतम् । पुनरस्या जङ्घया समयोजयतम् । तृतीयेन पादेन प्रथमपादोक्तोऽर्थो विव्रियते । अगस्त्ये ऋषौ ब्रह्मणा मन्त्ररूपेण स्तोत्रेण ववृधाना प्रवर्धिताविति । इति॥

११. हे पोषक [ आणि ] सत्यस्वरूप अश्वी हो, पुत्राच्या [स्तवनद्वारा] [ मान ऋषी]नें स्तविलेले असे तुम्ही [ त्या ] ऋषीला अन्नसंपत्ति देते झालां; [ आणि ] अगस्त्याच्या स्तोत्रानें त्याजवर प्रसन्न होऊन विश्पलेला वरी करिते झालां.

11. O As'vins, praised by Mâna [ through the song ] of [ his ] son, [ and] [ thus] giving food, O supporters, to [ that ] sage, [and] delighted with Agastya through his worship, you, O Nâstyas, restored Vis'palâ.

ऋक्संहितेंत साधनें नाहींत.

' सहस्रावधि लूट जिंकणारा '=' सहस्रसाम्.' म्हणजे युद्धांत शत्रूस जिंकून त्याचें द्रव्य वगैरे आपल्या धन्यास लूट मिळे असें करणारा.

' तारून नेणारा '=' तरुत्रम्.' म्हणजे संकट आलें तरी त्यांतून आपल्या धन्याला लवकर पार पाडणारा.

वृत्तासाठीं पहिल्या चरणांत ' वर्पांसि अश्विना ' आणि चवथ्यांत ' श्रवसिअं तरुत्रम् ' असें वाचावें लागतें.

१०. वरजीं अश्वींचीं अनेक आश्चर्यकारक चरितें सांगितलीं त्यांस अनुलक्षून ऋषि म्हणतो, 'हे अश्वी हो, या प्रकारचे विलक्षण तुमचे पराक्रम होत. तुमचे भक्त जीं तुमचीं स्तोत्रें गातात ती तुमची सेवकांनीं गावयाची नामावळी होय; आणि तुमचा वाडा लहानशा एका गांवांत लहानशा ठिकाणीं नाहीं, तर भूलोक आणि स्वर्गलोक या दोहोंत तुमचा वाडा आहे. असे जे मोठे तुम्ही, ते आमची ही हाक ऐकून या, आणि येते वेळीं अन्न आणा आणि मजसाठीं सामर्थ्य घेऊन या.'

' द्यावापृथिवींत '='रोदस्योः.' म्हणजे भूलोक आणि द्युलोक यांत. ' रोदस्योः' शब्दाचा अर्थ येथें सायण निराळा करितात, तो भाषेंत उतरून घेतला आहे.

' पञ्च जन '='पञ्चासः.' सू.५१, मं. १४ याजवरील टीप पहा.

वृत्तासाठीं पहिल्या पादांत ' श्रवसिआ,' आणि दुसऱ्यांत ' रोदसीओः' असें वाचावें लागतें.

११. ही ऋचा कांहींशी कठिण आहे. भावार्थ असा आहे कीं, ' हे अश्वी हो, एका प्रसंगीं तुमचें स्तोत्र मान ऋषीनें आपला पुत्र अगस्त्य याच्या द्वारें केल्यावरून तुम्ही त्या मान ऋषीला संपत्ति देते झालां. आणि दुसऱ्या प्रसंगीं अगस्त्य ऋषीनें तुमची आराधना केल्यावरून तुम्ही त्याजवर प्रसन्न होऊन विश्पलेला लोखंडाचा पाय जोडून तिला वरी करिते झालां.'

**कुह यान्ता सुष्टुतिं काव्यस्य दिवो नपाता वृषणा शयुत्रा ।**
**हिरण्यस्येव कलशं निखातमुदूपथुर्दशमे अश्विनाहन् ॥ १२ ॥**

कुह । यान्ता । सुऽस्तुतिम् । काव्यस्य । दिवः । नपाता । वृषणा । शयुऽत्रा ।
हिरण्यस्यऽइव । कलशम् । निऽखातम् । उत् । ऊपथुः । दशमे । अश्विना । अहन् ॥ १२ ॥

---

## भाषायाम्.

१२. हे वृषणा (= वृषणौ=वीर्यवन्तौ ) दिवो नपाता ( =दिवः पुत्रौ=द्युलोकस्य सूनू ) अश्विना ( =अश्विनौ ), काव्यस्य ( =उशनसो नामर्षेः) सुष्टुतिं ( =शोभनां स्तुतिं प्रति ) यान्ता (=यान्तौ=गच्छन्तौ) शयुत्रा (=शयुत्रौ शयोर्नामर्षेस्तारकौ) [युवां] निखातं हिरण्यस्येव कलशं (= भूमौ निगूढं हिरण्यपूरितं कलशमिव) [प्रसिद्धं रेभं] दशमे अहन् (=अहनि ) कुह (=कुत्र )उद् ऊपथुः (=उद्धृतवन्तौ )?

---

यांत ' मान, ' ' अगस्त्य ' आणि 'विश्पला ' हीं विशेषनामें आहेत. 'मान' हें एका ऋषीचें नांव. मान आणि त्याचे वंशज हे इतर देवांचे जसे तसे अश्वी देवांचे मोठे भक्त असत. ऋक्संहितेंतील मंडल१ सू. १८०-१८४ हीं पहा. मान ऋषीविषयीं दुसरा इतिहास कांहीं ठाऊक नाहीं. ' अगस्त्य ' ऋषीचें नांव तर प्रसिद्धच आहे. पुराणादिकांत जो अगस्त्य सांगितला आहे, तोच हा वेदांतला अगस्त्य होय याविषयीं संशय नाहीं. पहिल्या मंडळांतील १६६ पासून १६९, १७१पासून१७८,१८० पासून १९१ हीं चोवीस सूक्तें आणि शिवाय दुसऱ्या सूक्तांचे भागभूत असे सहा सात मंत्र अगस्त्य ऋषीनें केलेले आहेत. ( तीं सूक्तें पहा ). ' विश्पले 'विषयीं सू. ११२, मं. १० आणि सू. ११६, मं. १५ आणि त्यांजवरील टिपा पहा.

' पुत्राच्या स्तवनद्वारा '=' सूनोः [ ब्रह्मणा ].' ' सूनोः ' आणि ' मानेन ' यांचा संबंधान्वय आणि अर्थ सायणांनी आमच्याहून निराळा केला आहे तो भाषेंत पहा.

वृत्तासाठीं पहिल्या चरणांत ' मानेन अश्विना गृणाना,' तिसऱ्यांत ' अगस्तिए' आणि चवथ्यांत ' नासतिआरिणीतम् ' असें म्हणावें लागतें.

१२. हे द्यूचे वीर्यवंत पुत्र हो, हे अश्वी हो, शयुतारक तुम्ही काव्याच्या सुस्तोत्राप्रत जात असतांना सोन्याचा पुरलेला हांडा [वर काढावा] तसा दहाव्या दिवसीं [रेभाला] कोठें वर काढिते झालां ?

12. Where, O brave sons of Heaven, O As'vins, did you, saviours of S'ayu, on your way to the good prayer of Kâvya, raise, on the tenth day, [Rebha] like a buried jar of gold?

---

१२. रेभाला कूपांतून दहाव्या दिवसीं अश्वींनीं वर काढिलें असें सू. ११२, मं. ५ यांत सांगितलें आहे. आतां येथें असें जाणविलें आहे कीं, अश्वी देव उशना काव्य (सू. ५१, मं. १० आणि सू. ८३, मं. ५ आणि त्यांजवरील टिपा पहा) याणें केलेली उत्तम स्तुति ऐकण्यास जात असतां, वाटेंत त्यांस समजलें कीं रेभ संकटांत पडला आहे. त्यावरून त्यांनीं त्याची सुटका केली. म्हणून ऋषि म्हणतो, 'हे अश्वी हो, तुम्ही उशना काव्य याजकडे जात असतां वाटेंत तुम्हांला रेभ संकटांत पडला आहे असें समजलें कसें, आणि त्याला तुम्हीं दहा दिवस पाण्यांत बुडत असतांहि वर काढिलें तें कोठें आणि कसें?'

'द्यूचे पुत्र'='दिवः नपाता.' म्हणजे 'द्युलोकाचे पुत्र.' यावरून असें उघड होतें कीं उषा, सविता, सूर्य, हे पूर्वेकडे उगवून जाणारे प्रकाशरूपी जसे देव, तसेच अश्वी हेहि कोणी प्रकाशरूपीच देव असावे. सू. ४८, मं. १,८ यांवरील 'द्यूची कन्यका' या शब्दाविषयीं टीप पहा.

'शयुतारक'='शयुत्रा.' म्हणजे शयुनामक उपासकाला तारणारे. सू. ११२ मं. १६, सू. ११६ मं. २२ आणि टिपा पहा.

वृत्तासाठीं पहिल्या पादांत 'कावि अस्य' असें वाचावें लागतें.

युवं च्यवानमश्विना जरन्तं पुनर्युवानं चक्रथुः शचीभिः ।
युवो रथं दुहिता सूर्यस्य सह श्रिया नासत्यावृणीत ॥ १३ ॥

युवम् । च्यवानम् । अश्विना । जरन्तम् । पुनः । युवानम् । चक्रथुः । शचीभिः ।
युवोः । रथम् । दुहिता । सूर्यस्य । सह । श्रिया । नासत्या । अवृणीत ॥ १३ ॥

युवं तुग्राय पूर्व्येभिरेवैः पुनर्मन्यावभवतं युवाना ।
युवं भुज्युमर्णसो निः समुद्राद्विभिरूहथुर्ऋज्रेभिरश्वैः ॥ १४ ॥

युवम् । तुग्राय । पूर्व्येभिः । एवैः । पुनःऽमन्यौ । अभवतम् । युवाना ।
युवम् । भुज्युम् । अर्णसः । निः । समुद्रात् । विऽभिः । ऊहथुः । ऋज्रेभिः । अश्वैः ॥ १४ ॥

---

## भाषायाम्.

१३. हे अश्विना (=अश्विनौ), युवं(=युवां=युवामेव) जरन्तं च्यवानं (=जीर्यन्तं च्यवानं नाम कंचिद्भक्तं) शचीभिः (=युवयोरद्भुतकर्मभिः) पुनर्युवानं चक्रथुः (=पुनरपि युवा यथा भवति तथा कृतवन्तौ)। हे नासत्या (=नासत्यौ), युवोः (=युवयोरेव) रथं [ न कस्याप्यन्यस्य रथं ] सूर्यस्य दुहिता (=सूर्या नाम सूर्यस्य कन्या) श्रिया सह (=युवयोः कान्त्या सह ) अवृणीत (=" समभजत=आगत्यारूढवती" ) ॥

१४. हे युवाना (=युवानौ=नित्यतरुणावश्विनौ ), युवं (=युवां=युवामेव ) तुग्राय (=तुग्रनाम्ने कस्मैचिदुपासकाय भुज्योः पित्रे ) पूर्व्येभिः ( =पूर्व्यैः=पुरातनैः ) एवैः ( =कर्मभिः=युवयोरद्भुतचरितैः=युष्मत्पूर्वचरितानां कीर्तनेन ) पुनर्मन्यौ ( =पुनः स्तवनीयौ ) अभवतम् । युवं (=युवां=युवामेव ) भुज्युं (=तुग्रस्य पुत्रं ) विभिः (=विसंदृशैः=पक्षिसदृशैः ) ऋज्रेभिः ( =ऋज्रैः=ऋजुगामिभिः=शीघ्रगमनैः) अश्वैः अर्णसः समुद्रात् (=कल्लोलयुक्तात् समुद्रात् ) निः ऊहथुः (=निर्गमय्य नीतवन्तौ ) ॥

१३. हे अश्वी हो, च्यवान म्हातारा होत असतां तुम्हीच त्याला पुनः [ आपल्या ] पराक्रमांनीं तरुण करिते झालां. हे नासत्य हो, सूर्याची दुहिता [ तुमच्या ] कांतीसहित तुमच्याच रथाला वरिती झाली.

१४. हे [सदा]तरुण अश्वी हो, तुम्हीच तुग्राला [तुमच्या] पुरातन चरितांनीं पुनः स्तवनीय झालां. तुम्हीच [आपल्या] पक्ष्यांसारिख्या चपलगामी घोड्यांच्या योगानें भुज्यूला खवळलेल्या समुद्रांतून बाहेर काढिते झालां.

13. You, O As'vins, through your miracles made Chyavâna, who was growing old, young again. It was your car, O Nâsatyas, that the daughter of Sûrya chose together with your glory.

14. You, O ever-youthful [ As'vins ], became fit to be praised by Tugra with your former miracles. You with birdlike swift-flying horses delivered Bhujyu from the surging ocean.

---

१३. 'हे अश्वी हो, म्हाताऱ्या च्यवानास पुनः तरणा केला तो तुम्हींच; आणि इतरांस टाकून सूर्येनें तुमच्याच रथाला वरिलें, तिच्या बरोबर तुमची तेजःपुञ्ज कान्ति मात्र बसली, दुसरें कोणी नव्हतें.'

च्यवान ऋषीला अश्वींनीं म्हातारपणांत पुनः तारुण्य दिलें याविषयीं सू. ११६ मं. १० पहा. आणि सूर्येच्या गोष्टीविषयीं सू. ११६ मं. १७ आणि त्यांजवरील टीप पहा.

'तुम्हीच'='युवम्.' 'च' या ऐवजीं मुळांत शब्द नाहीं. परंतु त्याचा अर्थ 'युवम्' या पदाचें जें येथें पादारंभींचें स्थळ त्यावरून गम्यमान आहे. तसेंच 'तुमच्याच' (='युवोः') याविषयींहि समजावयाचें आहे.

'[ तुमच्या ] कांतीसहित'='श्रिया सह.' अश्वींच्या बरोबर त्यांची कांति किंवा प्रभा 'श्री' या नांवाची असते अशा अर्थाचे मंत्र ऋक्संहितेंत बरेच आढळतात. उदाहरणार्थ ( ऋ. ७. ७२. १ ) 'अभि वां विश्वा नियुतः सचन्ते स्पार्हया श्रिया तन्वा शुभाना.'

वृत्तासाठीं तिसऱ्या पादांत 'सूरिअस्य' आणि चवथ्यांत 'नासतिआ' असें वाचावें.

१४. भावार्थः–'हे अश्वी हो, तुग्राला प्रिय झालां ते तुम्हीच आणि तुग्रानें

अजोहवीदश्विना तौग्र्यो वां प्रोळ्हः समुद्रमव्यथिर्जगन्वान् ।
निष्टमूहथुः सुयुजा रथेन मनोजवसा वृषणा स्वस्ति ॥१५॥१५॥

अजोहवीत् । अश्विना । तौग्र्यः । वाम् । प्रऽऊळ्हः । समुद्रम् । अ-व्यथिः । जगन्वान् ।
निः । तम् । ऊहथुः । सुऽयुजा । रथेन । मनःऽजवसा । वृषणा । स्वस्ति ॥ १९ ॥ १९ ॥

## भाषायाम्.

१५. हे अश्विना (=अश्विनौ), प्रोळ्हः (=प्रोढः=प्रापितः=द्वीपान्तरगतशत्रोर्नाशाय पित्रा प्रहितः) तौग्र्यः (=तुग्रस्य पुत्रो भुज्युः) समुद्रं जगन्वान् (=समुद्रजले निमग्नोपि) अव्यथिः (=पीडामप्राप्तः=व्यथारहित इव सुखेनैव) वाम् अजोहवीत् (=युवाम् आत्मरक्षणायाह्वयत्)। तं [तुग्रपुत्रं] हे वृषणा (=वृषणौ =वीर्यवन्तावश्विनौ), [युवयोः] सुयुजा (=शोभनाश्वयुक्तेन) मनोजवसा (=मनोवद्वेगवता) रथेन स्वस्ति (=क्षेमं यथा भवति तथा) निरूहथुः (=निर्गमय्य पितरं प्रति नीतवन्तौ)॥

पूर्वींचीं तुमचींच सर्व अद्भुत चरितें वाखाणिलीं. भुज्यूला समुद्रांतून बाहेर नेला आणि त्याचा बाप तुग्र याजजवळ पोंहचविला तो तुम्हींच पोंहचविला.'

भुज्यु हा परद्वीपस्थ शत्रूवर स्वारी करून जात असतां समुद्रांत. तारवें फुटून बुडूं लागला असतां त्याला अश्वींनीं सोडवून त्यांच्या बापाजवळ (तुग्राजवळ) नेऊन पोंहचविलें याविषयीं सू. ११६ मं. ३–५, सू. ११२ मं. ६, २० आणि त्यांजवरील टिपा पहा.

'पुरातन चरितांनीं '=' पूर्व्येभिः एवैः.' सायणाचार्य पूर्व काळींच्या स्तोत्रांनीं असा अर्थ करितात.

'पुनः स्तवनीय झालां '=' पुनर्मन्यौ अभवतम्.' म्हणजे तुग्रानें तुमचीं पूर्व काळींचीं अद्भुत चरितें आठवून आणि वर्णून तुमची मोठी स्तुति केली.

'घोड्यांच्या योगानें.' म्हणजे तारवांस घोडे जोडून असें समजलें पाहिजे; कारण इतर ठिकाणीं तारवांत घालून भुज्यूला रक्षिलें आणि बाहेर आणिलें असें सांगितलें आहे.

वृत्तासाठीं 'पूर्विएभिरेवैः' असें पहिल्या चरणांत आणि 'ऋज्जरेभिः' असें चवथ्या चरणांत म्हटलें पाहिजे.

१५. हे अश्वी हो, तुग्राचा पुत्र पाठविलेल्या कामीं जात असतां समुद्रांत बुडाला तेव्हां तो न घाबरतां तुमचा धांवा करिता झाला. त्याला, हे वीर्यवंत [ अश्वी ] हो, तुम्ही उत्तम [घोडे] जोडिलेल्या [आणि] मनाप्रमाणें वेगवान् अशा रथांत घालून सुखरूपपणें बाहेर काढून नेते झालां.

15. The son of Tugra while on his errand was being drowned in the ocean, when he fearlessly invoked you, O As'vins! Him, O manly [ As'vins ], you conveyed safely in [ your ] well-yoked chariot swift as fancy.

---

१५. वरच्या ऋचेंतीलच भुज्यूची कथा येथें रूपान्तरानें सांगितली आहे.

'पाठविलेल्या कामीं जात असतां '= 'प्रोह्लः.' अक्षरशः 'पाठविलेला' इतकाच आहे. कितीएक पाश्चिमात्य विद्वान् 'बुडत असतां' असा अर्थ करितात, त्याला पुरता आधार दिसत नाहीं.

'मनासारिखा वेगवान् अशा '=' मनोजवसा.' तृतीया. 'हे मनाप्रमाणें वेगवान् अश्वी हो,' असाहि संबोधनार्थी अर्थ होऊं शकेल आणि सायणाचार्य तसाच करितात.

वृत्तासाठीं पहिल्या पादांत 'तौग्रिओ' आणि चवथ्या चरणांत 'सुअस्ति' असें म्हणावें.

अजोहवीदश्विना वर्तिका वामास्नो यत्सीममुञ्चतं वृकस्य ।
वि जयुषा ययथुः सान्वद्रेर्जातं विष्वाचो अहतं विषेण ॥ १६ ॥

अजोहवीत् । अश्विना । वर्तिका । वाम् । आस्नः । यत् । सीम् । अमुञ्चतम् । वृकस्य ।
वि । जयुषा । ययथुः । सानु । अद्रेः । जातम् । विष्वाचः । अहतम् । विषेण ॥ १६ ॥

## भाषायाम्.

१६. हे अश्विना (=अश्विनौ), वर्तिका [ नाम पक्षिणी ] वां (=युवाम्) अजोहवीत् (=आत्मरक्षणार्थमाह्वयत्) । यत् (=यदा खलु=तदा च ) [युवां ] सीं (=तां) वृकस्य (=अरण्यशुनः) आस्नः (=मुखात्) अमुञ्चतम् (=मोचितवन्तौ=अपालयतम्) । [ युवां ] जयुषा (=जयशीलेन ) [ वां रथेन ] अद्रेः सानु (=पर्वतस्योच्छ्रितं प्रदेशं ) वि ययथुः (=विभिद्य अगच्छतं=जाहुषाख्यम् उपासकं शत्रुभिर्वेष्टितं रक्षितुम् अन्यैर्गन्तुमशक्येन मार्गेण गतवन्तौ ) । [ अपि च ] विष्वाचः (=विष्वाङ्नाम्नोसुरस्य) जातं (=पुत्रं) विषेण (=विषं पाययित्वा ) अहतम् (=हतवन्तौ) ॥

सायण एवमाह । आस्नो वृकस्येत्यर्द्धर्चे यदुक्तं तदत्र पूर्वार्द्धेन प्रतिपाद्यते । वर्तिका चटकसदृशस्य पक्षिणः स्त्री वृकेणारण्यशुना ग्रस्ता सती हे अश्विनौ वां युवां तदाजोहवीत् । आहूतवती । यत्सीं यदा खलु वृकस्यास्न आस्यादमुञ्चतम् । वर्तिकाममोचयतम् । अपि च युवां जयुषा जयशीलेन रथेनाद्रेः पर्वतस्य सानु समुच्छ्रितप्रदेशं विययथुः। शत्रुभिरावेष्टितं जाहुषाख्यं स्तोतारं शत्रुसमूहान्निर्गमय्य तेन सहान्यैर्गन्तुमशक्यं पर्वताग्रं गतवन्तावित्यर्थः । तदुक्तं परिविष्टं जाहुषमित्यत्र । तथा विष्वाचो विविधगतियुक्तस्यैतत्संज्ञस्यासुरस्य जातमुत्पन्नमपत्यं विषेण क्ष्वेडेनाहतम् । युवां हतवन्तौ । यद्वा । वर्तते प्रतिदिवसमावर्तत इति वर्तिकोषाः । वृक इति विवृतज्योतिष्कः सूर्य उच्यते । तेन ग्रस्ता सती सा हे अश्विनौ युवामजोहवीत् । आह्वयत् । यदा खलु युवां वृकस्य सूर्यस्यास्न आस्यस्थानीयान्मण्डलादमुञ्चतम् । अमोचयतम् । सूर्येणैकीभूतामुषसं पृथक्कृत्योदयात्पूर्वं रात्रेरपरभागे स्थापितवन्तावित्यर्थः । तथा च यास्कः । आदित्योऽपि वृक उच्यते यदावृङ्क्ते । आह्वयदुषा अश्विनावादित्येनाभिग्रस्तां तामश्विनौ प्रमुमुचतुरित्याख्यानम् । नि० ५. २१ । इति । अपि च जयुषा जयशीलेन रथेनाद्रेर्मेघस्य सानु समुच्छ्रितप्रदेशं वृष्टिचिकीर्षया विशेषेण ययथुः । युवां गतवन्तौ ।

१६. हे अश्वी हो, चिमणीनें तुमचा धांवा केला तेव्हां तुम्ही तिला लांडग्याच्या जबड्यांतून मुक्त करिते झालां. तुम्ही आपल्या विजयशाली [रथाच्या] योगानें पर्वताचें शिखर भेदून गेलां. तुम्हीं विष्वाच्याचा पुत्र विषानें मारिते झालां.

16. You, O As'vins, the sparrow invoked, when you saved it from the jaw of the wolf. You penetrated through the precipice of the mountain with your victorious [chariot]; you slew the child of Vishvâch with poison.

---

१६. या ऋचेंत अश्वींचे तीन पराक्रम सांगितले आहेत: १ ला, अश्वींनीं चिमणीला लांडग्याच्या तोंडांतून रक्षिलें; २ रा, पर्वतांत ‘जाहुष’ नांवाच्या भक्ताला शत्रूंनीं कोंडून ठेविलें असतां अश्वींनीं त्या ठिकाणीं डोंगर फोडून जाऊन त्याची सुटका केली; आणि ३ रा, विष्वाच् म्हणून एक असुर असे त्याच्या पुत्राला विष देऊन मारिलें.

‘चिमणीनें’=‘वर्तिका.’ सू. ११२ मं. ८, सू. ११६ मं. १४ पहा.

‘पर्वताचें शिखर भेदून गेलां’=‘वि ययथुः सानु अद्रेः.’ सू. ११६ मं. २० आणि टीप पहा.

‘विष्वाच्.’ या व्यक्तीविषयीं कांहींच कथा ऋक्संहितेंत उपलब्ध दिसत नाहीं.

**शतं मेषान्वृक्ये मामहानं तमः प्रणीतमशिवेन पित्रा ।**
**आक्षी ऋज्राश्वे अश्विनावधत्तं ज्योतिरन्धाय चक्रथुर्विचक्षे ॥१७**

शतम् । मेषान् । वृक्ये । ममहानम् । तमः। प्रऽनीतम् । अशिवेन । पित्रा ।
आ । अक्षी इति। ऋज्रऽअश्वे । अश्विनौ । अधत्तम् । ज्योतिः । अन्धाय ।
चक्रथुः । विऽचक्षे ॥ १७ ॥

**शुनमन्धाय भरमह्वयत्सा वृकीरश्विना वृषणा नरेति ।**
**जारः कनीन इव चक्षदान ऋज्राश्वः शतमेकं च मेषान् ॥१८॥**

शुनम् । अन्धाय । भरम् । अह्वयत् । सा । वृकीः । अश्विना । वृषणा ।
नरा । इति ।
जारः । कनीनःऽइव । चक्षदानः । ऋज्रऽअश्वः । शतम् । एकम् ।
च । मेषान् ॥ १८ ॥

---

गत्वा च विष्वाचो विविधगतियुक्तस्य मेघस्य संबन्धिना विषेणोदकेन जातमुत्पन्नं सर्वं भूतजातमहतम् । अगमयतम् । वृष्टिं कृतवन्तावित्यर्थः ॥ इति ॥

---

## भाषायाम्.

१७. वृक्ये (=वृक्यै=अरण्यशुन्यै ) [ आहारार्थं ] शतं मेषान् (=शतसंख्याकान् मेषान् ) ममहानं (=दत्तवन्तम् ) [ अतश्च कारणात् ] अशिवेन पित्रा (=दुःखकारिणा स्वजनकेन) तमः प्रणीतम् (=आन्ध्यरूपमन्धकारं प्रापितम् =उत्पाटितनेत्रम् ) [ऋज्राश्वं] [युवाम् आवतम्] । [युवां हि] हे अश्विनौ, ऋज्राश्वे अक्षी आधत्तं (=नेत्रे न्यधत्तम्=अदत्तम् ) । [ तथा कृत्वा] [युवाम्] अन्धाय ज्योतिः (=आलोकं) विचक्षे (=विविधं द्रष्टुं= सर्वत्र स यथा पश्येत् तथा ) चक्रथुः (=निर्मितवन्तौ ) ॥

वृक्ये वृकीरूपेणावस्थितायाश्विनोर्वाहनाय रासभायेति सायणः ॥

१८. सा वृकीः (= पूर्वोक्तारण्यशुनी ) अन्धाय (=आन्ध्यं गमिताय ऋज्राश्वाय) शुनं भरम् अह्वयत् (=भरं स्तोत्रमुच्चचार शुनं सुखं च ययाचे ) [ तत् कथम् ? ] हे अश्विना (=अश्विनौ ), हे वृषणा(=वृषणौ=वीर्यवन्तौ), नरा (=नरौ=शूरौ), कनीनो जार इव (=तरुणः कामीव=यथा तरुणः कश्चित्कामी कान्ताप्रीत्यर्थं मेषान्हत्वा तन्मांसं तया सादरं भक्षयति) तथा [ मदर्थं ] शतम् एकं च मेषान् (=एकोत्तरशतमेषान् ) चक्षदानः (=शकलीकृतवान् ) [ अयम् ] ऋज्राश्वः [ खलु अवतमेनम् ] इति ॥

१७. लांडगीला शंभर मेंढे खावयास देणारा [ आणि ] [त्या-मुळें] निर्दय बापानें आंधळा केलेला [ ऋज्राश्व ] यावर तुम्ही प्रसाद केला. हे अश्वी हो, तुम्ही ऋज्राश्वाला डोळे देते झालां: आंधळ्याला दिसावें म्हणून त्याला तुम्ही प्रकाश देते झालां.

17. Him who gave a hundred sheep to the she-wolf [ and who was then] struck with blindness by [ his ] unkind father, [ you protected ]—on that Rijrâs'va you, O As'vins, conferred eyes: you made light for the blind to see.

१८. त्या लांडगीनें आंधळ्या [ऋज्राश्वा]साठीं [अश्वींचा] धांवा करून कल्याण याचिलें कीं, 'हे अश्वी हो, हे वीर्यवंत, हे शूर [ अश्वी ] हो, [ ह्या ] ऋज्राश्वानें तरुण कामी [ पुरुषा]प्रमाणें एकशें एक मेंढे [ मला ] कापून घातले आहेत.'

18. That female wolf [ sang ] a hymn [ to and ] invoked the blessing [ of the As'vins ] in behalf of the blind man, thus: O As'vins, O puissant heroes, [ this is ] Rijrâs'va who, like a youthful lover, cut [ for me ] a hundred and one rams.

---

१७. सू. ११६ मं. १६ यांत ऋज्राश्वाची कथा आली आहे ती पहा. या ऋचेंत त्याच ऋज्राश्वाची कथा पुनः आली आहे, आणि तीहि तीन वेगवेगळ्या वाक्यांनीं सांगितली आहे.

'आंधळ्याला.' म्हणजे ऋज्राश्वालाच.

वृत्तासाठीं पहिल्या पादांत 'वृकिऍ' असा पाठ म्हणावा लागतो.

१८. वरच्या मंत्रांतील कथाच पुढें सांगतो. त्या लांडगीनें मग ऋज्राश्वासाठीं अश्वींचा धांवा करून करुणा भाकून स्तोत्र केलें कीं, 'हे अश्वी हो, एखादा जार आपल्या प्रियेसाठीं पाहिजे तितके मेंढे मारून घालितो तसे या ऋज्राश्वानें मला एकशें एक मेंढे कापून घातले आहेत, तर याजवर तुम्ही कृपा करा.'

'ऋज्राश्वासाठीं धांवा करून कल्याण याचिलें'='अन्धाय शुनं भरम् अह्वयत्.' हा भाग कठिण आहे. 'अह्वयत्' याचे येथें दोन अर्थ होतात. 'भरम् अह्वयत्' म्हणजे 'स्तोत्रम् उच्चार' आणि 'शुनम् अह्वयत्' म्हणजे 'सुखमाह्वयत्=सुखाय अश्विनौ आह्वयत्' असा अर्थ होतो.

वृत्तासाठीं चवथ्या पादांत 'ऋज्राशुअः' असें म्हटलें पाहिजे.

o 3

**मही वामूतिरश्विना मयोभूरुत स्त्रामं धिष्ण्या सं रिणीथः ।**
**अथा युवामिदह्वयत्पुरंधिरागच्छतं सीं वृषणाववोभिः ॥ १९ ॥**

मही । वाम् । ऊतिः । अश्विना । मयःऽभूः । उत । स्त्रामम् । धिष्ण्या । सम् । रिणीथः ।
अथ । युवाम् । इत् । अह्वयत् । पुरम्ऽधिः । आ । अगच्छतम् । सीम् । वृषणौ । अवःऽभिः ॥ १९ ॥

**अधेनुं दस्रा स्तर्यं विषक्तामपिन्वतं शयवे अश्विना गाम् ।**
**युवं शचीभिर्विमदाय जायां न्यूहथुः पुरुमित्रस्य योषाम् २० ॥ १६**

अधेनुम् । दस्रा । स्तर्यम् । विऽसक्ताम् । अपिन्वतम् । शयवे । अश्विना । गाम् ।
युवम् । शचीभिः । विऽमदाय । जायाम् । नि । ऊहथुः । पुरुऽमित्रस्य । योषाम् ॥ २० ॥ १६ ॥

---

## भाषायाम्.

१९. हे अश्विना (=अश्विनौ), मही वाम् ऊतिः (=युवयोः=युष्मत्कृतं रक्षणं महदेव) मयोभूः (=सुखकारिणी च)। उत (=अपि च) हे धिष्ण्या (=धिष्ण्यौ=स्तवनीयौ), [युवां] स्त्रामं (=गतहस्तपादादिकावयवं पुरुषं) सं रिणीथः (=संगमयथः=पुनर्लब्धावयवं कुरुथः)। अथ (=अतः कारणादेव) [सा] पुरंधिः (=बहुमेधाविनी) [विश्पला] युवाम् इत् (=युवामेव) अह्वयत् (=आहूतवती)। हे वृषणौ (=वीर्यवन्तौ), [युवां ततः] सीं (=तां प्रति) अवोभिः (=संरक्षणैः सह) आ अगच्छतम् (=आगतवन्तौ) ॥

२०. हे दस्रा (=दस्रौ दंससां कर्तारौ=अद्भुतकर्मकर्तारौ) अश्विना (=अश्विनौ); [युवाम्] अधेनुम् (=अदोग्ध्रीं) स्तर्यं (=निवृत्तप्रसवां) विषक्तां (=विशेषेण सक्तावयवां=कृशावयवां) गां शयवे [नाम प्रसिद्धायोपासकाय] अपिन्वतं (=पयसा पूरितवन्तौ)। युवं (=युवां) शचीभिः (=युवयोरद्भुतकर्मभिः) पुरुमित्रस्य [नाम कस्यचित्पुरुषस्य] योषां (=यौवनवतीं कन्यां) विमदाय (=एतन्नामकाय भक्ताय) जायां (=पत्नीं) नि ऊहथुः (=प्रापितवन्तौ) ॥

विमदायैतत्संज्ञाय ऋषये शत्रुभिः सह योद्धुमशक्ताय युवां न्यूहथुः। विमदस्य गृहं प्रापितवन्ताविति सायणः ॥

१९. हे अश्वी हो, तुमचा अनुग्रह मोठा [ आणि ] कल्याणकारक. [ होय ]. आणि हे स्तवनीय [अश्वी] हो, तुम्ही पांगळ्याला नीट करितां. म्हणून त्या प्रज्ञावती [ विश्पले]नें तुमचाच धांवा केला. हे वीर्यवंत [ अश्वी ] हो, तुम्ही आपल्या अनुग्रहांसहित तिजप्रत प्राप्त झालां.

२०. हे अद्भुतपराक्रमकारी अश्वी हो, [तुम्ही ] शयूसाठीं दूध न देणारी, न विणारी [ आणि ] रोड गाय दुधानें भरून देते झालां. तुम्ही [आपल्या ] पराक्रमांनीं विमदाला पुरुमित्राची कन्या वायको आणून देते झालां.

19. Great is your protection, O As'vins, [ and ] beneficent. And you restore the lame, O praiseworthy [ As'vins ]. Therefore [ that ] wise [woman] invoked none but you. And you, O puissant [ As'vins ], came to her with [your] protections.

20. You, O miraculous As'vins, filled with milk for S'ayu the cow that yielded no milk, that was past parturition, that was lean. You through your miracles brought to Vimada the youthful daughter of Purumitra as [ his ] wife.

---

१९. 'हे अश्वी हो, तुमची कृपा मोठी आणि कल्याणकारक होय. तुम्ही पांगळ्याला सुद्धा हातपाय देत असतां. म्हणूनच तर विश्पलेनें दुसऱ्या देवांचा धांवा न करितां तुमचाच केला, आणि तुम्हीहि आपल्या अनुग्रहांसहित तिजकडे येऊन तिला पावलां.'

'प्रज्ञावती [विश्पलेनें ] '='पुरंधिः' सू. ११२ मं. १०, सू. ११६ मं. १५, सू. ११७ मं. ११ आणि टिपा पहा.

वृत्तासाठीं दुसऱ्या पादांत 'धिष्णिआ' असें वाचलें पाहिजे.

२०. 'शयू'विषयीं सू. ११२ मं. १६ आणि 'विमद' याविषयीं सू. ११२ मं. १९, सू. ११६ मं. १ यांजवरील टिपा पहा. पुरुमित्राची कन्या शुन्ध्यू इला अश्वींनीं प्राप्त करून दिली याशिवाय पुरुमित्राविषयीं कांहीं कथा ठाऊक नाहीं.

वृत्तसुखासाठीं 'स्तरिअं' असें पहिल्या पादांत आणि चवथ्यांत 'नि ऊहथुः' असें म्हणावें लागतें.

यवं॒ वृके॑णाश्विना॒ वप॒न्तेषं॑ दु॒हन्ता॒ मनु॑षाय दस्रा ।
अ॒भि दस्युं॒ बकु॑रेणा॒ धम॑न्तो॒रु ज्योति॑श्चक्रथु॒रार्या॑य ॥ २१ ॥

यव॑म् । वृके॑ण । अ॒श्विना॒ । वप॑न्ता । इष॑म् । दु॒हन्ता॑ । मनु॑षाय । द॒स्रा ।
अ॒भि । दस्यु॑म् । बकु॑रेण । धम॑न्ता । उ॒रु । ज्योति॑ः । च॒क्र॒थुः॒ । आ॒र्या॑य ॥ २१ ॥

आ॒थ॒र्व॒णाया॑श्विना दधी॒चेऽश्व्यं॒ शिरः॒ प्रत्यै॑रयतम् ।
स वां॒ मधु॒ प्र वो॑चदृता॒यन्त्वा॒ष्ट्रं यद्द॑स्रावपिक॒क्ष्यं॑ वाम् ॥ २२ ॥

आ॒थ॒र्व॒णाय॑ । अ॒श्वि॒ना॒ । द॒धी॒चे । अ॒श्व्य॑म् । शिर॑ः । प्रति॑ । ऐ॒र॒य॒त॒म् ।
सः । वा॒म् । मधु॑ । प्र । वो॒च॒त् । ऋ॒त॒ऽयन् । त्वा॒ष्ट्रम् । यत् । द॒स्रौ॒ । अ॒पि॒ऽक॒क्ष्य॑म् । वा॒म् ॥ २२ ॥

---

## भाषायाम्.

२१. हे अश्विना (=अश्विनौ), यवं (=धान्यं) वृकेण (=लाङ्गलेन) वपन्ता (=वपन्तौ=भूमौ निक्षिपन्तौ) [अपि च] हे दस्रा(=दस्रौ=दंससाम्=अद्भुतकर्मणां कर्तारौ), [भूम्याः सकाशात्] मनुषाय (=मनुष्यजाताय) इषम् (=अन्नं) दुहन्ता (=दुहन्तौ=क्षारयन्तौ=निष्पादयन्तौ) [अपि च] बकुरेण (="भासमानेन वज्रेण") दस्युम् अभि (=अनार्यजनरूपं शत्रुं प्रति आभिमुख्येन) धमन्ता (=धमन्तौ=घ्नन्तौ) [युवाम्] आर्याय (=आर्यजनजाताय) उरु (=विस्तीर्णं) ज्योतिः (=प्रकाशं) चक्रथुः (=कृतवन्तौ) ॥

२२. हे अश्विना (=अश्विनौ), [युवाम्] आथर्वणाय (=अथर्वपुत्राय) दधीचे (=दध्यङ्ङाम्ने प्रसिद्धाय ऋषये) अश्व्यम् (=अश्वसंबन्धि) शिरः प्रत्यैरयतम् (=मानुषशिरश्छेदनादनन्तरं समयोजयतम्) ।* ऋतायन् (=ऋतं यज्ञमात्मन इच्छन्=भक्तिपरायणः सन्) स वां (=युवाभ्यां) मधु (=मधुविद्यां) प्र वोचत् (=अकथयत्) [अपि च] हे दस्रौ (=अद्भुतकर्मकारिणौ), यत् त्वाष्ट्रं (=त्वष्टृसंबन्धि) अपिकक्ष्यम् (=अपिकक्षस्य कक्षप्रदेशस्य पुनःसंधानभूतं ?) [तत्] वां (=युवाभ्यां) [प्रवोचत्] ॥

त्वाष्ट्रं यत् अपिकक्ष्यं वाम् इति दुर्बोधम् । सायणस्तूत्तरार्धमेवं व्याख्यातवान् ।

२१. हे अश्वी हो, नांगराच्या योगानें धान्य पेरणारे, [ आणि ] हे अद्भुतचमत्कारकारी [अश्वी] हो, मनुष्याकरितां अन्न उत्पन्न करणारे [आणि] अनार्यांच्या आंगावर बकुराचा प्रहार करणारे [जे तुम्ही ते] आर्य लोकांकरितां विस्तीर्ण प्रकाश पसरिते झाले आहां.

२२. हे अश्वी हो, अथर्व्याचा पुत्र दध्यञ्च् याला तुम्ही घोड्याचें शिर जोडिते झालां. त्याणें मोठ्या भक्तीनें तुम्हांला मधुविद्या सांगितली, [ आणि ] हे अद्भुत चत्मकार करणारे [ अश्वी ] हो, तुम्हांला कक्ष पुनः जोडण्याचें त्वष्ट्याचें जें साधन [तें सांगितलें].

21. O As'vins, O performers of miracles, you who sow the grain with the plough, who milk out food for the sons of Manu, who strike at the riteless with the thunderbolt, have prepared the far-spread light for the Ârya.

22. To Dadhyanch the son of Atharvan you, O As'vins, joined the horse's head. He piously declared to you [ the knowledge of ] the honey, [ declared ] to you, O workers of miracles, that which was Tvashtâ's means of rejoining the armpit.

---

२१. या ऋचेंत ऋषि म्हणतो, 'हे अश्वी हो, तुम्ही आमचे वाडवडील आणि आम्ही जे आर्य जन यांजवर अनुग्रह करून त्यांजकरितां जमिनींत बीज पेरवितां आणि भूमींतून अन्नरूपी दूध दोहून काढितां आणि कोळी, खोंड इत्यादि जे अनार्य जन त्यांचा नाश करून आम्हां आर्य जनांसाठीं ज्ञानरूप मोठा प्रकाश तुम्ही सर्वत्र पसरिते झाले आहां.'

'अन्न उत्पन्न करणारे'=' इषं दुहन्तां.' अक्षरशः अर्थ, दुधाप्रमाणें भूमींतून अन्न दोहून काढणारे.

'बकुराचा प्रहार करणारे'=' बकुरेण धमन्ता.' 'बकुर' शब्दाचा आणि 'धमन्ता' या कृदंताचा अर्थ सायणाचार्यांस अनुसरून केला आहे. 'बकुर' हा शब्द पुनः ऋक्संहितेंत आलेला नाहीं. सायणाचार्यांप्रमाणें बकुर म्हणजे एक प्रकारचें तेजस्वी वज्र, तलवार.

'विस्तीर्ण प्रकाश'=' उरु ज्योतिः.' म्हणजे आर्यांची ज्ञानदृष्टि कीं जी जिकडे तिकडे पसरणारी होय.

वृत्तासाठीं पहिल्या पादांत 'वृकेण अश्विना,' दुसऱ्यांत 'इषं' आणि चव-

**सदा कवी सुमतिमा चके वां विश्वा धियो अश्विना प्रावतं मे ।**
**अस्मे रयिं नासत्या बृहन्तमपत्यसाचं श्रुत्यं रराथाम् ॥ २३ ॥**

सदा । कवी इति । सुऽमतिम् । आ । चके । वाम् । विश्वाः । धियः । अश्विना । प्र । अवतम् । मे ।
अस्मे इति । रयिम् । नासत्या । बृहन्तम् । अपत्यऽसाचम् । श्रुत्यम् । रराथाम् ॥ २३ ॥

---

स च वां युवाभ्यां प्रवर्ग्यविद्यां मधुविद्यां च वक्ष्यामीति पुरा कृतां प्रतिज्ञाम् ऋतायन् सत्याम् आत्मन इच्छन् मधु मधुविद्यां त्वाष्ट्रं त्वष्टुरिन्द्राल्लब्धं प्रवोचत् । प्रोक्तवान् । हे दस्रा दर्शनीयावश्विनौ वां युवयोः संबन्धि यदपिकक्ष्यं छिन्नस्य यज्ञशिरसः कक्षप्रदेशेन पुनःसंधानभूतं प्रवर्ग्यविद्याख्यं रहस्यं तदपि वां युवाभ्यां प्रवोचदित्यर्थः । इति ॥

---

## भाषायाम्.

२३. हे कवी (=मेधाविनौ) [अश्विनौ], [अहं] सदा (=नित्यं) वां (=युवयोः) सुमतिं (=शोभनां मतिम्=अनुग्रहात्मिकां बुद्धिम्) आ चके (=याचे)। हे अश्विना (=अश्विनौ), [युवां] मे (= मम) विश्वा धियः (=सकलानि भक्तिकर्माणि) प्र अवतं (=प्रकर्षेण रक्षतम्)। हे नासत्या (=नासत्यौ), [युवाम्] अस्मे (=अस्मभ्यं) बृहन्तं (=महान्तम्) अपत्यसाचम् (=अपत्यैरुपेतं) श्रुत्यं (=श्रवणीयं=श्रवणयोग्यं=कीर्तनीयं) रयिं (=धनं) रराथां (=प्रयच्छतम्) ॥

---

ध्यांत ‘उरु’ हीं पदें संधीशिवाय वाचून चवथ्यांत ‘आरिआय’ असें म्हणावें लागतें.

२२. यांत दध्यङ् ऋषीची कथा पुनः जाणविली आहे. दध्यङ् ऋषीला अश्वींनीं घोड्याचें शिर जोडिलें आणि त्याणें त्या घोड्याच्या तोंडानें अश्वींला मधाविषयींचें ज्ञान करून दिलें असें सू. ११६ मं. १२ यांत आणि त्याच्या टिपेंत आलें आहे तें पहा. मात्र प्रस्तुत ऋचेचा चवथा चरण दुर्बोध आहे तो ही सगळी कथा यथार्थ रीतीनें समजल्याशिवाय नीट बसणार नाहीं. ब्राह्मणादिकांत उपलब्ध जी दध्यङ् ऋषीची कथा तिच्या संबंधानें या चवथ्या चरणाचा सायणांनीं केलेला अर्थ भाषेंत उतरून घेतला आहे. आम्हीं अक्षरार्थ दिला आहे.

‘कक्ष पुनः जोडण्याचें त्वष्ट्याचें जें साधन’= ‘त्वाष्ट्रं यत् अपिकक्ष्यम्.’ अपिकक्ष्य म्हणजे खांक. ती पुनः जो-

२३. हे मेधावी [ अश्वी ] हो, तुमची सत्कृपा मी नित्य याचितों, [ तर ] हे अश्वी हो, [ तुम्ही ] माझ्या सर्व कर्मांवर प्रसाद करा. हे नासत्य हो, [तुम्ही] आम्हांला मोठी [आणि] अपत्ययुक्त [आणि] वर्णनीय संपत्ति द्या.

23. Daily do I implore, O wise ones, your benevolence. Look you, O As'vins, with favour upon all my devotions. Upon us, O Nâsatyas, confer ye a wealth magnificent, accompanied by progeny and fit to be renowned.

हण्याचें साधन हा अर्थ सायणास अनुसरून दिला आहे. ते ' त्वाष्ट्रम् ' याचा संबंध ' मधु ' शब्दाशीं घेतात.

वृत्तासाठीं पहिल्या पादांत ' आथर्वणाय अश्विना,' दुसऱ्यांत ' अश्विअं ' आणि ' प्रतिऐरयतम्,' तिसऱ्यांत ' वओचत् ' आणि चवथ्यांत '०कक्षिअम् ' असें म्हणावें लागतें.

२३. यांत कक्षीवान् ऋषि प्रार्थना करितो कीं, ' हे अश्वी हो, मी तुमचा अनुग्रह नित्य प्रार्थितों; तर माझ्या सकळ कर्मांवर तुम्ही प्रसाददृष्टीनें पाहा; आणि आम्हांला मोठी आणि संततिसहित आणि जगमान्य अशी संपत्ति द्या.'

वृत्तासाठीं तिसऱ्या चरणांत ' नासतिआ ' आणि चवथ्यांत ' श्रुतिअं ' असें म्हटलें पाहिजे.

**हिरण्यहस्तमश्विना रराणा पुत्रं नरा वध्रिमत्या अदत्तम्।**
**त्रिधा ह श्यावमश्विना विकस्तमुज्जीवस ऐरयतं सुदानू ॥ २४ ॥**

हिरण्यऽहस्तम् । अश्विना । रराणा । पुत्रम् । नरा । वध्रिऽमत्याः । अदत्तम् ।
त्रिधा । ह । श्यावम् । अश्विना । विऽकस्तम् । उत् । जीवसे । ऐरयतम् । सुदानू इति सुऽदानू ॥ २४ ॥

**एतानि वामश्विना वीर्याणि प्र पूर्व्याण्यायवोऽवोचन् ।**
**ब्रह्म कृण्वन्तो वृषणा युवभ्यां सुवीरासो विदथमा वदेम २५॥१७**

एतानि । वाम् । अश्विना । वीर्याणि । प्र । पूर्व्याणि । आयवः । अवोचन् ।
ब्रह्म । कृण्वन्तः । वृषणा । युवऽभ्याम् । सुऽवीरासः । विदथम् । आ । वदेम ॥ २५ ॥ १७ ॥

---

## भाषायाम्.

२४. हे रराणा (=रराणौ=दानशीलौ) नरा (=शूरौ) अश्विना (=अश्विनौ); [युवां] वध्रिमत्याः (=एतन्नाम्न्यै ब्रह्मवादिन्यै कस्यैचित् स्त्रियै) हिरण्यहस्तं [नाम] पुत्रम् अदत्तं (=प्रायच्छतम्)। ह (=अपि च किल) हे सुदानू अश्विना (=शोभनदानावश्विनौ), त्रिधा विकस्तं (=त्रेधा विच्छिन्नं) श्यावम् (=एतन्नामानमृषिम्) जीवसे (=उत्थाय पुनरपि जीवितुम्=उत्थाय पुनरपि यथा जीवेत्तथा तम्) उत् ऐरयतम् (=उदस्थापयतम्) ॥

असुरैस्त्रेधा खण्डितं शरीरं पुनरेकीकृत्योदगमयतमित्यर्थ इति सायणः ॥

२५. हे अश्विना (=अश्विनौ), [अनेन प्रकारेण] एतानि (=इदानीमुक्तानि) वां (=युवयोः) पूर्व्याणि (=पुरातनकालीनानि) वीर्याणि (=वीरकर्माणि) आयवः (=इमे मदादयो यजमानाः) प्र अवोचन् (=प्रोक्तवन्तः)। हे वृषणा (=वृषणौ=वीर्यवन्तौ) [अश्विनौ], ब्रह्म कृण्वन्तः (=स्तोत्रं कुर्वन्तो) [वयं] सुवीरासः (=सुवीराः=शोभनवीर्यवत्पुत्रपौत्रादिभिर्युक्ताः सन्तो) विदथं (=यज्ञम्) आ वदेम (="आभिमुख्येन स्तुतीरुच्चारयाम") ॥

२४. हे उदार अश्वी हो, हे शूर हो, [ तुम्ही ] वध्रिमतीला हिरण्यहस्त पुत्र देते झालां. आणि हे अश्वी हो, हे महोदार [ देव ] हो, चिरून तीन तुकडें केलेला श्याव तुम्ही पुनः जीवंत करून उठविते झालां.

२५. हे अश्वी हो, [ याप्रमाणें ] हीं तुमचीं पूर्वीचीं चरितें [ या ] भक्तांनीं वर्णिलीं आहेत. [ तर ] हे शूर [अश्वी] हो, तुम्हांप्रीत्यर्थ आराधना करणारे जे आम्ही ते शौर्यसंपन्न संततीनें युक्त होऊन यज्ञांत सूक्तें गाऊं असें करा.

24. O brave [and] bounteous As'vins, you gave Hiranyahasta to Vadhrimatî [ for ] a son ; [ and ] as is well known, you raised, O bounteous As'vins, S'yâva who was cut into three pieces, that he might live again.

25. These your ancient deeds, O As'vins, have these [ your ] worshippers [thus] sung. May we, O puissant As'vins, offering prayers to you, being blessed with excellent heroic progeny, sing forth [ your ] praises in sacrifice.

---

२४. वध्रिमतीला अश्वींनीं हिरण्यहस्त पुत्र दिला याविषयीं सू. ११६, मं. १३ आणि त्याजवरील टीप पहा. श्याव नांवाचा ऋषि होता त्याला असुरांनीं चिरून त्याचे तीन तुकडे केले असतां त्याला अश्वींनीं पुनः जोडून जीवंत करून उठविलें असें सायणाचार्य म्हणतात. कितीएक विद्वान् श्याव म्हणजे हिरण्यहस्ताचेंच नांव होय असें समजतात. परंतु त्याला १०. ६५. १२ यांत 'श्यावं पुत्रं वध्रिमत्या अजिन्वतम्' असें आहे त्याचाच जर आधार असेल तर तो पुरता आधार नाहीं ( त्या मंत्रावरचें सायणभाष्य पहातां सायण 'श्याव' शब्दाचा कांहींच अर्थ करीत नाहींत असें दिसतें ). याच सूक्ताचा ८ वा मंत्र आणि टीप पहा.

'पुनः जीवंत करून उठविते झालां' ='जीवसे उद् ऐरयतम्.' अक्षरार्थ 'जगण्यासाठीं उठविते झालां' असा आहे.

२५. या ऋचेंत सूक्ताचा उपसंहार आहे. कक्षीवान् म्हणतो, 'हे अश्वी हो, याप्रमाणें तुमचीं पुराणचरितें आम्हीं भक्तांनीं वर्णिलीं आहेत. आणि आम्ही तुम्हांप्रीत्यर्थ स्तोत्र म्हणून हवि अर्पण करीत असतां वास्तव तुमच्या प्रसादानें आम्ही उत्तम संततियुक्त होऊं आणि तुम्हांप्रीत्यर्थ यज्ञ करून तुमचें स्तोत्र करीत जाऊं असें करा.'.

वृत्तासाठीं पहिल्या पादांत 'वीरिआणि' आणि दुसऱ्या पादांत 'प्र पूर्विआणि आयवो अवोचन्' असें म्हणावें लागतें.

## सूक्तम् ११८.

कक्षीवान् ऋषिः । अश्विनौ देवता । त्रिष्टुप् छन्दः ॥

**आ वां रथो अश्विना श्येनपत्वा सुमृळीकः स्ववाँ यात्वर्वाङ् ।**
**यो मर्त्यस्य मनसो जवीयान्त्रिवन्धुरो वृषणा वातरंहाः ॥ १ ॥**

आ । वाम् । रथः । अश्विना । श्येनऽपत्वा । सुऽमृळीकः । स्वऽवान् । यातु । अर्वाङ् ।

यः । मर्त्यस्य । मनसः । जवीयान् । त्रिऽवन्धुरः । वृषणा । वातऽरंहाः ॥ १ ॥

---

### भाषायाम्.

१. हे अश्विना (=अश्विनौ), श्येनपत्वा (=श्येनः पक्षीव शीघ्रं पतन्) सुमृळीकः (=शोभनसुखकारी) स्ववान् (=धनवान्) वां (=युवयो) रथः अर्वाङ् आ यातु (=अस्मदभिमुखः सन्नायातु) । यो [ रथः ] हे वृषणा (=वृषणौ=वीर्योपेतौ), मर्त्यस्य मनसो जवीयान् (=मनुष्यस्य मनसोपि वेगवत्तरः) त्रिवन्धुरः (=ईषारूपत्रिविधवन्धनकाष्ठयुक्तः) [ अपि च ] वातरंहाः (=वातस्येव रंहो वेगो यस्य स) [ भवति ] ॥

स्ववान् धनवानिति यत्सायणस्तदेव समीचीनं विभाति । केचित्पाश्चात्यास्तु विद्वांसः स्ववान् सुअवान् सुअवोवान् सुरक्षणं इति ।

त्रिवन्धुर इत्यत्र वन्धुरं वेष्टितं सारथेः स्थानम् । त्रिप्रकारेण वन्धुरेण युक्तः इति सायणः ॥

## सूक्त ११८.

ऋषि—कक्षीवान्. देवता—अश्वी. वृत्त—त्रिष्टुभ्.

१. हे अश्वी हो, तुमचा गरुडवाहन, कल्याणकारक [आणि] धनसंपन्न रथ इकडे येओ. जो [रथ] हे अश्वी हो, मर्त्यांच्या मनापेक्षांहि चपळ, [आणि] हे वीर्यवंत हो, तीन दांड्यांचा [आणि] वातवेगी [होय].

## HYMN 118.

To the *As'vins.* By *Kakshîvân*, the author of the previous hymn. Metre—*Trishtubh.*

1. May your falcon-flying and blissful and rich chariot come hither-wards; which is swifter than the mind of the mortal, is, O brave As'vins, of a triple seat and of the speed of a tempest.

---

१. हेंहि सूक्त अश्वींविषयींचेंच असून कक्षीवान् ऋषीचेंच आहे.

'गरुडवाहन '=' श्येनपत्वा.' अक्षरशः 'श्येनांच्या योगानें उडणारा,' 'श्येन पक्षी ज्याला जोडिले आहेत असा.' श्येन म्हणजे गरुड अथवा गरुडासारिखाच एक अतिवेगवान् पक्षी.

'तीन दांड्यांचा '=' त्रिवन्धुरः.' सू. ४७ मं. २ आणि त्याजवरील टीप पहा.

त्रिवन्धुरेण त्रिवृता रथेन त्रिचक्रेण सुवृता यातमर्वाक् ।
पिन्वतं गा जिन्वतमर्वतो नो वर्धयतमश्विना वीरमस्मे ॥ २ ॥

त्रिऽवन्धुरेण । त्रिऽवृता । रथेन । त्रिऽचक्रेण । सुऽवृता । आ । यातम् । अर्वाक् ।
पिन्वतम् । गाः । जिन्वतम् । अर्वतः । नः । वर्धयतम् । अश्विना । वीरम् । अस्मे इति । ॥ २ ॥

प्रवद्यामना सुवृता रथेन दस्राविमं शृणुतं श्लोकमद्रेः ।
किमङ्ग वां प्रत्यवर्तिं गमिष्ठाहुर्विप्रासो अश्विना पुराजाः ॥ ३ ॥

प्रवत्ऽयामना । सुऽवृता । रथेन । दस्रौ । इमम् । शृणुतम् । श्लोकम् । अद्रेः ।
किम् । अङ्ग । वाम् । प्रति । अवर्तिम् । गमिष्ठा । आहुः । विप्रासः । अश्विना । पुराऽजाः ॥ ३ ॥

---

## भाषायाम्.

२. त्रिवन्धुरेण (=त्रिप्रकारसारथिस्थानोपेतेन ) त्रिवृता (=त्रिकोणेन ) त्रिचक्रेण (=चक्रत्रयोपेतेन ) सुवृता (=शोभनं गच्छता ) रथेन अर्वाक् (=अस्मदभिमुखम् ) आ यातम् (=आगच्छतम् ) । हे अश्विना (=अश्विनौ ), [ युवां नो ] गाः पिन्वतं (=पयसा पूरयतम् ) अर्वतो नः जिन्वतम् ( =अस्माकम् अश्वान् सामर्थ्योपेतान् कुरुतम् ) [ अपि च ] अस्मे (= अस्माकं ) वीरं (= पुत्रादिकं संतानं ) वर्धयतं (=प्रवृद्धं कुरुतम् ) ॥

३. हे दस्रौ (=दंससाम् अद्भुतकर्मणां कर्तारौ ), प्रवद्यामना (=शीघ्रगमनेन ) सुवृता ( शोभनं यथा तथा वर्तमानेन=गच्छता ) [ युवयो ] रथेन [ आगत्य ] अद्रेः (=" स्तोतुः ") इमं श्लोकं (=स्तोत्रं ) शृणुतम् । अङ्ग अश्विना (=हे भद्रावश्विनौ ), पुराजाः ( =पुराकाले जाताः=प्राचीना ) विप्रासः ( =विप्राः=कवयः) वां (=युवाम् ) अवर्तिं [ प्रति ] (=उपासकानां दारिद्र्यं प्रति ) गमिष्ठा (=गमिष्ठौ=गन्तृतमौ=शीघ्रतमं गन्तारौ ) किं (=न किम् ) आहुः ?

२. तीन दांड्यांच्या, त्रिकोणी [आणि] तीनचाकी [आणि] चांगला चालणाऱ्या रथांत बसून [तुम्ही] इकडे या. [आमच्या] गाई [दुधानें] भरा, आमचे घोडे चपळ करा [आणि] हे अश्वी हो, आमचे शूर पुत्रपौत्र वृद्धिंगत करा.

३. हे अद्भुत चमत्कार करणारे हो, [तुम्ही आपल्या] शीघ्रगामी, चांगला चालणाऱ्या रथांत बसून [येऊन] [या] स्तोत्याचें हें स्तोत्र ऐका. हे अश्वी हो, [तुम्ही] भक्तांच्या दैन्याप्रत उत्तम रीतीनें पावणारे [आहां असें] प्राचीन कवि म्हणाले [नाहींत] काय?

2. In [your] triple-seated, triangular, three-wheeled, easy-rolling car come ye hitherwards. Fill [our] cows with milk, enliven our horses, [and] make, O As'vins, our brave progeny to thrive.

3. [Come] ye, O performers of miraculous exploits, in your rapid, easy-rolling chariot, [and] hear this hymn of the poet. Do [not] the ancient poets call you, O As'vins, the readiest helpers of poverty?

---

२. 'तीन दांड्यांच्या' = 'त्रिकोणी.' याविषयीं सू. ४७ मं. २ आणि त्याजवरील टीप पहा.

'तीनचाकी' = 'त्रिचक्रेण.' इतर रथांस दोन चाकें, पण अश्वींच्या रथाचे इतर अवयव त्रिसंख्याक असल्यामुळें त्याचीं चाकें सुद्धा तीन असल्याविषयीं उल्लेख दुसरे ठिकाणींहि आला आहे. ऋ. १. १५७. ३; १. १८३. १ इत्यादि मंत्र पहा.

'वृद्धिंगत करा' = 'वर्धयतम्.' म्हणजे वाढवा, त्याचें पोषण करून प्रतिपालन करा.

३. मंत्राचा भावार्थ उघडच आहे. पण यांत 'अद्रि' शब्दाचे साधारण नेहमींचे अर्थ सोडून 'स्तोता' असा अर्थ सायणाचार्यांस अनुसरून केलेला आहे. कितीएक विद्वान् सोम काढण्याचा 'ग्रावा' त्याचा आवाज ऐका असा अर्थ करितात. परंतु ऋ. ३. ५८. ३ यांत प्रस्तुतचा मंत्र थोडक्याच फेरफारानें आला आहे तेथेंहि 'अद्रि' म्हणजे स्तोता असा अर्थ सायणांनीं केला आहे. 'भेजाते अद्री रथ्येव पन्थाम्' इ० (७. ३९. १) आणि 'युज्याताम् अद्री अध्वरस्य पेशः' (७. ४२. १) यांतहि सायणांनीं त्याच्या जवळ जवळ व्याख्या केली आहे. यावरून 'अद्रि' शब्दाचा

आ वां श्येनासो अश्विना वहन्तु रथे युक्तास आशवः पतङ्गाः ।
ये अप्तुरो दिव्यासो न गृध्रा अभि प्रयो नासत्या वहन्ति ॥ ४ ॥

आ । वाम् । श्येनासः । अश्विना । वहन्तु । रथे । युक्तासः । आशवः । पतङ्गाः ।
ये । अप्ऽतुरः । दिव्यासः । न । गृध्राः । अभि । प्रयः । नासत्या । वहन्ति ॥ ४ ॥

आ वां रथं युवतिस्तिष्ठदत्र जुष्ट्वी नरा दुहिता सूर्यस्य ।
परि वामश्वा वपुषः पतङ्गा वयो वहन्त्वरुषा अभीके ॥ ५ ॥ १८ ॥

आ । वाम् । रथम् । युवतिः । तिष्ठत् । अत्र । जुष्ट्वी । नरा । दुहिता । सूर्यस्य ।
परि । वाम् । अश्वाः । वपुषः । पतङ्गाः । वयः । वहन्तु । अरुषाः । अभीके ॥ ५ ॥ १८ ॥

---

## भाषायाम्.

४. हे अश्विना (=अश्विनौ), [ युवयो ] रथे युक्तासः (=युक्ताः=वहनस्थाने योजिता ) आशवः (=शीघ्रगामिनः ) पतङ्गाः (=पक्षैरुत्पतन्तः ) श्येनासः (=श्येनाः =श्येनपक्षिणः ) वां ( =युवाम् ) आ वहन्तु (=आनयन्तु ), ये [ श्येनाः ] अप्तुरः (= आकाशात्पतन्ति मेघोदकानीव तरस्विनः सन्तो ) दिव्यासो गृध्रा न (=दिव्या गृध्रा इव=" अन्तरिक्षे वर्तमाना गृध्राख्याः पक्षिण इव ") हे नासत्या (=नासत्यौ ), [ युवाम् ] अभि प्रयः (=हविर्लक्षणमन्नं प्रति ) वहन्ति (=नयन्ति ) ॥

५. हे नरा (=नरौ=शूरौ ), सूर्यस्य युवतिः (=तरुणी ) दुहिता (=सूर्या नाम ) जुष्ट्वी (=जुष्टा=सेवमाना भूत्वा=युवां वृत्वा ) वाम् अत्र रथं (=युवयोरिमं रथम् ) आ तिष्ठत् (=आरूढवती ) । [ तेन रथेन ] [ युवयोर् ] वपुषः (=सुन्दराः) पतङ्गाः (=उत्पतन्तः ) अरुषाः (=अरुणवर्णा ) अश्वा वां (=युवां) वयः अभीके (=हविरन्नं प्रति ) परि वहन्तु (=परिप्रापयन्तु=आनयन्तु ) ॥

---

अर्थ 'स्तोता' अथवा 'यजमान' असा पूर्वपरंपरागत आला आहे असें अनुमान होतें. तसा अर्थ कसाहि झालेला असो, पण तसा होतो याविषयीं विश्वास ठेविला पाहिजे असें दिसतें.

'प्राचीन कवि म्हणाले नाहींत काय'

४. हे अश्वी हो, [तुमच्या] रथाला जोडिलेले वेगवान् [आणि] उडत जाणारे श्येन तुम्हांला इकडे घेऊन येओत; जे चपलगामी [श्येन], हे नासत्य हो, दिव्य गृध्रांसारिखे हविरन्नाप्रत [तुम्हांला] घेऊन येत असतात.

५. हे शूर हो, सूर्याची तरुण कन्या आनंदित होऊन तुमच्या याच रथावर चढून बसली. [तर] [तुमचे] सुंदर, उडणारे [आणि] अरुणवर्णाचे घोडे तुम्हांला [त्या रथांत बसवून] [आमच्या] हविरन्नाप्रत घेऊन येओत.

4. May the swift [and] flying falcons, yoked to [your] car, bring you hither, O As'vins; which, rapid in their descent, take [you], O Nâsatyas, to the sacrificial food like heavenly vultures.

5. The youthful daughter of Sûrya mounted, O brave ones, this your car of her own choice. May your beautiful, flying, tawny horses bring you [in it] towards [our] offering.

---

=' आहुर्विप्रासः पुराजाः.' यावरून उघड होतें कीं कक्षीवान् ऋषि आपल्याला अनाद्यंत काळचें म्हणजे त्रिकाळचें ज्ञान. आणि स्थिति आहे असें समजत नाहीं. इतर कवींसारिखांच तो आपल्यास वर्तमानकाळचा मानून जुन्या कवींस प्राचीन कवि म्हणत आहे.

---

४. अश्वींच्या रथाला श्येन अथवा गरुड पक्षी जोडिलेले असतात असें याच सूक्ताच्या पहिल्या मंत्रांत जाणविलें आहे तें पहा. सायणाचार्य दोनीहि ठिकाणीं 'श्येन' शब्दाचा अर्थ 'घोडा' असा करितात. पर्यवसानीं पहातां तेंहि योग्य दिसतें, कारण घोड्याचे ऐवजीं जोडलेले म्हणून त्यांस घोडे अथवा वाहन म्हटलें तरी चालेल.

'दिव्य गृध्रांसारिखे'=' दिव्यासः न गृध्राः.' म्हणजे उंच आकाशांत संचार करणारे असें सायण म्हणतात तें घेतलें पाहिजे. गृध्र जसे उंच आकाशांत उडतात तसे तुमचे श्येन तुमच्या रथाला जमिनीवरून आणोत असा उपमेचा भावार्थ दिसतो.

'चपलगामी'=' अप्तुरः.' अक्षरार्थ इतकाच आहे कीं आकाशांतून पडणाऱ्या मेघोदकाप्रमाणें वेगवान्. 'आपः' म्हणजे तळ्यांत वगैरे सांचलेल्या उदकाचें नांव नव्हे, तर आकाशांतून पर्जन्यवृष्टीच्या रूपें पडणारीं जीं उदकें तीं

उद्वन्दनमैरतं दंसनाभिरुद्रेभं दस्रा वृषणा शचीभिः ।
निष्टौग्र्यं पारयथः समुद्रात्पुनश्च्यवानं चक्रथुर्युवानम् ॥ ६ ॥

उत् । वन्दनम् । ऐरतम् । दंसनाभिः । उत् । रेभम् । दस्रा । वृषणा । शचीभिः ।
निः । तौग्र्यम् । पारयथः । समुद्रात् । पुनरिति । च्यवानम् । चक्रथुः । युवानम् ॥ ६ ॥

---

## भाषायाम्.

६. [ युवां ] वन्दनं [ नामर्षिं ) दंसनाभिः ( =युवयोर्दंसोभिः=अद्भुतकर्मभिः ) उद् ऐरतम् (= उदैरयतम्=उद्धृतवन्तौ । हे दस्रा (= दस्रौ=अद्भुतकर्मकारिणौ ) वृषणा (= वृषणौ=वीर्यवन्तौ ); [ युवां ] शचीभिः (= युवयोरद्भुतकर्मभी ) रेभम् [ ऋषिम् ] उद् [ ऐरयतम् ] । [ युवां ] तौग्र्यं (=तुग्रस्य राज्ञः पुत्रं भुज्युं ) समुद्रात् निष्पारयथः (=तीरदेशं प्रापयथः=प्रापयथुः) । [ युवां ] [ च्यवानं नामर्षिं ] पुनः (=वृद्धं सन्तमपि ) युवानं चक्रथुः ॥

---

' आपः ' त्यांसारिखे चपळ असा ' अप्तुरः ' याचा अर्थ आहे.

वृत्तसुखासाठीं तिसऱ्या चरणांत 'दिविआसो ' आणि चवथ्या चरणांत ' नासतिआ ' असें म्हणावें लागतें.

५. सूर्य याची कन्या सूर्या हिणें अश्वींस वरून त्यांच्या रथावर येऊन बसली असें पूर्वी ( सू. ११६ मं. १७ यांत ) सांगितलेंच आहे. ' तर ती ज्या रथावर चढून बसली त्यांत तुम्हांला बसवून हे अश्वी हो, तुमचे सुंदर आणि चपळ घोडे तुम्हांला येथें घेऊन येओत,' असें ऋषि म्हणतो.

' आनंदित होऊन '=' जुष्टी.' हें ' जुष्टा ' याच्या ऐवजीं आहे. तिणें अश्वींस ' वरून ' मग त्यांच्या रथावर बसली, दुसऱ्यांनीं बसविलेली नाहीं.

वृत्तासाठीं दुसऱ्या पादांत ' सूरिअस्य ' असें म्हणावें लागतें.

६. हे अद्भुत चमत्कार करणारे; वीर्यवंत [अश्वी] हो, [तुम्ही आपल्या] चमत्कारांनीं वन्दनाचा उद्धार करिते झालां, [आपल्या] पराक्रमांनीं रेभाचा उद्धार करिते झालां. [तुम्ही] तुग्राच्या पुत्राला समुद्रांतून पार पाडिते झालां. [तुम्ही] च्यवानाला पुनः तरूण करिते झालां.

6. You raised Vandana through your miracles, you raised, O puissant achievers of brave deeds, Rebha through your miraculous actions. You took the son of Tugra to the shore from the deep, you made Chyavâna young again.

---

६. 'वन्दन.' सू. ११२ मं. ५, सू. ११६ मं. ११, सू. ११७ मं. ५ हीं सूक्तें आणि तेथील टिपा पहा.

'रेभ.' सू. ११२ मं. ५, सू. ११६ मं. २४ पहा.

'तुग्र.' सू. ११६ मं. ३, सू. ११७ मं. १४ पहा.

'च्यवान.' सू. ११६ मं. १०, सू. ११७ मं. १३ पहा.

**युवमत्रयेऽवनीताय तप्तमूर्जमोमानमश्विनावधत्तम् ।**
**युवं कण्वायापिरिप्ताय चक्षुः प्रत्यधत्तं सुष्टुतिं जुजुषाणा ॥ ७ ॥**

युवम् । अत्रये । अवऽनीताय । तप्तम् । ऊर्जम् । ओमानम् । अश्विनौ । अधत्तम् ।
युवम् । कण्वाय । अपिऽरिप्ताय । चक्षुः । प्रति । अधत्तम् । सुऽस्तुतिम् । जुजुषाणा ॥ ७ ॥

**युवं धेनुं शयवे नाधितायापिन्वतमश्विना पूर्व्याय ।**
**अमुञ्चतं वर्तिकामंहसो निः प्रति जङ्घां विश्पलाया अधत्तम् ॥८॥**

युवम् । धेनुम् । शयवे । नाधिताय । अपिन्वतम् । अश्विना । पूर्व्याय । अमुञ्चतम् । वर्तिकाम् । अंहसः । निः । प्रति । जङ्घाम् । विश्पलायाः । अधत्तम् ॥ ८ ॥

---

## भाषायाम्.

७. हे अश्विनौ, युवं (=युवाम्) अवनीताय (=“ पीडायन्त्रगृहेऽवस्तान्नीताय ”) अत्रये (=अत्रिनाम्न उपासकाय) तप्तं (=तापयुक्तम्) [अग्निम्] [अपाहरतम्] [अपि च] ऊर्जम् (=अन्नम्) ओमानं (=सुखं च) अधत्तं (=प्रायच्छतम्) (=अत्रेस्तप्तमग्निमशामयतं तस्मै च सुखकरमन्नं प्रायच्छतम्)। युवं (=युवाम्) अपिरिप्ताय (=“ पटलेन पिहितदृष्टये ”=प्रापितान्ध्याय) कण्वाय [नामोपासकाय] सुष्टुतिं (=शोभनां तेन कृतां स्तुतिं) जुजुषाणा (=जुजुषाणौ=अतिशयेन सेवमानौ=अनुग्रहात्मिकया बुद्ध्या शृण्वन्तौ) चक्षुः (=दर्शनसामर्थ्यं) प्रति अधत्तं (=पुनरपि प्रायच्छतम्)॥

८. हे अश्विना (=अश्विनौ), युवं (=युवां) नाधिताय (= नाथिताय=नाथते=याचमानाय=साहाय्यं प्रार्थयमानाय=दुःखिताय) पूर्व्याय (=पुरातनाय) शयवे (=एतन्नाम्न उपासकाय) धेनुम् अपिन्वतं (=पयसा पूरितवन्तौ) [युवां] वर्तिकां (=“ वृकेण ग्रस्तां चटकसदृशीं शकुनीम्) अंहसः (=वृकास्यलक्षणात्पापात् ”) निरमुञ्चतम् (=निर्गमय्य अमोचयतम्)। [युवां] विश्पलायां (=खेलस्य नाम्नो राज्ञः विश्पलाया नाम स्त्रिया) जङ्घां प्रति अधत्तं (=प्रत्यस्थापयतम्)॥

७. हे अश्वी हो, तुम्ही पीडायंत्रांत कोंडून टाकिलेल्या अत्रीचा ताप [काढून टाकिते झालां] [आणि] त्याला अन्न [आणि] सुख देते झालां. तुम्ही डोळे फोडिलेल्या कण्वाची उत्तम स्तुति आनंदानें ऐकून घेऊन त्याला पुन: दृष्टि देते झालां.

7. You [removed] the burning heat for Atri who was confined, and, O As'vins, gave him food [and] comfort. You, accepting with pleasure his excellent prayer, restored the eye to blind Kanva.

८. हे अश्वी हो, तुम्ही विनवणी करणाऱ्या पुरातन शयूकारणें गाय दुधानें भरिते झालां. [तुम्ही] वर्तिकेला संकटांतून मुक्त करिते झालां. [तुम्ही] विश्पलेला दुसरी जांघ करून लाविते झालां.

8. You, O As'vins, filled with milk the cow for antient S'ayu who prayed for help. You freed the quail from danger. You restored the thigh to Vis'palâ.

---

७. अत्रीची काय कथा आहे याविषयीं सू. ११६ मं. ८, सू. ११७ मं. ३, सू. ११२ मं. ७, १६ इत्यादि आणि टिपा पहा.

'कण्व.' याविषयीं सू. ११२ मं. ५, सू. ११७ मं. ८ आणि त्यांजवरील टीप पहा.

८. शयूविषयीं सू. ११२ मं. १६, २२; सू. ११७ मं. २० पहा.

'वर्तिका' म्हणजे सू. ११२ मं. ८ यांत सांगितलेली चिमणीच. त्या मंत्रावरील टीप पहा.

'विश्पला.' सू. ११२ मं. १० आणि टीप पहा.

युवं श्वेतं पेदव इन्द्रजूतमहिहनमश्विनादत्तमश्वम् ।
जोहूत्रमर्यो अभिभूतिमुग्रं सहस्रसां वृषणं वीड्वङ्गम् ॥ ९ ॥

युवम् । श्वेतम् । पेदवे । इन्द्रऽजूतम् । अहिऽहनम् । अश्विना । अदत्तम् । अश्वम् ।
जोहूत्रम् । अर्यः । अभिऽभूतिम् । उग्रम् । सहस्रऽसाम् । वृषणम् । वीळुऽअङ्गम् ॥ ९ ॥

ता वां नरा स्ववसे सुजाता हवामहे अश्विना नाधमानाः ।
आ न उप वसुमता रथेन गिरो जुषाणा सुविताय यातम् ॥ १० ॥

ता । वाम् । नरा । सु । अवसे । सुऽजाता । हवामहे । अश्विना । नाधमानाः ।
आ । नः । उप । वसुऽमता । रथेन । गिरः । जुषाणा । सुविताय । यातम् ॥ १० ॥

---

## भाषायाम्.

९. हे अश्विना (=अश्विनौ), युवं (=युवां) पेदवे (=एतन्नाम्ने राजर्षये) श्वेतं (=श्वेतवर्णम्) इन्द्रजूतम् (=इन्द्रप्रेरितम्) अहिहनं (=शत्रुघातकं) जोहूत्रम् (=अतिशयेन युद्धार्थं शत्रूणामाह्वातारम्) अर्यः (=अरेः) अभिभूतिम् (=अभिभवितारं=जेतारम्) उग्रं (=बलवन्तं) सहस्रसां (=सहस्रसंख्याकस्य धनस्य दातारं) वृषणं (=युवानं) वीड्वङ्गं (=दृढावयवम्) [एतादृशम्] अश्वम् अदत्तं (=प्रायच्छतम्) ॥

१०. हे नरा (=नरौ=शूरौ) अश्विना (=अश्विनौ), सुजाता (=सुजातौ=सुजन्मानौ=अभिजातौ) ता (=तौ=तादृशौ=पूर्वोक्तौ) वां (=युवां) नाधमानाः (=नाथमानाः=नाथन्तः=साहाय्यं याचमानाः) अवसे (=रक्षणाय) सु हवामहे (=अतिशयेन आह्वयामः) । [अतः कारणाद्] गिरो जुषाणा (=अस्माकं स्तुतीः सेवमानौ) [युवां] सुविताय (=अस्माकं सुखाय=अस्मान् सुखिनः कर्तुं) वसुमता (=धनवता) रथेन नः उप आ यातम् (=अस्मान् प्रति आगच्छतम्) ॥

९. हे अश्वी हो, तुम्ही पेदूला शुभ्रवर्णाचा, इन्द्रानें पाठविलेला, शत्रूंला मारून टाकणारा, मोठ्यानें खिंकाळणारा, शत्रूचा पराभव करणारा, सामर्थ्यवान्, सहस्रावधि धन मिळवून देणारा, तरूण [ आणि ] अंगानें बळकट असा घोडा देते झालां.

१०. तर असे जे तुम्ही त्या तुम्हां सुजन्म्यांला, हे शूर अश्वी हो, आम्ही मोठी विनवणी करून संरक्षणासाठीं बोलावितों. [ आमचीं ] स्तोत्रें [ तुम्ही ] सेवन करून धनसंपूर्ण रथांत बसून [आमच्या ] कल्याणासाठीं आम्हांजवळ या.

9. You, O As'vins, gave to Pedu a horse that was white, sent by Indra, destructive of the enemies, neighing lustily, able to conquer the enemy, stout, winning a thousandfold spoil, young and of strong limbs.

10. Therefore, O brave As'vins, we entreat and invoke you, who are noble-born, for [ our ] protection. Come ye, accepting our prayers with pleasure, with your car filled with wealth to bless us.

---

९. 'पेदु.' या भक्ताविषयीं सू. ११७ मं. ९ आणि त्याजवरील टीप पहा.

वृत्तासाठीं चवथ्या पादांत 'वीडु-अङ्गम्' असें वेगळें वाचलें पाहिजे.

१०. सूक्त संपत आलें तसा ऋषि आतां अश्वींपाशीं मागावयाचा वर मागत आहे.

'तर असे जे तुम्ही त्या'='ता.' म्हणजे, वरील नऊ मंत्रांत सांगितल्याप्रमाणें पराक्रम केलेले.

वृत्तसुखासाठीं पहिल्या पादांत 'सु-अवसे.' असें वाचावें लागतें.

आ श्येनस्य जवसा नूतनेनास्मे यातं नासत्या सजोषाः ।
हवे हि वामश्विना रातहव्यः शश्वत्तमाया उषसो व्युष्टौ ११॥१९.

आ । श्येनस्य । जवसा । नूतनेन । अस्मे इति । यातम् । नासत्या । सऽजोषाः ।
हवे । हि । वाम् । अश्विना । रातऽहव्यः । शश्वत्ऽतमायाः । उषसः । विऽउष्टौ ॥ ११ ॥ १९ ॥

---

## भाषायाम्.

११. हे नासत्या (=नासत्यौ), [=युवां] सजोषाः (=सजोषसौ=संगतौ सन्तौ) श्येनस्य नूतनेन जवसा (=श्येनस्य शकुनस्य प्रत्यग्रेण वेगेन) अस्मे आ यातम् (=अस्मान् प्रति आगच्छतम्)। हि (=यस्मात्) हे अश्विना (=अश्विनौ), शश्वत्तमायाः (=अतिशयेन नित्यायाः) उषसो व्युष्टौ (=विवासने=उदयकाले) रातहव्यः (=दत्तहविष्कः) [अहं] वां (=युवां) हवे (=आह्वयामि)॥

श्येनस्येत्यत्र सायणस्तु "अश्वस्य नूतनेन नवतरेण प्रत्यग्रेण जवसा वेगेन सहितौ युवाम्" इत्याह ॥

---

## सूक्तम् ११९.

दैर्घतमसः कक्षीवानृषिः । अश्विनौ देवता । जगती छन्दः ॥

आ वां रथं पुरुमायं मनोजुवं जीराश्वं यज्ञियं जीवसे हुवे ।
सहस्रकेतुं वनिनं शतद्वसुं श्रुष्टीवानं वरिवोधामभि प्रयः ॥ १ ॥

आ । वाम् । रथम् । पुरुऽमायम् । मनःऽजुवम् । जीरऽअश्वम् । यज्ञियम् । जीवसे । हुवे ।
सहस्रऽकेतुम् । वनिनम् । शतत्ऽवसुम् । श्रुष्टीऽवानम् । वरिवःऽधाम् । अभि । प्रयः ॥ १ ॥

---

## भाषायाम्.

१. [हे अश्विनौ], जीवसे (=जीवितुं=जीवनाय=आयुर्वर्धनाय ?) पुरुमायं (=बहुविधाश्चर्यकर्माणं) मनोजुवं (=मनोवेगसदृशवेगं) जीराश्वं (=वेगवदश्व-

११. हे नासत्य हो, श्येनाच्या नवीन वेगानें तुम्ही दोघेहि एकत्र आम्हांप्रत या. कारण कीं हे अश्वी हो, मी सनातन उषेच्या उदयाबरोबर हवि अर्पण करून तुम्हांला बोलावीत आहें.

11. With the fresh speed of a falcon come ye together, O Nâsatyas, unto us. For having offered the sacrifice at the dawn of eternal Ushas I am invoking you.

११. येथें हें सूक्त संपलें. 'हे अश्वी हो, तुम्ही फार सत्वर या' यापेक्षां या ऋचेंत कांहीं विशेष प्रार्थना नाहीं. वृत्तासाठीं दुसऱ्या चरणांत 'अस्मे' आणि 'नासतिआ' आणि चवथ्यांत 'विउष्टौ' असें वाचावें लागतें.

## सूक्त ११९.

ऋषि—पूर्वींचाच (म्ह० कक्षीवान्). देवता—अश्वी. वृत्त—जगती.

HYMN 119.

To the *As'vins.* By *Kakshîvân*, the author of the previous hymn. Metre—*Jagatî.*

१. [हे अश्वी हो,] तुमचा नानाश्चर्यकारी, मनाप्रमाणें शीघ्र, चपळ घोडे जोडिलेला, पूज्य, सहस्र पताका असलेला, उदार, शेकडो संपत्तींनीं भरलेला, सुखदाता आणि धनदायक रथ जीवनासाठीं मी [या] हविरन्नाप्रत बोलावितों.

1. For prolonging life I invoke towards [this] oblation your chariot, the worker of many miracles, quick as fancy, drawn by swift horses, fit to be worshipped, fitted with a thousand banners, bounteous, filled with hundredfold wealth, giver of happiness, and bestower of riches.

१. हेंहि सूक्त कक्षीवान् ऋषीचेंच असून याची देवताहि अश्वीच होत. या पहिल्या मंत्रांत केवळ अश्वींच्या रथाचीं पुष्कळ विशेषणें आहेत, आणि तो रथ आपल्या हविरन्नाजवळ अश्वींला घेऊन येओ अशी ऋषि प्रार्थना करीत आहे. 'जीवनासाठीं' = 'जीवसे.' अक्षरशः अर्थ, जगण्यासाठीं; म्हणजे आमचें आयुष्य वाढावें या हेतूनें, असा भावार्थ दिसतो. सायणाचार्य याहून अर्थ स्पष्ट करीत नाहींत.

वृत्तासाठीं दुसऱ्या चरणांत 'जीराशुअं' असें म्हणावें लागतें.

ऊर्ध्वा धीतिः प्रत्यस्य प्रयामन्यधायि शस्मन्त्समयन्त आ दिशः ।
स्वदामि घर्मं प्रति यन्त्यूतय आ वामूर्जानी रथमश्विनारुहत् ॥२॥

ऊर्ध्वा । धीतिः । प्रति । अस्य । प्रऽयामनि । अधायि । शस्मन् ।
सम् । अयन्ते । आ । दिशः ।
स्वदामि । घर्मम् । प्रति । यन्ति । ऊतयः । आ । वाम् । ऊर्जानी ।
रथम् । अश्विना । आ । अरुहत् ॥ २ ॥

---

युक्तं ) यज्ञियं (=यज्ञार्हं=पूज्यं ) सहस्रकेतुं (=सहस्रसंख्याकैर्ध्वजैर्युक्तं) वनिनं (=धनस्य दातारं ) शतद्वसुं ( =शतधनवन्तं ) श्रुष्टीवानं ( =सुखकारिणं ) वरिवोधां (=धनस्य दातारं) वां (=युवयो ) रथम् अभि प्रयः ( =हविर्लक्षणमन्नं प्रति ) हुवे (=अहमाह्वयामि ) ॥

---

## भाषायाम्.

२. [ हे अश्विनौ ], अस्य ( =युवयो रथस्य ) प्रयामनि ( =प्रगमने सति=अत्रायातुं निर्गमने सति ) धीतिः ( =अस्माकं बुद्धिः ) शस्मन् (=शस्मनि=शंसने=स्तोत्रे ) ऊर्ध्वा ( =उत्थिता=प्रवृत्ता ) प्रत्यधायि ( =पुनरपि क्रियते=ह्यस्तनकालादनन्तरं पुनरपि स्तोत्रकरणे झटिति प्रवृत्ता भवति ) । दिशः ( =" देष्ट्र्याः स्तुतयः" ) सम् आ अयन्ते ( =समुच्चयेन संगच्छन्ते=बहुविधा युष्मद्विषयाः स्तुतयः स्फुरन्ति ) [ अहं ] घर्मं ( =महावीरनामपात्रस्थं प्रवर्ग्यसंबन्धि एतन्नाम हविः ) स्वदामि ( =स्वादूकरोमि ) ऊतयः ( =सहायभूता ऋत्विजः ) प्रति यन्ति ( =ह्यस्तनकालादनन्तरं पुनरपि मम साहाय्यार्थमागच्छन्ति ) अपि च हे अश्विना (=अश्विनौ ), ऊर्जानी ( =" सूर्यस्य दुहिता ") वां ( =युवयो ) रथम् आ अरुहत् ( =आरूढवती =सापि नः समीपमायातुं सिद्धा भवति ) ॥

एतां दुर्बोधकल्पां सायण एवं व्याख्यातवान् । अस्य रथस्य प्रयामनि प्रगमने सति शस्मन् अश्विनोः शंसने स्तवने धीतिरस्मदीया बुद्धिरूर्ध्वोन्मुखा प्रत्यधायि । प्रत्यस्थायि । तदनन्तरं दिशो देष्ट्र्याः स्तुतयोपि समयन्ते । अश्विभ्यां संगच्छन्ते । आकारः समुच्चये । अहं च स्तोता घर्मं महावीरस्थं यद्वा.क्षरणशीलाज्यादिकं हविः स्वदामि । स्वादूकरोमि । ऊतयोऽवितारो रक्षका ऋत्विजश्च प्रति यन्ति । घर्मं प्रति गच्छन्ति संस्कारार्थम् । अपि च हे अश्विनौ वां युवयो रथमूर्जानी सूर्यस्य दुहितारुहत् । आरूढवती ॥

२. [ तुमचा ] हा [ रथ ] निघूं लागल्याबरोबर [ तुमचें ] स्तोत्र करण्याविषयीं [ आमचीं ] बुद्धि पुढें सरसावते; स्तोत्रें चोहींकडून येऊन मिळतात; घर्म [हवि] मी गोड करितों; साहाय्यकारी ऋत्विज् येतात, [आणि] हे अश्वी हो, ऊर्जानी तुमच्या रथांत चढून बसते.

2. At the starting of this [your chariot] the heart stands up for a hymn; praises crowd around; I sweeten the Gharma oblation; the helping priests return; Ûrjânî has mounted your chariot.

२ हा मंत्र सोपा नाहीं. पण भावार्थ असा दिसतो कीं, ‘ हे अश्वी हो, तुम्ही रथांत बसून पहांटेला निघूं लागतांच आमच्या भाविक बुद्धीला स्तुति करण्याचें स्फुरण चढतें; अनेक स्तुतींचे विषय एकदम आम्हांस सुचतात; तुम्हांकारणें ऊन दुधाचें ‘ घर्म ’ या नांवाचें मधुर हवि सिद्ध करण्याविषयीं आम्ही प्रवृत्त होतों; तें हवि देण्याविषयीं सिद्ध होऊन पुरोहित वगैरे धांवून येतात. आणि ही आमची सर्व तयारी पाहून तुमची प्रियपत्नी सूर्यकन्या “ ऊर्जानी ” प्रसन्न होऊन आम्हांप्रत तुम्हांबरोबर येण्यासाठीं तुमच्या रथावर चढून बसते.’

‘ पुढें सरसावते ’=‘ ऊर्ध्वा प्रति अधायि.’ अक्षरार्थ ‘ पुनः उठून उभी राहते ’ असा आहे; म्हणजे रात्रीं निद्रित असते ती पुनः सकाळीं जागृत होऊन स्तोत्र करावयास लगबगीनें जणुं उठून उभी राहते.

‘ स्तोत्रें ’=‘ दिशः.’ हा अर्थ सायणाप्रमाणें आम्हीं दिला आहे; पण प्रयोगान्तरांची अपेक्षा मोठी आहे. अर्थ संभवतो मात्र खरा. ऋक्संहितेंत ‘ दिश् ’ शब्दाचा हा अर्थ दुसऱ्या ठिकाणीं सायणांनीं केलेला आढळत नाहीं. ‘ स्तोत्रें येऊन मिळतात ’ म्हणजे स्तुत्य जीं तुमचीं. अनेक चरितें तीं मला लवकर लवकर सुचूं लागतात.

‘ घर्म.’ हें एक प्रकारचें हवि अथवा अश्वींला अर्पण करावयाचें द्रव्य आहे. ‘ महावीर ’ या नांवाचें एक पात्र असतें तें ऊन करून त्यांत गाईचें ऊन ऊन ताजें दूध ओतून तें अर्पण करीत आणि त्या अर्पण करण्याला ‘ प्रवर्ग्य ’ असें नांव देत. दध्यञ्च् ऋषींला घोड्याचें शिर लाविल्यावर त्याणें अश्वींला मधुविद्या ( म्हणजे गोड सोम तयार करण्याची विद्या ) आणि ‘ प्रवर्ग्यविद्या ’ सांगितली ती ही विद्या म्हणजे प्रवर्ग्य–घर्म–हवि करण्याचें

**सं यन्मिथः पस्पृधानासो अग्मत शुभे मखा अमिता जायवो रणे ।**
**युवोरह प्रवणे चेकिते रथो यदश्विना वहथः सूरिमा वरम् ॥ ३ ॥**

सम् । यत् । मिथः । पस्पृधानासः । अग्मत । शुभे । मखाः । अमिताः । जायवः । रणे ।
युवोः । अह । प्रवणे । चेकिते । रथः । यत् । अश्विना । वहथः । सूरिम् । आ । वरम् ॥ ३ ॥

## भाषायाम्.

३. यद् ( =यदा ) शुभे मिथः पस्पृधानासः ( =जयशोभायै=जयलाभोत्पन्नशोभायै परस्परम् अतिशयेन स्पर्धमाना ) मखाः ( =मंहनीया=महान्तः ) अमिताः ( =असंख्या ) जायवः ( =जयशीला=योद्धारो ) रणे सम् अग्मत ( =संग्रामे योधनाय संगच्छन्ते ) [ तदा ] युवोः अह ( =युवयोरेव ) रथः प्रवणे ( =भूतले ) चेकिते ( =दृश्यते ) । यद् ( =यदा=अपि च तदानीं ) हे अश्विना ( =अश्विनौ ), [ युवां ] सूरिं (=स्तोतारं प्रति ) वरं (=वरणीयं धनम् ) आ वहथः (=आनयथः)॥
मखा मखवन्तो यज्ञोपेताः......शुभे शोभनाय धनाय तदर्थं......युवयोरेव रथः प्रवणे प्रकर्षेण संभजनीये भूतले चेकिते । ज्ञायते । देवेषु मध्ये युवामेव रक्षणार्थं शीघ्रं रथेनागच्छथ इत्यर्थः इति सायणाचार्याः ॥

ज्ञानच असेल असें दिसतें.
‘ ऊर्जानी.’ हें नांव ऋक्संहितेंत पुनः आलेलें नाहीं. सूर्याचे दुहितेविषयीं सू. ११८ मं. ५ आणि त्याजवरील टीप पहा.

३. [ हे अश्वी हो ], जेव्हां जयलाभासाठीं परस्पर महास्पर्धा करणारे असंख्य मोठे योद्धे रणांत लढतात, [ तेव्हां ] तुमचाच रथ खालीं उतरून येतांना दृष्टीस पडतो. आणि हे अश्वी हो, तेव्हां तुम्हींच उपासकाला धन घेऊन येत असतां.

3. When unnumbered great heroes, mightily striving with each other for glory, meet in battle, your chariot alone is seen descending; when O As'vins, you bring the wished for wealth to the sacrificer.

---

३. 'हे अश्वी हो, जयासाठीं परस्पर अति आवेशानें लढणारे मोठमोठे असंख्य योद्धे जेव्हां समरांगणांत मिळतात आणि लढतात तेव्हां साहाय्य करण्याला दुसऱ्या कोणा देवांचा रथ येत नाहीं, तर तुमचाच येतो. आणि हे अश्वी हो, त्या वेळीं भक्ताचीं मनकामना पूर्ण करून तुम्हीच त्याला धन देत असतां' असा भावार्थ.

'खालीं उतरून येतांना दृष्टीस पडतो'='प्रवणे चेकिते.' अक्षरशः अर्थ 'उतरणीवर दृष्टीस पडतो.' म्हणजे आकाशांतून ( ? ) उतरतांना दिसतो.

'उपासकाला'= 'सूरिम्.' म्हणजे त्या योद्ध्यांत जो कोणी उपासक अथवा भक्त असेल त्याला.

'धन घेऊन येत असतां'='वरम् आ वहथः.' म्हणजे त्या युद्धांत विजय देऊन शत्रूच्या धनाची लूट मिळवून देत असतां.

युवं भुज्युं भुरमाणं विभिर्गतं स्वयुक्तिभिर्निवहन्ता पितृभ्य आ ।
यासिष्टं वर्तिर्वृषणा विजेन्यं दिवोदासाय महि चेति वामवः ॥४॥

युवम् । भुज्युम् । भुरमाणम् । विऽभिः । गतम् । स्वयुक्तिऽभिः । निऽवहन्ता । पितृऽभ्यः । आ ।
यासिष्टम् । वर्तिः । वृषणा । विऽजेन्यम् । दिवःऽदासाय । महि । चेति । वाम् । अवः ॥ ४ ॥

युवोरश्विना वपुषे युवायुजं रथं वाणी येमतुरस्य शर्ध्यम् ।
आ वां पतित्वं सख्याय जग्मुषी योषावृणीत जेन्या युवां पती ॥
॥ ५ ॥ २० ॥

युवोः । अश्विना । वपुषे । युवाऽयुजम् । रथम् । वाणी इति । येमतुः । अस्य । शर्ध्यम् ।
आ । वाम् । पतिऽत्वम् । सख्याय । जग्मुषी । योषा । अवृणीत । जेन्या । युवाम् । पती इति ॥ ५ ॥ २० ॥

---

## भाषायाम्.

४. हे वृषणा (=वृषणौ=वीर्यवन्तावश्विनौ), युवं (=युवां) भुरमाणं (=जर्भुराणं=भयं प्रति भृशं गच्छन्तं) गतम् (=उदके निमग्नं) भुज्युं (=तुग्रपुत्रमेतन्नामानं) स्वयुक्तिभिः (=स्वयमेव युज्यमानैः) विभिः (=पक्षिवच्छीघ्रैरश्वैः) निवहन्ता (=निवहन्तौ=नितरां समुद्रान्निर्गमय्य वहन्तौ) विजेन्यं (=दूरस्थं) वर्तिः (=तुग्रस्य गृहं) पितृभ्य आ (=तस्य भुज्योः पितॄणां समीपे) यासिष्टम् (=अगच्छतम्)। वां (=युवयोः) दिवोदासाय [नाम भक्ताय कृतं] महि (=महत्) अवः (=साहाय्यं) चेति (=ज्ञायते=ज्ञातमेवास्ति)॥

सायणस्तु भुरमाणं विभिरश्वैर्भ्रियमाणं गतं समुद्रे निमग्नं भुज्युं तुग्रपुत्रं स्वयुक्तिभिः स्वयमेव युज्यमानैरश्वैर्नौविशेषैश्चेत्याह ॥

५. इमां दुर्बोधकल्पां सायण एवं व्याख्यातवान् । अश्विना हे अश्विनौ युवोर्युवयोर्वाणी वननीयौ प्रशस्यावश्वौ युवायुजं युवाभ्यां युज्यमानं रथमाजिधावनसमये अस्य रथस्य यच्छर्ध्यं प्राप्यम् आदित्याख्यमवधिभूतं लक्ष्यं वपुषे शोभनार्थं तत्रेमतुः । सर्वेभ्यो देवेभ्यः पूर्वं प्रापयामासतुः । तदनन्तरं च आ जग्मुषी आगतवती जेन्याजि-

४. हे वीर [ अश्वी ] हो, तुम्ही तळमळणाऱ्या [ आणि ] बुडून मरत असणाऱ्या भुज्यूला स्वतः जोडिले जाणाऱ्या पक्ष्यांसारिख्या घोड्यांच्या योगानें दूर असलेल्या घरीं वडिलांजवळ वेऊन गेलां. तुमचें दिवोदासाला [ दिलेलें ] साहाय्य प्रसिद्ध आहे.

4. You, O puissant As'vins, went to the remote house carrying to his fathers the agitated and drowning Bhujyu, with self-harnessed birdlike horses. Your help to Divodâsa is well-known.

५. हे अश्वी हो, तुमचे उत्कृष्ट घोडे तुम्ही जोडिलेल्या रथाला त्याच्या अवधीपर्यंत सुंदर रीतीनें ओढून नेऊन थांबविते झाले. [ नंतर ] तरुण [ आणि ] कुलीन सूर्या तेथें येऊन तुम्ही माझे पति असें म्हणून मित्रत्वासाठीं तुमचें भर्तृत्व वरिती झाली.

5. Your pair of excellent horses, O As'vins, beautifully drew the chariot, which was yoked by you, as far as its goal. [ Then ] the noble daughter [ of Sûrya], having come up chose you [ as ] [ her ] husbands and friends, [ exclaiming ], "you [ are ] [ my ] husbands."

---

४. या मंत्रांत अश्वींचीं दोन महाकृत्यें सांगितलीं आहेत. भुज्यूला समुद्रांतून काढून त्याचे आईबाप दूर होते तरी त्यांचे घरीं नेऊन पोंहचविलें ( सू. ११२ मं. ६ ) हें एक; आणि दुसरें हें कीं, दिवोदास शंबराशीं लढत असतां त्याला साहाय्य करून शंबराला अश्वींनीं मारिलें. (सू. ११२ मं. १४ ).

५. या ऋचेंत जाणविलेली अश्वींच्या सूर्या नांवाच्या स्त्रियेच्या स्वयंवराची कथा तर पूर्वी आलेलीच आहे ( याच सूक्ताचा मं. २ आणि टीप पहा ). आणि भावार्थहि उघड आहे, पण 'वाणी' आणि 'शर्ध्यम्' हे दोनहि शब्द कठिण आहेत. 'वाणी' शब्दाचा सायणांनीं केलेला 'उत्तम घोडा'. हा अर्थ मान्य तर केला आहे, पण त्याविषयीं प्रयोगान्तरांची मोठी अपेक्षा असून ती पूर्ण होण्यास साधनें नाहींत. त्याप्रमाणेंच 'शर्ध्यम्' ( जेथपर्यंत शर्यतीचा रथ जावयाचा ती मर्यादा ) या शब्दाविषयीं म्हटलें पाहिजे. 'शर्ध्य'शब्द पुनः ऋग्वेदांत आलेला नाहीं. 'वाणी'शब्द ज्यांत आला आहे ते सर्व ऋक्संहितें-

युवं रेभं परिषूतेरुरुष्यथो हिमेन घर्मं परितप्तमत्रये ।
युवं शयोरवसं पिप्यथुर्गवि प्र दीर्घेण वन्दनस्तार्यायुषा ॥ ६ ॥

युवम् । रेभम् । परिऽसूतेः । उरुष्यथः । हिमेन । घर्मम् । परिऽतप्तम् । अत्रये ।
युवम् । शयोः । अवसम् । पिप्यथुः । गवि । प्र । दीर्घेण । वन्दनः । तारि । आयुषा ॥ ६ ॥

धावनेन जीयमाना योषा सूर्या सख्याय सखित्वाय युवां युवयोः पतित्वमवृणीत । कथमिति । मम युवामेव पती भर्ताराविति ॥ ......शर्ध्यम् । शृधु प्रसहने.... ॥

## भाषायाम्.

६. युवं (=युवां) रेभम् (=एतन्नामानमृषिं) परिषूतेः (=उपद्रवात्) उरुष्यथः (=रक्षथः=अरक्षतम्) । [युवाम्] अत्रये (=एतन्नाम्ने भक्ताय) परितप्तम् (=अतिशयेन तप्तं) घर्मं (=तुषाग्निं) हिमेन (=वृष्ट्युदकेन) [अवारयेथाम्] । युवं (=युवां) शयोः (=एतन्नाम्नो भक्तस्य) गवि अवसं (=पयः) पिप्यथुः (=पूरितवन्तौ) [युवाभ्यां] वन्दनो [नाम भक्तो] दीर्वेण आयुषा प्र तारि (=प्रवर्धितोभूत्) ॥

तील मंत्र काढून पहातां, त्यांत कोठेंहि घोडा अथवा वारू अथवा त्याच्या जवळ जवळ अर्थ केलेला सांपडत नाहीं. कितीएक पाश्चिमात्य विद्वान् या शब्दाचा आणि एकंदरींत सर्व मंत्राचा अर्थ निराळा करितात. पण आहे त्यांत सायणाचार्यांनाच अर्थ घेणें योग्य वाटल्यावरून आम्हीं तसेंच केलें आहे.

'त्याच्या अवधीपर्यंत'=' अस्य शर्ध्यम्.' म्हणजे जेथपर्यंत रथानें धांवत जावयाचें होतें असें शर्यत करणाऱ्यांनीं नेमिलें होतें ती मर्यादा.

'मित्रत्वासाठीं तुमचें भर्तृत्व वरिती झाली'=' सख्याय पतित्वम् अवृणीत.' म्हणजे तुम्ही तिचे भर्ते आणि मित्र व्हावें अशा हेतूनें तुम्हांला वरिती झाली. यावरून वेदाच्या काळीं 'पति' म्हणजे केवळ स्त्रीरूप दासीचा 'प्रभु' म्हणजे धनी नसे, तर तो तिला आवडणारा मित्रहि असावा असें इष्ट असे इतकें उघड होतें.

'सुंदर रीतीनें'=' वपुषे.' अक्षरार्थ 'शोभेसाठीं,' 'सुंदरपणासाठीं' इतका आहे.

वृत्तासाठीं दुसऱ्या पादांत 'शर्धिअं,' तिसऱ्यांत 'सखिआय' आणि चवथ्यांत 'जेनिआ' असें वाचावें लागतें.

६. हे अश्वी हो, तुम्ही रेभाला उपद्रवापासून सोडविते झालां. तुम्ही अत्रीसाठीं कढत तुषाग्नि थंड पाण्यानें [शांत करिते झालां]. तुम्ही शयूच्या गाईंत दूध भरिते झालां. तुम्हीं दीर्घायुष्य देऊन वन्दन फार दिवस वांचविला.

6. You saved Rebha from distress, you [calmed] the scorching fire for Atri with cold. You filled the cow of S'ayu with milk, you promoted Vandana with long life.

६. 'रेभ.' सू. ११२ मं. ५ आणि टीप पहा. 'अत्रि.' सू. ११२ मं. ७ पहा. 'शयु.' सू. ११२ मं. १६; 'वन्दन.' सू: ११२ मं. ५ आणि टीप पहा.

वृत्तासाठीं चवथ्या पादांत 'तारिआयुषा' असें वेगळें म्हणावें लागतें.

**युवं वन्दनं निर्ऋतं जरण्यया रथं न दस्रा करणा समिन्वथः ।**
**क्षेत्रादा विप्रं जनथो विपन्यया प्र वामत्र विधते दंसना भुवत् ॥ ७**

युवम् । वन्दनम् । निःऽऋतम् । जरण्यया । रथम् । न । दस्रा । करणा । सम् । इन्वथः ।
क्षेत्रात् । आ । विप्रम् । जनथः । विपन्यया । प्र । वाम् । अत्र । विधते । दंसना । भुवत् ॥ ७ ॥

**अगच्छतं कृपमाणं परावति पितुः स्वस्य त्यजसा निबाधितम् ।**
**स्वर्वतीरित ऊतीर्युवोरह चित्रा अभीके अभवन्नभिष्टयः ॥ ८ ॥**

अगच्छतम् । कृपमाणम् । पराऽवति । पितुः । स्वस्य । त्यजसा । निऽबाधितम् ।
स्वःऽवतीः । इतः । ऊतीः । युवोः । अह । चित्राः । अभीके । अभवन् । अभिष्टयः ॥ ८ ॥

---

## भाषायाम्.

७. करणा (=करणौ=कुशलौ) युवं (=युवां) जरण्यया (=जरया) निर्ऋतं (=नष्टं) हे दस्रा (=दस्रौ=आश्चर्यकारिकर्मणां कर्तारौ), रथं न (=जीर्णं रथमिव =यथा कश्चिच्छिल्पकुशलः पुनर्नवीकरोति तथा) सम् इन्वथः (=पुनरपि युवानं कृतवन्तौ)। [युवां] विपन्यया (=स्तुत्या=स्तुतिं श्रुत्वा) विप्रं (=कविं=वामदेवं) क्षेत्राद् आ (=मातुरुदरस्य सकाशात्) जनथः (=जनयथः =अजनयतम्)। [तयोर्] वां (=युवयोः) दंसना (=अद्भुतचमत्कारकारी प्रभावः) अत्र विधते (=अस्मै परिचरते=भक्ताय=मद्रूपाय) प्र भुवत् (=रक्षितुं समर्था भवतु)॥

विपन्ययेत्यादौ सायणः विपन्यया स्तुत्या गर्भस्थेन वामदेवेन स्तुतौ सन्तौ क्षेत्रादा। आकारः समुच्चये। मातुरुदरलक्षणाज्जन्मस्थानाद्विप्रं मेधाविनं तमृषिं जनथः। जनयथश्चेति व्याख्यातवान्॥

८. स्वस्य पितुः (=स्वकीयस्यैव पितुस्तुग्रस्य) त्यजसा (=क्रोधेन) निबाधितम् (=अतिशयेनोपद्रुतम्) [अत एव] परावति (=दूरदेशे=समुद्रप्रदेशे) कृपमाणं (=रक्षणार्थं युवां स्तुवन्तं) [भुज्युं] [युवाम्] अगच्छतम्। इतः (=अतः कारणादेव) स्वर्वतीः (=स्वर्वत्यः=तेजस्विन्यश्) चित्राः (=श्रेष्ठा) युवोरह (=यु-

पांच ता. १ पासून ता. ३१ आगस्टपर्यंत.

---

| | रु. | आ. |
|---|---|---|
| हिज हायनेस धि गायकवाड सरकार ..................... | १५९– | ६ |
| हिज हायनेस धि ठाकूरसाहेब पालिठाणा ................ | १५९– | ० |
| रेव्हरेंड शेल्डन.............. ............ ............... | १२– | ४ |
| रेव्हरेंड जे. टेलर एस्. पी. जी. मिशन् ....... ........ | ६– | ६ |
| नेटिव्ह जनरल लायब्ररी तासगांव ........................ | ६– | ६ |
| रावसाहेब गोपाळजी सुरभाई देसाई ........ ............ | ६– | ० |
| रावबहादूर राघोबा जनार्दन ........ ..................... | १२– | १२ |
| रावबहादूर नारायण गणेश साठे नेटिव्ह असिस्टंट कमिश० | ६– | ६ |
| रा. रा. विनायक चिंतामण जोगळेकर ओव्हरसिअर .... | ६– | ६ |
| रा. रा. गौरीशंकर उदयाशंकर ओझा. ........ ........ | ६– | ६ |
| रा. रा. लक्ष्मण गोविंद वकील ............ .... ......... | ६– | ६ |
| रा. रा. नारायण पांडुरंग आपटे वकील ............ .... | १३– | २ |
| रा. रा. दिवाकर सदाशिव जोशी हेडमास्तर .... ........ | ६– | ६ |
| रा. रा. जनार्दन सखाराम गाडगीळ ज्ज्ज. .... ........ | ६– | ६ |

---

Registered No. ... of 1878.

## NOTICE

The second Volume of the Vedârthayatna will be finished with the last hymn ( 121 ) of the first Ashṭaka of the Rigveda Saṁhitâ, that is, one more part.

---

## विशेष सूचना.

पहिल्या अष्टकाचे शेवटील सूक्त ( १२१ ) संपलें म्हणजे आणखी १ अंक झाला म्हणजे हा वेदार्थयत्नाचा दुसरा भाग संपेल.

---

## सूचना.

| | रु. | आ. |
|---|---|---|
| वर्षाची वर्गणी, आगाऊ | ६ | ० |
| मुंबईबाहेर राहणारांस टपाल हंशिलाबद्दल दरवर्षाचे | ० | ६ |

All communications to be addressed to the Manager Mr. Mahâdev Nârâyan Pandit, No. 29 *Moroba Popatji's Oart, Kalka Devi Road, Bombay.*

---

ग्रंथकर्त्याच्या नांवचा वगैरे सर्व प्रकारचा पत्रव्यवहार मुंबई मोरोबा पोपटजीची वाडी घर नंबर २९, या पत्त्यावर रा. रा. महादेव नारायण पंडित "म्यानेजर वेदार्थयत्न" यांच्याशीं ठेवावा.

---

**विशेष सूचना.**—आमच्या कितीएक वर्गणीदारांकडे गेल्या वर्षाची बाकी येणें आहे ती त्यांणीं मेहेरबानी करून लवकर पाठवून द्यावी. बाकीचा उलगडा झाल्याविना अंक पाठविण्याचें बंद करण्यांत येणार नाही.

तिकिटें पाठविणें झाल्यास अर्ध्या आण्याच्या दराचीं असून दर रुपयास अर्धा आणा वर्तावळा असावा. नाटपेड पत्र घेतलें जाणार नाही.

THE

# VEDÂRTHAYATNA

OR

## AN ATTEMPT TO INTERPRET THE VEDAS.

# वेदार्थयत्न.

## ऋग्वेदसंहिता

पदांसहित व

तिचें मराठी आणि इंग्रजी भाषांतर.

पुस्तक २. अंक १६. सप्टेंबर सन १८७८. मासिक भाग ३०.
Vol II Septr 1879 No. 30

मुंबई:
"निर्णयसागर" छापखान्यांत छापिलें.

माझे

सर्व आर्य बंधु व भगिनी

यांस

हें भाषांतर

सादर समर्पण केलें आहे.

भाषांतरकर्ता.

७. हे अद्भुतकर्मकारी [आणि] कुशळ [अश्वी] हो, तुम्ही वृद्धपणानें जेर झालेल्या वन्दनाला, [जुन्या] रथाला नीट केल्याप्रमाणें, पुनः तरूण करिते झालां. तुम्ही स्तुतीला पावून कवीला क्षेत्रापासून उपजविते झालां. [तर] [हे अश्वी हो], तुमचा पराक्रम या उपासकाचें पाठबळ होओ.

7. You, who are skilful, renovated, O performers of miracles, Vandana that was deteriorating with old age, like an [ old ] car. Through prayer you brought forth the poet from the field. May your miraculous might be the shield to this worshipper.

८. स्वताहा बापाच्याच क्रोधानें पीडिलेला आणि दूरप्रदेशीं करूणा भाकणारा [भुज्यु] याजप्रत तुम्ही पावलां. यास्तव [हे अश्वी हो], तुमचींच तेजःपुंज [आणि] उत्तम पाठबळें सहज लाभण्याजोगे प्रसाद होऊन गेले आहेत.

8. You came to [ Bhujyu] persecuted by the anger of his own father [ and ] crying for pity in a remote quarter. Hence your acts of benevolence alone, splendid [ and ] excellent, have become accessible helps [to your worshippers ].

---

७. वंदनाला पुनः तरूण केल्याबद्दल सू. ११२ मं. ५ पहा.

'कवीला क्षेत्रापासून उपजविते झालां' ='क्षेत्राद् आ विप्रं जनथः.' हा कवि म्हणजे वामदेव ऋषि होय, आणि तो आईच्या पोटांत असतां त्याणें अश्वींचें स्तोत्र केल्यावरून अश्वींनीं येऊन त्याची आईच्या पोटांतून (क्षेत्राद्) सुटका केली, असें सायण म्हणतात. पण त्याविषयीं सविस्तर कथा सर्व समजल्यावरहि हा 'कवि' म्हणजे वामदेवच असें स्पष्ट समजण्यास आधार नाहीं; कारण कीं नांव न घेतां केवळ कोणा एका कथेला उद्देशून उल्लेख आहे. परंतु नांव नसलें तरी सायण म्हणतात तसेंच असेल असा संभव आहे; पुढच्याच मंत्रांतील पूर्वार्धांत 'भुज्यू'चें नांव नसतांहि भुज्यूविषयींच्या कथेला उद्देशून उल्लेख आहे तो पहा.

'या उपासकाचें'='अत्र विधते.' म्हणजे स्तोत्रकर्ता असें दिसतें. सायणाचार्य म्हणतात, ज्याच्या करितां ऋषि सूक्त म्हणत आहे तो. परंतु स्तोत्रकर्ताच 'उपासक' होय असें म्हणणें युक्त दिसतें.

८. या ऋचेच्या पूर्वार्धांत भुज्यूविषयींची कथा पुनः जाणविली आहे. (सू.

p 1

**उत स्या वां मधुमन्मक्षिकारपन्मदे सोमस्यौशिजो हुवन्यति ।**
**युवं दधीचो मन आ विवासथोऽथा शिरः प्रति वामश्व्यं वदत् ॥९**

उत । स्या । वाम् । मधुऽमत् । मक्षिका । अरपत् । मदे । सोमस्य । औशिजः । हुवन्यति ।

युवम् । दधीचः । मनः । आ । विवासथः । अथ । शिरः । प्रति । वाम् । अश्व्यम् । वदत् ॥ ९ ॥

---

वयोरेव ) ऊतीः ( =ऊतयः=रक्षाः ) अभीके ( =समीपे ) [ स्थिताः ] ( =समीपस्था ) अभिष्टयः ( =प्रसादाः ) अभवन् ( =जाताः सन्ति ) ॥

युवोरह युवयोरेवोतीरूतयो रक्षा अभीके समीपेऽभिष्टयः सर्वैः प्राणिभिरभ्येषणीया अभवन् । भवन्ति । इति सायणः ॥

---

## भाषायाम्.

९. उत ( =अपि च ) स्या ( =सा प्रसिद्धा ) मक्षिका ( =मधुमक्षिका ) वां मधुमत् अरपत् ( =युवां मधुलाभविषयेऽस्तौत् ) । औशिजः ( =उशिजः पुत्रः कक्षीवान् ) सोमस्य मदे ( =सोमपानस्य मदविषये=सोमपानस्य मदलाभार्थं=मादकारिणः सोमस्य पानलाभार्थं ) हुवन्यति ( =आह्वयति ) । युवं ( =युवां ) दधीचः ( =दध्यङ्नाम्न ऋषेः ) मनः आ विवासथः ( =परिचरथः=परिचरितवन्तौ=प्रसादितवन्तौ ) । अथ ( =अनन्तरम् ) अश्व्यं शिरः ( =अश्वसंबन्धि शिरः ) वां (=युवाभ्यां ) [ मधुविद्यां ] प्रत्यवदत् ( =आश्व्येन शिरसा दध्यङ् उपदिष्टवान् ) ॥

सायणस्तु मधुमन्मधुमन्तौ वां युवां स्या सा मक्षिका सरघा मधुकामा सती अरपत् । अस्तौत् । ......युवं युवां च तस्यै मक्षिकायै मधु दातुं मधुविद्यार्थिनौ सन्तौ दधीच आथर्वणस्य ऋषेर्मनश्चित्तं शुश्रूषया आ विवासथः । पर्यचरतम् । अथानन्तरं तस्मिन् प्रीते सति अश्व्यं युवाभ्यां प्रतिहितमश्वस्य संबन्धि यच्छिरस्तद्वां युवां प्रति मधुविद्यामवदत् । इति ॥

---

११२ मं. ६ आणि टीप पहा ). पण येथें सांगितलेल्या वृत्तांतावरून असें दिसतें कीं भुज्यूला त्याचा बाप तुग्र याणें जो परद्वीपस्थ शत्रूच्या शासनासाठीं अरमारांत घालून पाठविला, तो तुग्राचा त्याजवर क्रोध झाला होता म्हणून पाठविला होता, केवळ त्याच्या शौर्याकडे पाहूनच पाठविला नव्हता.

'क्रोधानें'='त्यजसा.' ऋ. १०. ७९. ६ आणि त्याजवरील सायणभाष्य पहा.

९. आणि ती [मधु]मक्षिका तुम्हांला मधूविषयीं स्तविती झाली. उशिजेचा पुत्र तुम्हांला सोमपानाच्या मादाविषयीं बोलाविता झाला. तुम्ही दध्यङ्[ऋषी]चें मन प्रसन्न करिते झालां. नंतर घोड्याचें शिर तुम्हांला [ विद्या ] सांगतें झालें.

9. And that bee praised you about honey. The son of Us'ij invokes you for the exhilaration of the Soma; you propitiated the mind of Dadhyanch; when the equine head made the revelation to you.

'यास्तव' इ० याचा भावार्थ असा दिसतो कीं, अश्वींनीं भुज्यु आणि त्यासारिखेच संकटांत पडलेले भक्त यांजला तारिलें, म्हणूनच सर्व भक्त आतां इतर देवांची करुणा न भाकितां अश्वींचीच भाकितात, आणि अश्वीच सर्वांस आपल्या भव्य आणि उत्तम प्रसादांचा सहज लाभ करून देतात.

वृत्तासाठीं दुसऱ्या पादांत 'सुअस्र,' आणि तिसऱ्या पादांत 'सुअर्वतीः' असें म्हणावें लागतें.

९. या ऋचेचा भावार्थ असा दिसतो कीं, 'मधुमक्षिकेनें अश्वींजवळ मधूविषयींचें ज्ञान व्हावें अशी प्रार्थना केल्यावरून, आणि कक्षीवान् ऋषीनें मादकारी सोम मिळावा म्हणून प्रार्थना केल्यावरून, या दोनहि वस्तूंचें ज्ञान दध्यङ् ऋषीस असल्यामुळें त्या ऋषीला अश्वींनीं प्रसन्न केलें तेव्हां त्याणें घोड्याच्या शिरानें त्या दोनीहि वस्तूंचें ज्ञान अश्वींला करून दिलें.'

'ती [ मधु ]मक्षिका'='सा मक्षिका.' ती म्हणजे मधुविद्येच्या कथेंत प्रसिद्ध असलेली. अश्वी देव मधूचे अधिदेव होत. यास्तव मधु कसें करावें ही विद्या त्यांनीं प्रथम मधुमक्षिकेला सांगितली आणि त्यांनीं स्वतः ती दध्यङ् ऋषीकडून संपादन केली अशी कांहीं तरी कथा असावी.

'उशिजेचा पुत्र' म्हणजे 'कक्षीवान्;' जो या सूक्ताचा कर्ता असें मानितात. त्याणें सोमाविषयीं ज्ञान मागितल्यावरून तें अश्वींनीं दध्यङ् ऋषीकडून संपादन करून कक्षीवान् ऋषीस सांगितलें असें या ऋचेवरून होतें.

'दध्यङ्.' सू. ११६ मं. १२ आणि टीप पहा.

वृत्तासाठीं चवथ्या पादांत 'अश्विअं' असें वाचावें लागतें.

युवं पेदवे पुरुवारमश्विना स्पृधां श्वेतं तरुतारं दुवस्यथः ।
शर्यैरभिद्युं पृतनासु दुष्टरं चर्कृत्यमिन्द्रमिव चर्षणीसहम् १०॥२१

युवम् । पेदवे । पुरुऽवारम् । अश्विना । स्पृधाम् । श्वेतम् । तरुतारम् । दुवस्यथः ।
शर्यैः । अभिऽद्युम् । पृतनासु । दुस्तरम् । चर्कृत्यम् । इन्द्रम्ऽइव । चर्षणिऽसहम् ॥ १० ॥ २१ ॥

## भाषायाम्.

१०. हे अश्विना (=अश्विनौ), युवं (=युवां) पेदवे [नाम राज्ञे] पुरुवारं (=नानाविधजनैर्वरणीयं=बहुप्रियं) स्पृधां तरुतारं (=शत्रूणां जेतारं) श्वेतं (=शुभ्रवर्णं) शर्यैः पृतनासु दुस्तरं (=शत्रुभिः संग्रामेषु तरीतुं जेतुम् अशक्यम्) अभिद्युम् (=अभिगतदीप्तिम्=अभितो दीप्तिभिरावृतं) चर्कृत्यम् (=अतिशयेन कर्मणां कर्तारं=शूरम्) इन्द्रम् इव (=इन्द्रवत्) चर्षणीसहं (=शत्रुजनानामभिभवितारम्) [अश्वं] दुवस्यथः (=दत्थः=दत्तवन्तौ)॥

पुरुवारशब्दोऽस्माभिरत्र सायणमनुसृत्यैव व्याख्यातः। पाश्चात्त्यास्तु केचिद् बहुबाल इत्याहुः। वरं सायणस्यैव व्याख्यानमिति वयम्। सति हि बहुबाल इति पुरुवारशब्दस्यार्थे सायणस्तं नाज्ञास्यदिति न। सर्वेषु च पुरुवारशब्दवत्सु मन्त्रेषु बहुभिर्वरणीय इत्येव स इदं पदं व्याचष्टे॥

१०. हे अश्वी हो, तुम्ही पेदूला बहुजनप्रिय, शुभ्रवर्णाचा, शत्रूंचा पराभव करणारा, तेजस्वी, संग्रामांमध्यें शत्रूंहीं अजिंक्य, शूर [ आणि ] इंद्राप्रमाणें शत्रूंला जिंकणारा [ असा घोडा ] देते झालां.

10. You, O As'vins, gave to Pedu a white [horse,] the favourite of many, the vanquisher of enemies, resplendent, unconquerable by enemies in battle, brave and a conqueror of enemies as is Indra.

---

१०. 'पेदु' नांवाच्या राजाला अश्वींनीं एक आश्चर्यकारक घोडा दिला होता ही कथा पूर्वीं सू. ११७ मं. ९ यांत आली आहे. तो मंत्र आणि त्याजवरील टीप पहा.

'बहुजनप्रिय'='पुरुवारम्.' अक्षरशः अर्थ पुष्कळ लोकांनीं जो आपणास पाहिजे असें म्हणावें असा. कितीएक पाश्चिमात्य विद्वान् 'मोठ्या शेपटीचा' असा अर्थ करितात. परंतु सायणाचार्य सर्व मंत्रांत 'बहु जनांनीं वरण्यास योग्य' असाच अर्थ करितात यावरून तो प्राचीन अर्थ असावा असें वाटतें; आणि तो संभवत नाहीं असेंहि नाहीं.

'शूर'='चर्कृत्यम्.' हा अर्थ प्रयोगान्तरांस अनुसरून केला आहे.

## सूक्तम् १२०.

उशिक्पुत्रः कक्षीवानृषिः। अश्विनौ देवता। प्रथमा गायत्री। द्वितीया ककुप्। तृतीया काविराट्। चतुर्थी नष्टरूपी। पञ्चमी तनुशिरा। षष्ठी उष्णिक्। सप्तमी विष्टारबृहती। अष्टमी कृतिः। नवमी विराट्। दशम्याद्या-स्तिस्रो गायत्र्यः॥

**का रा॑धद्धोत्रा॑श्विना वां को वां जोष॑ उभयोः।**
**कथा वि॑धात्यप्र॑चेताः॥ १॥**

का। राधत्। होत्रा॑। अश्विना। वाम्। कः। वाम्। जोषे॑। उभयोः।
कथा। विधाति। अप्र॑ऽचेताः॥ १॥

**विद्वांसाविद्दुरः पृच्छेदविद्वानित्थाप॑रो अचेताः।**
**नू चिन्नु मर्ते अक्रौ॥ २॥**

विद्वांसौ॑। इत्। दुरः। पृच्छेत्। अविद्वान्। इत्था। अप॑रः। अचेताः।
नु। चित्। नु। मर्ते॑। अक्रौ॑॥ २॥

---

### भाषायाम्.

१. हे अश्विना (=अश्विनौ), का होत्रा (=कीदृशी स्तुतिः) वां (=युवां) राधत् (=आराधयितुं समर्था भवेत्=प्रीतौ कर्तुं शक्नुयात्)? वां (=युवयोरुभयोः) जोषे (=सेवने=आनन्दोत्पादने) कः [समर्थः]? अप्रचेताः (=“युवयोर्माहात्म्य-मजानंश्च”) कथा विधाति (=कथं परिचरणं कर्तुं समर्थो भवेत्=कथं परिचरेत्)?

२. अविद्वान् (=अज्ञः स्तोता) इत्था अपरः (=अन्यश्च) अचेताः (=बुद्धि-रहितो=मन्दबुद्धिश्च भक्तः) विद्वांसौ इत् (=ज्ञानिनावश्विनावेव) दुरः (=उपास-नामार्गान्=उपासनाराधनादीनां साधनानि) पृच्छेत्। [तौ हि] मर्ते (=मर्त्ये मनु-ष्यविषये) नू चित् नु (=नैव) अक्रौ (=अकरणौ=अकर्मकारिणौ=अनवहितौ) [भवतः]॥

सायणस्तु एवमाह। इत्थेत्थमनेन पूर्वोक्तप्रकारेणाविद्वान् अज्ञः स्तोता विद्वांसा-वित् सर्वज्ञावश्विनावेव दुरो द्वाराणि स्तुतिपरिचरणयोरुपायभूतान्मार्गान्पृच्छेत्। प्रष्टुमर्हति। अपरोऽश्विभ्यामन्यः सर्वोऽप्यचेताः। यस्माच्चेतसा ज्ञानेन रहितस्तस्मा-दश्विनावेव पृच्छेदित्यर्थः। तौ चाक्रौ शत्रुभिरनाक्रान्तावश्विनौ नू चित् क्षिप्रमेव मर्ते मनुष्ये स्तोतरि भक्तानुग्राहकतया संनिधत्त इति वाक्यशेषः। इति॥

## सूक्त १२०.

ऋषि—कक्षीवान् (पूर्व सूक्ताचाच). देवता—अश्वी. वृत्त—१ली ऋचा गायत्री, २री ककुप्, ३री काविराट्, ४थी नष्टरूपी, ५वी तनुशिरा, ६वी उष्णिक्, ७वी विष्टारबृहती, ८वी कृति, ९वी विराट्, १०–१२ गायत्री.

१. हे अश्वी हो, तुम्हांला कोणती स्तुति प्रसन्न करूं शकेल? तुम्हां उभयतांचा संतोष कोण करूं शकेल? अज्ञानी मनुष्यानें तुमची कशी उपासना करावी?

२. अज्ञानी एक आणि दुसरा बुद्धिहीन यांनीं ज्ञानी अश्वींलाच मार्ग विचारावा. अश्वी देव मर्त्याविषयीं अनास्था करणारे नव्हेतच नव्हेत.

## HYMN 120.

To the *As'vins.* By *Kakshîvân.* Metre—1, *Gâyatrî*; 2, *Kakup*; 3, *Kâvirâṭ*; 4, *Nashṭarûpî*; 5, *Tanus'irâ*; 6, *Ushṇik*; 7, *Vishṭârabṛihatî*; 8, *Kṛiti*; 9, *Virâṭ*; 10–12 *Gâyatrî.*

1. What invocation will, O As'vins, propitiate you? Who is able to give pleasure to you both? How can an ignorant man worship you?

2. An ignorant man and again a stupid man should ask the knowing [As'vins] alone for means. The As'vins are never, never indifferent to a mortal.

---

१. हेंहि सूक्त अश्वींविषयींच असून याचाहि कर्ता कक्षीवानच होय असें समजतात. सूक्तकर्ता आपलें आणि अज्ञ मनुष्यमात्राचें बुद्धिमांद्य आणि अज्ञान ध्यानांत आणून विचारतो कीं, 'हे अश्वी हो, तुम्हांस प्रसन्न करूं शकेल अशी स्तुति ती कोणती? तुम्हां दोघांलाहि संतुष्ट आणि प्रसन्न करील असा समर्थ कोण आहे? आम्हांसारिख्या अज्ञ जनांनीं तुमची आराधना कशी करावी?' या प्रश्नांतील निष्कपट नम्रपणा वाखाणण्यासारिखा आहे.

वृत्तासाठीं दुसऱ्या चरणांत 'उभेयओः' असें म्हणावें लागतें.

२. अश्वींची आराधना कशी करावी हें ठाऊक नाहीं असें वरच्या मंत्रांत जाणविलें. या प्रस्तुतच्या मंत्रांत ऋषि म्हणतो, 'जो अज्ञानी आणि जो बुद्धिहीन भक्त, त्या दोघांनींहि ज्ञानी जे अश्वी त्यांसच विचारून आराधनांचीं साधनें को-

ता विद्वांसा हवामहे वां ता नो विद्वांसा मन्म वोचेतमद्य ।
प्रार्चद्दयमानो युवाकुः ॥ ३ ॥

ता । विद्वांसा । हवामहे । वाम् । ता । नः । विद्वांसा । मन्म । वोचेतम् । अद्य ।
प्र । आर्चत् । दयमानः । युवाकुः ॥ ३ ॥

---

## भाषायाम्.

३. विद्वांसा ( =विद्वांसौ=सर्वज्ञौ ) ता वां ( =तौ युवां ) [ वयं ] हवामहे ( =अतः कारणात् हे विद्वांसावश्विनौ, युवां वयम् आह्वयामः ) । ता विद्वांसा ( =तौ विद्वांसौ=अतः कारणात्सर्वज्ञौ युवाम् ) अद्य ( =अस्मिन् दिने ) नः ( =अस्मभ्यं ) मन्म ( =स्तोत्रं=स्तोत्रकरणं=श्रेष्ठस्तोत्रकरणज्ञानं ) वोचेतम् ( =उपदिशतम् ) । युवाकुः ( =युवयोर्भक्तः) [ अयं मद्रूपो ] दयमानः (=हविर्युवाभ्यां प्रार्पयन्=प्रार्प्य ) प्रार्चत् (=प्रकर्षेण स्तौति ) ॥

अनभिज्ञोपि सन्यथाशक्ति स्तोत्रं करोमि हविश्च प्रार्पयामि । श्रेष्ठं युवां च तोषयितुं समर्थमेतादृशं स्तोत्रं तु कर्तुं युवामेव मां शिक्षयतमित्यर्थः ॥

---

णतीं तें जाणून घ्यावें. आणि तसें विचारिलें तर ते देव अनास्था करणार नाहींत, कारण दीन मर्त्याविषयीं ते कधींहि उदासीनपणा करीत नाहींत.'

'नव्हेतच नव्हेत'='नू चित् नु.' हा जो निषेधार्थी आम्हीं येथें अर्थ केला आहे त्याविषयीं ऋ. ६. ३७. ३ याजवरील सायणभाष्य पहा.

या मंत्राचा अर्थ सायणांनीं किंचित् निराळा केला आहे तो भाषेंत उतरून घेतला आहे.

या मंत्राचें वृत्त 'ककुप्' आहे. 'ककुप्' म्हणजे गायत्रीच. पण दुसरा चरण बारा अक्षरांचा आहे तो खालीं लिहिल्याप्रमाणें म्हटला पाहिजे.

अविद्वाँन् इत्था अपरो अचेतआः ।

आणि तिसऱ्या पादांत 'अर्कौ' शब्द 'अर्करौ' असा म्हणावा लागतो.

३ तर [ हे अश्वी हो ], तुम्हां ज्ञानी [ अश्वीं ]ला [ आम्ही ] बोलावीत आहों; यास्तव [ तुम्ही ] ज्ञानी [ अश्वी ] आज आम्हांला स्तोत्र शिकवा. [ हा ] तुमचा भक्त [ हवि ] अर्पण करून गात आहे.

3. Therefore we invoke you who know; therefore teach you who know a hymn unto us to-day. This your worshipper having given you [an oblation] has been singing forth.

---

३. अज्ञानी आणि मंदबुद्धीच्या भक्तांनीं स्तोत्रादिक उपासना करण्याचा मार्ग अश्वींलाच विचारावा असें वर सांगितलें. आतां म्हणतोः 'यास्तव तुम्हां विद्वान् आणि ज्ञानी देवांला मी बोलावीत आहें, तर तुम्ही या आणि उत्तम स्तोत्र आणि आराधना कशी करावी तें मला शिकवा; मला साधी भोळी जी येते ती प्रार्थना तर मी करीतच आहें.'

या ऋचेचें वृत्त 'काविराट्' होय. काविराट् म्हणजे तीन चरणांचा श्लोक असून पहिला आणि तिसरा हे चरण नऊ नऊ अक्षरांचे, आणि मधला चरण जगती छंदाचा, म्हणजे बारा अक्षरांचा असतो.

वि पृच्छामि पाक्या३ न देवान्वषट्कृतस्याद्भुतस्य दस्रा ।
पातं च सह्यसो युवं च रभ्यसो नः ॥ ४ ॥

वि । पृच्छामि । पाक्या । न । देवान् । वषट्ऽकृतस्य । अद्भुतस्य । दस्रा ।
पातम् । च । सह्यसः । युवम् । च । रभ्यसः । नः ॥ ४ ॥

प्र या घोषे भृगवाणे न शोभे यया वाचा यजति पज्रियो वाम् ।
प्रैषयुर्न विद्वान् ॥ ५ ॥ २२ ॥

प्र । या । घोषे । भृगवाणे । न । शोभे । यया । वाचा । यजति । पज्रियः । वाम् ।
प्र । इषऽयुः । न । विद्वान् ॥ ५ ॥ २२ ॥

---

## भाषायाम्.

४. [ हे अश्विनौ ], [ अहं ] पाक्या देवान् ( =अपरिपक्वमतीन् देवान् ) न वि पृच्छामि ( =न प्रार्थये ) [ अपि तु युवामेव अपाक्यौ=परिपक्वमती वि पृच्छामि ] । हे दस्रा ( =आश्चर्यकारिकर्मणां कर्तारौ), वषट्कृतस्य ( =वषट् इति शब्देन सह प्रार्पितस्य ) सह्यसः ( =सहीयसः=अतिशयेन बलवतः ) [ सोमस्यांशं ] पातं च ( =पिबतं च ) नश्च ( =अस्मांश्च ) रभ्यसः ( =अतिशयेन रभस्विनः=प्रौढोद्यमान् ) [ कुरुतम् ] ॥

इमां सायण एवं व्याख्यातवान् । हे अश्विनौ युवां वि पृच्छामि । विशेषेण प्रष्टुमिच्छामि । पाक्या न । पक्तव्यप्रज्ञानान् अपरिपक्वमतीन् अन्यान् देवान् न पृच्छामि । किं तु युवामेव सर्वज्ञौ पृच्छामीत्यर्थः। हे दस्रा दर्शनीयौ तौ युवां वषट्कृतस्य वषट्कारेणाग्नौ हुतस्याद्भुतस्याश्चर्यभूतस्य महतः सह्यसोतिशयेन बलवतो बलोत्पादकस्य सोमस्य स्वांशलक्षणमेकदेशं पातं च । नोस्मांश्च रभ्यसोतिशयेन रभस्विनः प्रौढोद्यमान् कुरुतम् ॥

५. [ हे अश्विनौ ], या [ स्तुतिरूपा मम वाक् ] घोषे [न ] ( =एतन्नाम्नि भक्त इव) भृगवाणे न ( =भृगाविव च ) शोभे ( =शोभते ) यया वाचा ( =मम स्तुतिरूपया वाण्या ) पज्रियः ( =पज्रकुलोत्पन्नो मद्रूपो जनो) वां यजति ( =युवां स्तौति ) [ सा वाक् ] प्र[कृष्टा भवतु ] ( =समर्था भवतु ) । [ स च पज्रियः ] इषयुर्न ( =इषयुर्नाम भक्त इव ) विद्वान् ( =प्रज्ञानोपेतः सन् ) प्र[कृष्टो भवतु ] ( =समर्थो भवतु ) ॥

४. मी अप्रौढबुद्धीच्या देवांला प्रार्थीत नाहीं [ तर तुम्हांलाच प्रार्थीत आहें], तर हे अद्भुतकर्मकर्ते [अश्वी] हो, 'वषट्' उच्चारून अर्पिलेला आश्चर्यकारक [आमचा हा] अतिवळवान् सोम [तुम्ही] प्या आणि तुम्ही आम्हांला पराक्रमी करा.

५. [हे अश्वी हो], जी [पज्रपुत्राची] [वाणी], घोषाच्या आंगीं [शोभल्याप्रमाणें आणि] भृगवाणाच्या आंगीं [शोभल्या] प्रमाणें शोभते, [आणि] जिच्या योगानें पज्रपुत्र तुम्हांला भजत आहे, [त्या वाणीचा] उत्कर्ष [होओ]. आणि [तो] इषयूप्रमाणें ज्ञानी [होऊन] उत्कर्षाप्रत [पावो].

4. I am not addressing gods of immature intellects, [but you]. Drink, O miraculous [As'vins], of this wonderful [Soma], exceedingly mighty [and] offered with [the exclamation] *Vashat*; and make you us exceedingly strong.

5. May [that] speech prosper which shines [as] in Ghosha [and] as in Bhrigavâṇa, [and] with which the son of the Pajras is worshipping you both. May the son of the Pajras, [being] a sage like Ishayu, prosper.

---

४. 'हे अश्वी हो, मी कच्च्या बुद्धीच्या देवांची प्रार्थना करीत आहें असें नाहीं, तर ज्ञानी असे जे तुम्ही त्या तुम्हांस प्रार्थीत आहें, यास्तव हा आम्हीं 'वषट्' असा उद्गार उच्चारून अर्पण केलेला बळकट सोम तुम्हीं प्या आणि आम्हांला बळवंत करा.'

ही ऋचा थोडी कठिण आहे. काठिन्य हें कीं 'वि पृच्छामि पाक्या न देवान्.' यांतील 'पाक्या' शब्दाचा अर्थ 'पाक्यान्' अशा द्वितीयेच्या अर्थी घ्यावा लागतो. सायणांस अनुसरून (सायणभाष्य भाषेंत पहा) तसा घेतल्याशिवाय दुसरा निर्वाह दिसत नाहीं. कितीएक पाश्चिमात्य विद्वान् 'पाक्या' म्हणजे 'पाक्यया मत्या'=' अपरिपक्वया मम मत्या' असा अर्थ समजतात; पण मग 'न देवान्' याचा निर्वाह लागत नाहीं. आतां सायणांप्रमाणें घेतल्यास 'अपाक्यौ वाम्' इतकें 'पृच्छामि' याजबरोबर अध्याहृत घ्यावें लागतें. पण असे अध्याहार स्वाभाविक आहेत.

'वषट्.' सू. ३१ मं. ५ आणि त्यावरील टीप पहा.

**श्रुतं गायत्रं तकवानस्याहं चिद्धि रिरेभाश्विना वाम् ।**
**आक्षी शुभस्पती दन् ॥ ६ ॥**

श्रुतम् । गायत्रम् । तकवानस्य । अहम् । चित् । हि । रिरेभ । अश्विना । वाम् ।
आ । अक्षी इति । शुभः । पती इति । दन् ॥ ६ ॥

सायणस्तु । हे अश्विनौ प्र भवति समर्था भवति सा वाक् या वाक् युष्मत्स्तुतिरूपा घोषे घोषाख्यायाः पुत्रे सुहस्त्याख्ये ऋषौ भृगवाणे न भृगौ च शोभे । शोभते । यया च स्तुतिलक्षणया वाचा पज्रियः । पज्रा अङ्गिरसः । तेषां कुलोत्पन्नः कक्षीवान् युवां यजति । स्तौति । सापि शोभत इत्यर्थः । इषयुर्न । इषमन्नमात्मनः कामयमानश्च विद्वान् स्तुत्यभिज्ञः कक्षीवानृषिः प्रभवतु । युष्मदनुग्रहात्संपूर्णकामो भवत्वित्यर्थः । इति ॥

## भाषायाम्.

६. हे शुभस्पती ( =शोभनायाः कान्त्याः पती=श्रीपती ) अश्विना ( =अश्विनौ ), [ युवां ] तकवानस्य ( =" अन्धस्य ऋज्राश्वस्य ") गायत्रं ( =गायत्रच्छन्दसा निष्पादितं स्तोत्रं ) श्रुतं ( =शृणुतम्=अशृणुतम् ) । हि ( =यस्मात् कारणात् ) [ सः] अहं चित् ( =अहमिव=अहं यथेदानीं स्तौमि तथा ) अक्षी आ दन् ( =युवयोः सकाशात् अक्षी आददद्=दर्शनसामर्थ्यं लभमानः सन् ) वां ( =युवां ) रिरेभ ( =तुष्टाव ) ॥

आन्ध्योपहत ऋज्राश्वो युवां स्तुत्वा युवयोः सकाशाद् दर्शनसामर्थ्यं लब्धवान् । तस्य स्तोत्रं युवां यथा श्रुतवन्तौ ममापि तथैव शृणुतमिति भावः ॥

या ऋचेचें वृत्त ' नष्टरूपी.' ' नष्टरूपी ' म्हणजे ज्याचा पहिला पाद नऊ अक्षरांचा, दुसरा विराट् छंदाचा ( पुढें नवव्या ऋचेवरील टीप पहा ) आणि तिसरा चरण तेरा अक्षरांचा असतो.

५. भावार्थः—' मी घोष नांवाच्या मनुष्याप्रमाणें आणि भृगवाणाप्रमाणें गात आहें, आणि तुमचें स्तोत्र म्हणत आहें; तर ही माझी स्तुति तुम्हांस मान्य होओ आणि मला तुम्ही उत्तम कवि करा आणि माझा उत्कर्ष होई असें करा.'

' घोष.' हा कोण मनुष्य होता तें ठाऊक नाहीं. सायण म्हणतात, ' घोषा ' नांवाच्या स्त्रियेचा सुहस्त्य म्हणून पुत्र असे तोच हा. घोषा या नांवाच्या एका स्त्रियेविषयीं सू. ११७ मं. ७ पहा.

६. हे श्रीपती अश्वी हो, [तुम्हीं] आंधळ्या [ऋज्राश्वा]चें स्तोत्र ऐकिलें. कारण कीं त्याणें मजप्रमाणेंच तुमची स्तुति केली आणि [तो] चक्षूंप्रत पावला.

6. You heard the hymn of the blind [Rijrás'va]. For he, O As'vins, praised you just [as] I [am doing], receiving, O Lords of splendor, [his] eyes [from you].

‘भृगवाण.’ हें नांव पुनः विशेषनामार्थी ऋक्संहितेंत आल्याप्रमाणें दिसत नाहीं. सायणाचार्य म्हणतात, भृगु आणि भृगवाण एकच. ‘भृगु’ कोण याविषयीं सू. ५८ मं. ६, सू. ६० मं. १ आणि त्यांजवरील टीप पहा.

‘पज्रपुत्र’=‘पज्रियः.’ हा ‘पज्रिय’ म्हणजे सूक्तकर्ता कक्षीवान् ऋषीच समजावयाचा. सू. ११६ मं. ७ आणि सू. ११७ मं. ६ पहा.

‘इषयु.’ हा शब्द सुद्धां पुनः कोठें आलेला नाहीं. आम्ही हें येथें विशेषनाम समजून भाषांतर केलें आहे. पण सायणाचार्य अन्नार्थी असा अर्थ करून वेगळेंच भाष्य करितात तें भाष्यांत पहा.

या ऋचेचें वृत्त [illegible] या वृत्ताचें लक्षण असें असतें कीं, पहिले दोन चरण अकरा अकरा अक्षरांचे आणि तिसरा सहा अक्षरांचा असतो.

६. भावार्थः–‘हे अश्वी हो, आंधळा ऋज्राश्व याणें तुमची स्तुति केली ती तुम्हीं ऐकून घेतली, आणि त्याला दृष्टि दिली. त्याणें स्तुति केली ती, मी करीत आहें तिजसारिखीच होती. यास्तव माझीहि स्तुति तुम्ही ऐका.’

‘श्रीपती’=‘शुभस्पती.’ म्हणजे शोभा आणि सौंदर्य हीं ज्यांच्या सभोंतालीं उभीं असतात तसे. ‘शुभस्पती’ शब्द ऋक्संहितेंत पुष्कळ वेळ आला आहे आणि बहुतकरून तो अश्वींला विशेषणार्थी लाविलेला असतो.

[ऋज्राश्वाचें]. सू. १०० मं. १६ आणि त्यांजवरील टीप पहा.

‘ऐकिलें’ = ‘श्रुतम्.’ [illegible] क्रियापद आहे तरी सायणाचार्य ‘[illegible]’ या सूत्राप्रमाणें [illegible] आहे.

या ऋचेचें वृत्त उष्णिक् आहे; पण उष्णिक् वृत्ताला जितके [illegible] पाहिजेत तितके यांत नाहींत. सू. [illegible] मं. [illegible] पहा.

युवं ह्यास्तं महो रन्युवं वा यन्निरततंसतम् ।
ता नो वसू सुगोपा स्यातं पातं नो वृकादघायोः ॥ ७ ॥

युवम् । हि । आस्तम् । महः । रन् । युवम् । वा । यत् । निःऽअ-
ततंसतम् ।
ता । नः । वसू इति । सुऽगोपा । स्यातम् । पातम् । नः । वृकात् ।
अघऽयोः ॥ ७ ॥

मा कस्मै धातमभ्यमित्रिणे नो माकुत्रा नो गृहेभ्यो धेनवो गुः ।
स्तनाभुजो अशिश्वीः ॥ ८ ॥

मा । कस्मै । धातम् । अभि । अमित्रिणे । नः । मा । अकुत्र । नः ।
गृहेभ्यः । धेनवः । गुः ।
स्तनऽभुजः । अशिश्वीः ॥ ८ ॥

---

## भाषायाम्.

७. हि (=यस्मात् कारणाद्) युवं (=युवां) महो (=महतो धनस्य) रन् (=ददतौ=दातारौ) आस्तं (=भवथः) वा (=अथवा) युवं (=युवां) यत् (=यस्मात् कारणात्) निरततंसतं (="धनानि निरगमयतं"=धनानां निर्गमयितारौ भवथः)। ता [युवां] (=तौ युवां=तस्मात् कारणाद् युवां) हे वसू (=कल्याणकारिणौ देवौ), नः (=अस्माकं) सुगोपा (=सुगोपौ=शोभनौ रक्षकौ) स्यातं (=भवतम्) नः (=अस्मांश्च) अघायोः (=अस्मभ्यं पापमिच्छतो) वृकात् (=दुर्जनात्) पातं (=रक्षतम्) ॥

निरततंसतम् इत्यत्र तसिरलंकारे। अस्माण्ण्यन्ताल्लुङ् इत्यादि सायणः ॥

८. [हे अश्विनौ], नः (=अस्मान्) कस्मै अमित्रिणे (=कस्मैचिदपि शत्रवे) मा अभि धातं (=मा आभिमुख्येनावस्थापयतम्)। [अपि च] स्तनभुजः (=स्तनैर्वत्सान्भोजयन्त्यः=पाययन्त्यो) धेनवः (=गावः) अशिश्वीः (=अशिश्व्यः=शिशुरहिताः सत्यः) नः (=अस्माकं) गृहेभ्यः (=गृहाणां सकाशात्) अकुत्र (=अज्ञाते कस्मिंश्चिदपि स्थले) मा गुः (=मा गच्छन्तु) ॥

अमित्रिणे इत्यत्र। अमित्रं मित्राराहित्यम्। तद्वते कस्मैचिदपि शत्रवे। इति सायणः ॥

७. तुम्ही ज्यापेक्षां मोठ्या [ धना]चे दाते आहां आणि ज्यापेक्षां घालविणारेहि तुम्हीच आहांत त्यापेक्षां हे शुभकारी [देव] हो, तुम्ही आमचे उत्तम रक्षक व्हा [आणि ] घातक दुष्टापासून आम्हांला रक्षा.

८. [ हे अश्वी हो, ] तुम्ही आम्हांला कोणत्याहि शत्रूशीं प्रसंग पाडूं नका; [ आमच्या ] दुभत्या गाई वासरांस टाकून आमच्या घरांतून भलत्या ठिकाणीं न जाओत.

7. Inasmuch as you are the givers of great wealth and inasmuch as you also take it away, be you therefore, O good gods, our good protectors. Protect us from the malevolent evil-doer.

8. Do not confront us with any enemy. May the milching cows never stray from our houses into unknown places without their calves.

---

७. 'हे अश्वी हो, बऱ्यावाईटाचे कर्ते तुम्हीच आहां, त्यापेक्षां तुम्हीच आमचे रक्षक व्हा; आणि आमचें वाईट करूं इच्छिणाऱ्या दुष्ट लोकांपासून आम्हांस तारीत जा.'

'घालविणारेहि तुम्हीच आहां '= 'निरततंसतम्.' म्हणजे दिलेलें धन इत्यादि नाहींसें करणारेहि तुम्हीच आहां.

या मंत्राचें वृत्त 'विष्टारबृहती ' होय. याचें लक्षण असें आहे कीं, पहिला आणि चवथा हे चरण आठ आठ अक्षरांचे आणि मधले ( म्ह० दुसरा आणि तिसरा हे ) चरण दहा दहा अक्षरांचे होत. हीं अक्षरें प्रस्तुत ऋचेंत जमण्यासाठीं पहिल्या पादांत 'हि आस्तं' आणि तिसऱ्यांत 'सिआतं' असें वाचावें लागतें.

८. अश्वींनीं नित्य मित्राशींच प्रसंग पाडावा, शत्रूशीं पाडूं नये, आणि दुभत्या गाई पाडस घरीं टाकून बाहेर भटकत फिरतील असें होऊं देऊं नये अशी प्रार्थना या ऋचेंत आहे.

'शत्रूशीं प्रसंग पाडूं नका '=' अमित्रिणे मा अभि धातम्.' अक्षरार्थ 'शत्रूसमोर उभे करूं नका,' असा आहे.

'दुभत्या '=' स्तनभुजः.' अक्षरार्थ 'स्तनानें पाजणाऱ्या.'

या ऋचेचें वृत्त 'कृति ' होय. 'कृति' वृत्ताचें लक्षण असें आहे कीं, पहिले दोन चरण जगती छंदाचे, आणि तिसरा आठ अक्षरांचा असावा. अक्षरें बरोबर जमण्याकरितां प्रस्तुत मंत्राचे पहिल्या पादांत ' अभि अमित्रिणे ' आणि दुसऱ्यांत ' गृहेभिओ ' असें वाचावें, आणि तिसऱ्यांत ' अशिशुईः ' असें म्हणावें.

**दुहीयन्मित्रधितये युवाकु राये च नो मिमीतं वाजवत्यै ।**
**इषे च नो मिमीतं धेनुमत्यै ॥ ९ ॥**

दुहीयन् । मित्रऽधितये । युवाकु । राये । च । नः । मिमीतम् । वाजऽवत्यै ।
इषे । च । नः । मिमीतम् । धेनुऽमत्यै ॥ ९ ॥

**अश्विनोरसनं रथमनश्वं वाजिनीवतोः ।**
**तेनाहं भूरि चाकन ॥ १० ॥**

अश्विनोः । असनम् । रथम् । अनश्वम् । वाजिनीऽवतोः ।
तेन । अहम् । भूरि । चाकन ॥ १० ॥

**अयं समह मा तनूह्याते जनाँ अनु ।**
**सोमपेयं सुखो रथः ॥ ११ ॥**

अयम् । समह । मा । तनु । ऊह्याते । जनान् । अनु ।
सोमऽपेयम् । सुऽखः । रथः ॥ ११ ॥

---

## भाषायाम्.

९. [ हे अश्विनौ ], युवाकु ( =युवयोः ) मित्रधितये ( =मित्रत्वधारणाय=मित्रत्वं साधयितुम् ) [ इमे यजमाना ] दुहीयन् ( =गामदोहयन्=हविषःसाधनाय गोः पयो निरगमयन् ) । [ अतः कारणात् ] वाजवत्यै राये ( =अन्नयुक्तायै संपदे ) नः मिमीतं च ( =अस्मान् कुरुतं च=अस्मभ्यम् अन्नयुक्तं धनं दत्तं च ) धेनुमत्यै इषे ( =धेनुयुक्ताय धनाय ) नः मिमीतं च ( =अस्मान् कुरुतं च=अस्मभ्यं गोयुक्तं धनं च दत्तम् ) ॥

दुहीयन्नित्यादौ युवाकु युवां कामयमानाः स्तुतिभिर्यावयितारः संयोजयितारो वा स्तोतारो मित्रधितये मित्राणां बन्धुजनानां धारणार्थं दुहीयन् । युष्मत्सकाशाद्धनानि दुहन्ति प्राप्नुवन्तीति सायणः ॥

१०. [ अहं कक्षीवान् ] वाजिनीवतोः ( =वाजेन अन्नसंपदा युक्तयोः ) अश्विनोः अनश्वम् ( =अश्वरहितं ) रथम् असनम् (=समभजं=स्तौमि ) । तेन [ रथेन ] अहं भूरि ( =बहु ) [ धनं ] चाकन ( =कामये ) ॥

११. हे समह ( =पूजनीय ) [ रथ ], अयं [ त्वम् ] ( =अतः कारणात् त्वं )

९. [ हे अश्वी हो, ] तुमच्या मित्रत्वासाठीं [या जनांनीं] [गो]-दोहन केलें आहे. तर आम्हांला तुम्ही अन्नयुक्त संपत्ति द्या आणि आम्हांला गोयुक्त अन्न द्या.

9. [These worshippers] have milked the cow for your friendship. Help us, therefore, to wealth with food, and help us to food with cows.

१०. मी औदार्यसंपन्न अश्वींच्या अश्वरहित रथाला भजत आहें. त्याच्या द्वारें मला पुष्कळ धन मिळावें असें मी इच्छितों.

10. I adore the horseless chariot of the bounteous As'vins. Through it I long for plenty.

११. तर हे पूज्य [ रथा ], तूं माझा उत्कर्ष कर.—सुखकारक रथ सोमपानासाठीं जनांमध्यें ओढून आणिला जाओ.

11. Prosper me, therefore, thou adorable chariot. —May the easy-rolling chariot be brought down among the people for to drink the Soma.

९. 'हे अश्वी हो, या आमच्या मित्रांनीं गोदोहन करून तुम्हांसाठीं हव्य सिद्ध केलें आहे; तर तुम्ही आम्हांला धन, अन्न, गाई इत्यादि संपत्ति द्या.'

या ऋचेचें वृत्त 'विराट्.' या ऋचेवरून पहातां 'विराट्' वृत्ताचें लक्षण असें दिसतें कीं, त्रिष्टुभाचे तीन चरण (म्ह० अकरा अकरा अक्षरांचे) असले म्हणजे झालें. परंतु 'विराट्' वृत्ताचें साधारण लक्षण असें समजावयाचें कीं, त्याला तीन चरण असून प्रत्येकीं दहा अक्षरें असावीं.

१०. 'घोडे जोडिले नसतांहि चालणारा जो उदार अश्वींचा रथ त्याचें मी भजन करितों, आणि त्याच्या योगानें पुष्कळ संपत्ति मला मिळो अशी प्रार्थना करितों.'

'औदार्यसंपन्न'='वाजिनीवतोः'. किंवा 'उत्तम घोडे ज्यांला आहेत ते' असाहि अर्थ संभवतो. सू. २ मं. ५ आणि टीप पहा.

दहावी आणि पुढच्या दोन अशा तीन ऋचांचें वृत्त गायत्री होय. नवव्या ऋचेपर्यंत प्रत्येकीं वेगवेगळें वृत्त आहे अशा संबंधानें हें सूक्त चमत्कारिक आहे.

११. 'तर हे पूज्य रथा, तूं माझें कल्याण कर.— हा चांगला चालणारा रथ, आम्हां स्तोत्यांचा सोम पिण्याकरितां अश्वींचे घोडे ओढून आणोत.'

**अध स्वप्नस्य निर्विदेऽभुञ्जतश्च रेवतः ।**
**उभा ता बस्त्रि नश्यतः ॥ १२ ॥ २३ ॥ १७ ॥**

अध । स्वप्नस्य । निः । विदे । अभुञ्जतः । च । रेवतः ।
उभा । ता । बस्त्रि । नश्यतः ॥ १२ ॥ २३ ॥ १७ ॥

मा तनु (=मां प्रवर्धय="पुत्रपौत्रधनदानादिभिः समृद्धं कुरु") । सुखः (=सुख-कारी=सुखगमनो) रथः सोमपेयं (=सोमपानार्थं) जनान् अनु (=स्तोतृजनेषु) ऊह्याते (=ऊढो भवतु=अश्विनोरश्वैरानीतो भवतु) ॥

हे समह धनेन सहित हे रथेति सायणः । समहशब्दः यथाकथंचिद् इत्यर्थकमव्ययमिति यास्मनः ॥ सायणेन तु क्वचित्पूज्यशब्देन क्वचिद्धनयुक्तशब्देन व्याख्यातः ॥

## भाषायाम्.

१२. अध (=अथ=अतः कारणात्) [अहं] स्वप्नस्य निर्विदे (=स्वप्नं प्रति निर्विण्णोस्मि=प्राप्तविषादोस्मि) अभुञ्जतः (=परान् अरक्षतश्च) रेवतः (=धनवतः पुरुषस्य=एतादृशं पुरुषं प्रति) च [निर्विदे=निर्विण्णोस्मि] । उभा ता (=तावुभावपि) बस्त्रि (=शीघ्रं) नश्यतः (=नष्टौ भवतो) [हि] ॥

---

## सूक्तम् १२१.

कक्षीवान् ऋषिः । विश्वे देवा इन्द्रो वा देवता । त्रिष्टुप् छन्दः ॥

**कदित्था नॄँः पात्रं देवयतां श्रवद्गिरो अङ्गिरसां तुरण्यन् ।**
**प्र यदानड्विश आ हर्म्यस्योरु क्रंसते अध्वरे यजत्राः ॥ १ ॥**

कत् । इत्था । नॄन् । पात्रम् । देवऽयताम् । श्रवत् । गिरः । अङ्गि-रसाम् । तुरण्यन् ।
प्र । यत् । आनट् । विशः । आ । हर्म्यस्य । उरु । क्रंसते । अध्वरे । यजत्राः ॥ १ ॥

## भाषायाम्.

१. नॄन् पात्रं (=नरान् स्तोतॄन् पातरं=पातारं=पालयितारम् इन्द्रं) देवयतां (=यजताम्) अङ्गिरसाम् (=अङ्गिरोपत्यानामस्माकं) गिरः (=स्तुतीः) [स

१२. यास्तव मला स्वप्नाचा आणि दान न करणाऱ्या श्रीमान् पुरुषाचा कंटाळा येतो. त्या दोहींचाहि लवकरच नाश होतो.

12. So I am disgusted with a dream and with a wealthy man that does not give. They both quickly disappear.

१२. मंत्राचा भावार्थ तर उघडच आहे. 'स्वप्नांतील संपत्ति आणि कृपणाची संपत्ति या दोहोंचा मला कंटाळा येतो; कारण कीं दोहोंचाहि लोकांस उपयोग होत नाहीं, दोनींहि लवकरच लयाप्रत पावतात.' परंतु पूर्व मंत्राशीं याचा संबंध लावणें किंचित् कठीण दिसतें. 'यास्तव हे अश्वींच्या रथा, द्रव्यवान् जो तूं तो तुझें द्रव्य देण्यास आम्हांजवळ ये' असा भावार्थ कदाचित् काढावयाचा असेल.

---

## सूक्त १२१.

ऋषि—कक्षीवान् (पूर्वसूक्ताचाच). देवता—विश्वे देव किंवा इंद्र. वृत्त—त्रिष्टुभ्.

## HYMN 121.

To *Indra* (or *Vis've Devâs*, i.e., all the Gods taken collectively). By *Kakshîvân*, the author of the previous hymn. Metre—*Trishtubh*.

१. भक्तजनांला पाळणाऱ्या [इंद्रा]ची सेवा करणारे जे अंगिरस त्यांचीं स्तोत्रें [इंद्र] त्वरित येऊन खरोखरच ऐकेल काय? [कारण कीं] पूजनीय [इंद्र] जेव्हां घरांतील लोकांत येऊन शिरतो, तेव्हां [तो] मोठीं पावलें टाकीत यज्ञाप्रत येत असतो.

1. Of the Angirases who worship Indra, the protector of worshippers, will he, coming in haste, truly hear the prayers? [For] when he arrives among the people of the house, he, the adorable one, makes wide strides to the sacrifice.

१. हें सूक्त इंद्राविषयीं आहे. अश्वींचीं सूक्तें जशीं सोपीं असतात तशीं इंद्राविषयींचीं नसतात. हीं किंचित् कठीण आणि दुर्बोध असतात. या पहिल्या मंत्राचा भावार्थ असा आहे कीं, 'आम्ही अंगिरस्कुळांत जन्मलेले जन मिळून भक्तपालक इंद्राची स्तुति गात आहों; तर इंद्र लगबगीनें येऊन आमची ही प्रार्थना ऐकेल काय? बहुतकरून ऐकेल, कारण यज्ञ होऊं लागला

**स्तम्भी॑द्ध॒ द्यां स ध॒रुणं॑ प्रुषाय॒दृभु॒र्वाजा॑य॒ द्रवि॑णं॒ नरो॒ गोः ।**
**अनु॑ स्व॒जां म॑हि॒षश्च॑क्षत॒ व्रां मेना॒मश्व॑स्य॒ परि॑ मा॒तरं॒ गोः ॥ २ ॥**

स्तम्भी॑त् । ह॒ । द्याम् । सः । ध॒रुण॑म् । प्रु॒षा॒य॒त् । ऋ॒भुः । वाजा॑य ।
द्रवि॑णम् । नरः॑ । गोः ।
अनु॑ । स्व॒ऽजाम् । म॒हि॒षः । च॒क्षत॒ । व्राम् । मेना॑म् । अश्व॑स्य । परि॑ ।
मा॒तर॑म् । गोः ॥ २ ॥

---

इन्द्रस् ] तुरण्यन् ( =सत्वरम् आगच्छन् ) इत्था श्रवत् कत् ( =सत्यमेव शृणुयात् किम् ) ? यजत्रः ( =यजनीयः=पूजनीयः ) [ स हि ] यद् ( =यदा ) हर्म्यस्य ( =गृहस्य ) विश आ ( =जनेषु मध्ये ) प्रानट् ( =प्रविशति ) [ तदानीं सः ] अध्वरे ( =यज्ञस्थले ) उरु क्रंसते ( =वहुलं क्रमते=दीर्घाणि पदानि अस्यति ) ॥

नॄन् पात्रमित्यादि दुर्बोधं सायण एवं व्याख्यातवान् । नॄः पात्रं नॄन्पाता नृणां स्तुतेर्नेतॄणां पुरुषाणां रक्षणशील इन्द्रस्तुरण्यन् गोरूपं धनं प्रेरयन् देवयतां देवं द्योतमानं दानादिगुणयुक्तं वेन्द्रमात्मन इच्छतामङ्गिरसामृषीणामस्माकमित्येतत् प्रयुज्यमाना गिरः स्तुतीः कत् कदा कस्मिन् काले श्रवत् । शृणुयात् । इत्यादि ॥

---

## भाषायाम्.

२. [ इन्द्रो ] ह ( =इन्द्रः किल ) द्यां स्तम्भीत् ( =द्युलोकम् अस्तभ्नात्=अधो यथा न पतति तथा करोति ) ऋभुः ( =तेजस्वी ) नरः ( =शूरः ) [ एतादृशः ] स [ इन्द्रो ] वाजाय ( =अन्नाय=अस्मादृशामन्नलाभाय ) धरुणं ( =मेघोदकं ) द्रविणं गोः ( =गोधनं=गोरूपं धनं ) [ च ] प्रुषायत् ( =वर्षयतु ) । महिषः ( =महान् =यौवनोपेतः स ) स्वजां व्रां ( =स्वकन्याभूताम् उषसम् ) अनु चक्षत ( =पश्चात् पश्यति=कामीव तां पश्यति ) [ अपि च ] [ सः ] अश्वस्य मेनां ( =स्त्रियं= वडवां ) गोः मातरं ( =गां ) परि [ अगमयत् ] ( =विपरीताम् अकरोत्=वडवां गामकरोत् ) ॥

सायणस्तु । स इन्द्रो द्यां द्युलोकं स्तम्भीद्ध । स्तभ्नाति खलु । तथा गोः पणिभिरपहृतस्य गोसमूहस्य वज्रस्योदकस्य किरणसमूहस्य वा नरो नेता । स इन्द्र ऋभुः सूर्यात्मनोरु विस्तीर्णं भासमानः सन् द्रविणं सर्वैः प्राणिभिरभिद्रवणीयं धरुणम् । उदकनामैतत् । सर्वस्य धारकं वृष्ट्युदकं वाजायान्नार्थं बलार्थं वा प्रुषायत् । प्रुष्णाति सिञ्चति प्रवर्षतीत्यर्थः । अपि च । महिषः । महन्नामैतत् । महान्सूर्यरूपीन्द्रः स्वजां स्वसकाशादुत्पन्नां व्राम् । वृणोति तमसा सर्वमाच्छादयतीति व्रा रात्रिः । यद्वा । प्रका-

२. त्याणें द्युलोकाला धारण केलें आहे. तेजस्वी [आणि] शूर [इन्द्र] उदक [आणि] गोरूप धन यांचा वर्षाव करो. प्रौढ [इंद्र] आपली कन्या उषा इच्या मागून डोळा घालितो. तो अश्वाच्या स्त्रीला गाईची आई करिता झाला.

2. He supports the heaven; may he, the splendid hero, shower water and bovine wealth for food. The puissant one ogles at fair Ushas born of his own body. He turned the mare into the mother of the cow.

---

आणि यज्ञ करणाऱ्याच्या घरांतील लोकांनीं त्याचें आह्वान केलें म्हणजे तो त्यांजकडे लगबगीनें मोठमोठीं पावलें टाकीत येत असतो.'

'भक्तजनांला पाळणाऱ्या [इंद्रा]ची सेवा करणारे जे अंगिरस त्यांची'= 'नॄन् पात्रं देवयताम् अङ्गिरसाम्.' 'नॄन् पात्रं' हे शब्द कठीण आहेत, पण आम्हीं केला तसा अर्थ केल्याशिवाय चांगला निर्वाह दिसत नाहीं. 'नॄन् पाहि' (=' आम्हां भक्तजनांला पाळ,) अशी प्रार्थना इंद्राविषयीं (आणि अग्नीविषयीं) वेदांत येत असते. उदाहरणार्थ ऋ. १. १७१. ६; ८. ८४. ६.

'खरोखरच ऐकेल काय?'=' इत्था श्रवत् कत्?'. 'कत्' हें 'कः' पासून झालेलें 'किम्' याऐवजीं रूप आहे. जसें 'यः' पासून 'यत्,' 'सः' पासून 'तत्,' तसें 'कः' पासून 'कत्.' 'इत्था' याचा अर्थ 'खरोखरच' असा आहे याविषयीं ऋ. ६. १८. ५ याजवरील सायणभाष्य पहा.

वृत्तासाठीं पहिल्या चरणांत 'पात्रम्' च्या ठिकाणीं 'पातरम्' आणि दुसऱ्यांत 'र्हामिअस्य' असें म्हणावें.

---

२. हाहि मंत्र कठीण आहे. भावार्थः- 'त्याणें स्वर्गलोक अंतराळीं सांवरून धरिला आहे; तर असा जो पराक्रमी महातेजस्वी इंद्र तो आम्हांस, अन्न मिळावें म्हणून मेघोदक आणि गाई यांची समृद्धि करून टाको. त्याचीं चरितें तर आश्चर्यकारक आहेत. त्याचीच कन्या जी उषा तिजकडेस तो दृष्टि घालून पाहतो, आणि घोडीच्या पोटीं गाय उत्पन्न करितो.'

'द्युलोकाला धारण केलें आहे'= 'स्तम्भीत् ह द्याम्.' म्हणजे आकाश आणि त्याजवरील जे महातेजस्वी ताऱ्यांनीं व्यापिलेले प्रदेश ते खालीं न पडत असें केलें आहे.

'गोरूप धन'=' द्रविणं गोः.' सायणांनीं अन्वय वेगळा केला आहे. भाषा पहा.

'प्रौढ इंद्र' इ०. हा उत्तरार्ध कठीण आहे. आम्हीं बहुतकरून सायणांप्रमाणें

नक्षद्धवमरुणीः पूर्व्यं राट् तुरो विशामङ्गिरसामनु द्यून् ।
तक्षद्वज्रं नियुतं तस्तम्भद् द्यां चतुष्पदे नर्याय द्विपादे ॥३॥

नक्षत् । हवम् । अरुणीः । पूर्व्यम् । राट् । तुरः । विशाम् । अङ्गिरसाम् । अनु । द्यून् ।
तक्षत् । वज्रम् । निऽयुतम् । तस्तम्भत् । द्याम् । चतुःऽपदे । नर्याय । द्विऽपादे ॥ ३ ॥

शेन वृणोतीति व्रा उषाः । तामनु चक्षत । चष्टिः पश्यतिकर्मा । अनु पश्चात्पश्यति प्रकाशते । स्वयं प्रौढप्रकाशोऽपि स्वगत्या निष्पादिताया रात्रेरुषसश्च पश्चादुदेतीत्यर्थः । अपि चेदमपरमाश्चर्यं यदयमश्वस्य मेनाम् । स्त्रीनामैतत् । स्त्रियं वडवां गोर्मातरं जननीम् । परिर्वैपरीत्ये । विपरीतामकरोत् । कदाचिदिन्द्रो लीलयाश्वायां गामुत्पादयामास । तदत्र प्रतिपाद्यते मन्वान्तरे चेन्द्रवाक्यरूपेणैतद्विस्पष्टमवगम्यते । इति ॥

## भाषायाम्.

३. अरुणीः पूर्व्यं राट् ( =अरुणीनाम् आरक्तवर्णानाम् उषसां पूर्वमेव प्रकाशमान ) [ इन्द्रस् ] तुरः (=त्वरमाणः=त्वरयागच्छन् ) अङ्गिरसां विशाम् ( =अङ्गिरसः कुले जातानां जनानां ) हवम् ( =आह्वानम् ) अनु द्यून् ( = दिवसे दिवसे=प्रतिदिनं ) नक्षत् ( =प्राप्नोतु=शृणोतु ) । [ स ] नर्याय ( =नृभ्यो हिताय ) चतुष्पदे ( =गवाश्वादये प्राणिजाताय ) द्विपादे ( =मनुष्याय च ) वज्रं नियुतं तक्षत् ( =वज्रं स्ववशं गमितवान् ) द्यां ( =द्युलोकं च ) तस्तम्भत् ( =अस्तभ्नात् ) ॥

अरुणीररुणवर्णा आरोचमाना वोषसो राट् राजयन् प्रकाशयन् सूर्यात्मेन्द्रः पूर्व्यं पूर्वैर्ऋषिभिः प्रयुक्तं हवमिदानीमस्माभिः क्रियमाणमाह्वानं नक्षत् । नक्षतु । शृणोतु । ......अपि च वज्रं स्वकीयमायुधं नियुतं हन्तव्येन सह नितरां युक्तं तक्षत् । अकरोत् । इत्यादि सायणः ॥

अर्थ केला आहे. 'व्रा' शब्दाचा अर्थ जरी संघ असा प्रायः होतो तरी उषा असाहि सायणांनीं इतरत्र केला आहे. इंद्र हा सूर्यरूपीच आहे, म्हणून उषा त्याची कन्या होय, कारण ती वस्तुतः सूर्यकिरणात्मक आहे असें मानिलें पाहिजे. इंद्र उषेकडे कामदृष्टीनें पाहतो असें इंगित दिसतें.

'अश्वाच्या स्त्रीला गाईची आई करिता झाला '=' मेनाम् अश्वस्य परि मातरं गोः.' म्ह० घोडीपासून गाय निपजविता झाला. सायणाचार्य म्हणतात, इं-

३. अरूणवर्णे उषांच्या पूर्वी प्रकाशून [ इंद्र ] सत्वर येऊन प्रतिदिनीं आंगिरस लोकांचें आह्वान ऐको. त्याणें मनुष्यांच्या उपयोगीं पडणाऱ्या [ अशा ] चतुष्पाद प्राण्यांसाठीं आणि द्विपाद प्राण्यांसाठीं वज्र आपल्याला वश केलें, आणि द्युलोकाचें धारण केलें.

3. Shining before the ruddy dawns, may He swiftly reach the invocation of the family of the Angirases from day to-day. For the sake of the quadruped [creation], useful to man, and of the biped [creation]; He rendered the thunderbolt subject to his power [and] upheld the heaven.

द्रानें एकदा लीलेनें घोडीच्या पोटीं गाय उत्पन्न केली असें दुसऱ्या एका मंत्रांत सांगितलें आहे.

एकंदरींत उत्तरार्ध दुर्बोध आहे यांत संशय नाहीं.

३. यांत जरी इंद्राचें नांव नाहीं, तरी ही ऋचा इंद्राविषयींच आहे असें समजून सायणांप्रमाणें आम्हीं अर्थ केला आहे.

‘ उषांच्या पूर्वी ’=‘ अरूणीः पूर्व्यम्.’ म्हणजे उषा उगवते त्यापूर्वींच. ‘अरूणीः पूर्व्यम् ’ हे शब्द कठीण आहेत. ‘अरूण्याः पूर्व्यम् ’ उषेच्या पूर्वी, किंवा ‘ अरुणीनां पूर्व्यम् ’ असें पाहिजे होतें. सायणाचार्य ‘ अरूणीः राट् पूर्व्य हवं नक्षत् ’ (=‘ उषांला प्रकाशविणारा इंद्र, पूर्वींच्या ऋषींनीं केलेलें आह्वान आम्हीं आतां करीत आहों, तें ऐको’ ) असें भाष्य करितात.

‘ आंगिरस लोकांचें.’ म्हणजे आमचें.

उत्तरार्धाचें तात्पर्य असें आहे कीं, पर्जन्य वेळेवर पडावा आणि मनुष्यांचें, आणि त्यांचीं जीं गाई घोडे इत्यादि जनावरें त्यांचें, हित व्हावें म्हणून, पृथ्वीवर आकाश अंतराळीं धरिलें आणि वज्रघात होऊन अकाळीं वृष्टि होऊं नये म्हणून वज्रावर आपला अधिकार बसविला.

वृत्तासाठीं पहिल्या पादांत-‘ पूर्विअम् ’ आणि चवथ्यांत ‘ नरिआय ’ असें वाचलें पाहिजे.

**अस्य मदे स्वर्यं दा ऋतायापीवृतमुस्रियाणामनीकम् ।**
**यद्ध प्रसर्गे त्रिककुम्निवर्तदप द्रुहो मानुषस्य दुरो वः ॥ ४ ॥**

अस्य । मदे । स्वर्यम् । दाः । ऋताय । अपिऽवृतम् । उस्रियाणाम् । अनीकम् ।

यत् । ह । प्रऽसर्गे । त्रिऽककुप् । निऽवर्तत् । अप । द्रुहः । मानुषस्य । दुरः । वरिति वः ॥ ४ ॥

**तुभ्यं पयो यत्पितरावनीतां राधः सुरेतस्तुरणे भुरण्यू ।**
**शुचि यत्ते रेक्ण आयजन्त सबर्दुघायाः पय उस्रियायाः ॥५॥२४**

तुभ्यम् । पयः । यत् । पितरौ । अनीताम् । राधः । सुऽरेतः । तुरणे । भुरण्यू इति ।

शुचि । यत् । ते । रेक्णः । आ । अयजन्त । सबःऽदुघायाः । पयः । उस्रियायाः ॥ ९ ॥ २४ ॥

---

## भाषायाम्.

४. [ हे इन्द्र ], अस्य [ प्रार्थ्यमाणस्य सोमस्य ] मदे (=हर्षे जाते सति ) [त्वम्] उस्रियाणां ( =गवाम् ) अपीवृतं ( =पणिना निगूढं ) स्वर्यं ( =तेजस्वि=दीप्तिमत् ) अनीकं ( =वृन्दम् ) [अङ्गिरोभ्यः =अस्माकं पूर्वपितृभ्यः ] ऋताय ( =यज्ञाय=यज्ञसाधनाय ) दाः ( =अदाः=दत्तवानसि ) । यद्ध ( =यदा किल ) प्रसर्गे (=संग्रामे ) त्रिककुप् ( =अतिश्रेष्ठ ) [ इन्द्रो ] निवर्तत् ( =नितरामवर्तत=शत्रुणा सह युयुधे ) [ तदा ] मानुषस्य द्रुहः ( =मनुष्यसंबन्धिनः=मनुष्यजातस्य शत्रोः पणेः ) दुरो (=द्वाराणि '' गवामनिर्गमनाय पिहितानि '') अप वः (=अपावः=उद्घाटितवान् ) ॥

५. यद् ( =यदा=अपि च तदानीं=पूर्वमन्त्रोक्तगोमोचनकाले ) भुरण्यू ( =पोषयन्त्यौ ) [ तव] पितरौ तुरणे [द्यावापृथिव्यौ] (=त्वरमाणे सत्यौ=त्वरयागत्य) तुभ्यं पयः (=दुग्धं) सुरेतः राधः (=समृद्धमन्नं च ) अनीताम् (=अनयताम्=प्रापयताम् ) । यद् (=यदा=तदानीं च) [तव भक्ताः] सबर्दुघायाः (=क्षीरस्य दोग्ध्या ) उस्रियायाः ( =गोः ) पयः [ तदेव ] शुचि रेक्णः ( =शुद्धं हविर्द्रव्यं ) ते ( =तुभ्यम् ) आ अयजन्त ( =प्रायच्छन् ) ॥

४. ह्या [ सोमाच्या ] हर्षांत [हे इंद्रा], तूं गाईंचा लपवून ठेविलेला उत्तम समूह यज्ञासाठीं [अंगिरसांला ] देता झालास.—जेव्हां संग्रामांत अत्युच्च [ इंद्र ] चालून गेला, तेव्हां त्याणें मनुष्यांच्या शत्रूचे दरवाजे फोडून टाकिले हें प्रसिद्ध आहे.

4. In the exhilaration of this [ Soma] thou didst, [ O Indra ], restore [ to the Angirases ] for the rite the splendid flock of the cows that had been concealed.—When, as is wellknown, the high-towering [Indra] engaged in battle, he broke open the gates of the enemy of man.

५. आणि [ हे इंद्रा ], तेव्हां [ तुझ्या ] वत्सल आईबापांनीं त्वरित [येऊन] तुला दूध [आणि] पुष्टिकारक अन्न अर्पण केलें, आणि पायस देणाऱ्या गाईचें जें दूध [ तेंच कोणी एक ] शुद्ध द्रव्य तुला [ भक्तजन ] अर्पण करिते झाले.

5. When [ thy ] kind parents, coming in haste, brought thee milk [and] nourishing food, and [ thy worshippers ] offered to thee the milk of the nectar-giving cow, a pure oblation.

४. सूक्तवक्ता ऋषि हातांत सोम घेऊन म्हणतो, ‘ पूर्वींच्या काळीं आमचे वाडवडील जे अंगिरस, त्यांनीं अर्पण केलेला सोमरस पिऊन आनंदित झाल्यानंतर इंद्रानें त्यांला पणि नांवाच्या असुरानें ( मेघासुरानें=वृत्रानें ) कोंडून ठेविलेल्या गाई (=मेघोदकें ) मोकळ्या करून दिल्या आणि यज्ञादिक कर्में चालू केलीं; कारण त्याणें वृत्राशीं संग्राम करून मनुष्यांचा शत्रु जो वृत्र त्याणें झांकलेले दरवाजे फोडून टाकिले आणि गाई मोकळ्या केल्या हें प्रसिद्ध आहे.’

‘ हें प्रसिद्ध आहे ’ इतके शब्द ‘ ह ’ या अव्ययापासून गम्यमान आहेत.

वृत्तासाठीं पहिल्या पादांत ‘ स्वरिअं ’ असें म्हटलें पाहिजे.

५. गाईची मोकळीक इंद्रानें केली असें वर सांगितलें. त्या प्रसंगीं काय काय झालें तें आतां सांगतो: ‘ तुझे आईबाप अशा ज्या द्यावापृथिवी, त्या सत्वर येऊन तुला दूध पाजून अन्न देत्या झाल्या. आणि तुझे भक्त तुला गाईचें शुद्ध दूध अर्पण करिते झाले.’

‘ त्वरित [ येऊन ]’=‘ तुरणे. ’ हें

अध प्र जज्ञे तरणिर्ममत्तु प्र रोच्यस्या उषसो न सूरः ।
इन्दुर्येभिराष्ट स्वेदुहव्यैः स्रुवेण सिञ्चञ्जरणाभि धाम ॥ ६ ॥

अध । प्र । जज्ञे । तरणिः । ममत्तु । प्र । रोचि । अस्याः । उषसः । न । सूरः ।
इन्दुः । येभिः । आष्ट । स्वऽइदुहव्यैः । स्रुवेण । सिञ्चन् । जरणा । अभि । धाम ॥ ६ ॥

## भाषायाम्.

६. अध (=अथ=इदानीं) तरणिः (=शत्रूणां तारकः=विजयी) [इन्द्रः] प्र जज्ञे (=प्रादुर्बभूव) [स] सूरो न (=सूर्य इव) अस्या उषसः [समीपे] प्र रोचि (=प्र रोचते=प्रकर्षेण प्रकाशते) । [सः] [अस्मान्] ममत्तु (=मादयतु=सुखिनः करोतु) येभिः (=यैः स्वेदुहव्यैः=स्वायत्तसमृद्धहविष्कैः) [अस्माभिः] इन्दुः (=सोमः) स्रुवेण सिञ्चन् (=सिच्यमानः सन्) जरणा (=जरणया स्तुत्या समम्) अभि धाम (=आहवनीयस्थानमभिलक्ष्य) आष्ट (=आशितः=भोजितः)॥

एतां भृशं दुर्बोधां सायण एवं व्याख्यातवान् । अथेदानीमयमिन्द्रः स्तुतिभिः प्रीयमाणः सन् प्र जज्ञे । प्रकर्षेण प्रादुर्बभूव । स तरणिः शत्रूणां तारकोऽस्मान् ममत्तु । मादयतु । स च प्र रोचि । प्रकृष्टं रोचते । तत्र दृष्टान्तः । अस्या अस्माभिर्दृश्यमानाया उषसः समीपे वर्तमानः सूरो न । सूर्य इव । जरणा जरणीयः स्तोतव्य इन्दुः सोमो धामाहवनीयलक्षणं स्थानमभिलक्ष्य स्रुवेण सिञ्चन् सिच्यमानः सन् स्वेदुहव्यैः स्वभूतसमृद्धहविष्कैर्येभिर्यैरस्माभिराष्ट । आशित आसीत् । तानस्मान्मादयत्वित्यर्थः ॥

'पितरौ' याचें विशेषण होय असें कितीएक पाश्चात्त्य विद्वानांला अनुसरून आम्हीं निर्वाह केला आहे. सायण 'तुरणे' ही 'तुरण्' शब्दाची चतुर्थी समजून 'तुभ्यम्' याचें विशेषण आहे असें मानितात. अर्थात विशेष भेद नाहीं. 'तुरन्' किंवा 'तुरण' याचीं दुसरीं रूपें आणखी कोठें आलेलीं नाहींत.

या ऋचेचे पहिला, दुसरा आणि तिसरा हे चरण अगदी आधुनिक श्लोकाप्रमाणें वाचतां येतात. तिसऱ्यांत 'रेकण' असा उच्चार वृत्तासाठीं केला पाहिजे.

६. आतां पहा, महाविजयी [इंद्र] प्रगट झाला आहे [आणि] सूर्याप्रमाणें या उषेजवळ प्रकाशत आहे; [तो] [आम्हांला] आनंदित करो: ज्या [ आम्हीं ] आपल्या मधुर हवींच्या योगानें प्रार्थनेसहित सोमरस पळीनें वेदीजवळ ओतून अर्पण केला आहे.

6. Now the victor is manifested; he shines near this Ushas like the sun; may he gladden us, who have caused him to enjoy our own oblations poured forth with the ladle along with prayer at the altar.

---

६. ही ऋचा अतिशय कठीण आहे. हिचा अर्थ, विशेषेंकरून उत्तरार्धाचा, फार दुर्बोध आहे. अन्वयहि उघड नाहीं. आम्हीं केवळ सायणांस अनुसरलों आहों. इतका भावार्थ मात्र स्पष्ट दिसतो कीं, पहांटेस ऋषि म्हणतो, 'हा पहा इंद्र उषेजवळ सूर्य उगवतो तसा जणुं उगवला आहे आणि प्रकाशत आहे. तो आम्हीं दिलेलें हवि भक्षून आनंदित होओ.'

'स्वेदुहव्यैः.' 'आष्ट' आणि 'जरणा' हीं पदें अति कठीण आणि वादग्रस्त आहेत.

वृत्तासाठीं दुसऱ्या पादांत 'प्ररोचि अस्याः' आणि तिसऱ्यांत 'सुएदुहव्यैः' असें वाचावें लागतें.

**स्विध्मा यद्वनधितिरपस्यात्सूरो अध्वरे परि रोधना गोः ।**
**यद्ध प्रभासि कृत्व्याँ अनु द्यूननर्विशे पश्विषे तुराय ॥ ७ ॥**

सुऽइध्मा । यत् । वनऽधितिः । अपस्यात् । सूरः । अध्वरे । परि । रोधना । गोः ।

यत् । ह । प्रऽभासि । कृत्व्यान् । अनु । द्यून् । अनर्विशे । पशुऽइषे । तुराय ॥ ७ ॥

---

## भाषायाम्.

७. एषापि भृशं दुर्बोधा । सायणेनापि कथंकथमपि व्याख्याता । तदेवम् । यदि स्विध्मा सुदीप्तास्या वनधितिर्वने छेत्तव्ये वृक्षसमूहे निधातव्या शस्त्र्यपस्यात् । अपोविशसनात्मकं स्वकीयं कर्म कर्तुमिच्छेत् तदानीं सूरः प्रेरकोऽध्वर्युरध्वरे यज्ञे गोः पशो रोधना रोधनाय यूपे नियोजनाय परि भवति । समर्थो भवति । यद्वा । स्विध्मा सूर्यकिरणैः सुदीप्ता वनधितिः । वनमुदकमस्यां धीयत इति वनधितिर्मेघमाला । सा यद्यदापस्यात् अपःप्रवर्षणलक्षणं कर्म करोति तदानीं सूरः प्रेरक इन्द्रोऽध्वरे यज्ञस्य निमित्तभूतेऽध्वर्तव्येऽहिंसितव्येऽन्तरिक्षे वर्तमानः सन् गोर्वृष्ट्युदकस्य रोधना रोधनान्यावरणानि परि परितो निवारयतीति शेषः । उत्तरार्धः प्रत्यक्षकृतः । हे इन्द्र सूर्यात्मना वर्तमानस्त्वं कृत्व्यान् । कृत्वीति कर्मनाम । कर्मसु साधून् द्यून् दिवसान् अनुलक्ष्य यद्ध यदा खलु प्रभासि । प्रकर्षेण दीप्यसे । तदानीमनर्विशेऽनसा शकटेनेन्धनाद्याहरणायारण्यं प्रविशते । यद्वा । गन्तव्यं स्थलं प्रति गन्तुमशक्ताय पुरुषाय पश्विषे पशून् प्रेरयते तुराय त्वरमाणाय गोपालाय च सिध्येदभिमतमिति वाक्यशेषः । इति ॥

७. जेव्हां लकलकीत सुरी सिद्ध होते तेव्हां गाईला बांधावयाला अध्वर्यु समर्थ होतो.—[ हे इंद्रा ], जेव्हां तूं उत्सवाच्या दिवसीं प्रकाशतोस तेव्हां लांकडें आणणाऱ्याचा, [ आणि ] गुरें हाकणाऱ्या चपळ गुराख्याचा [ मनोरथ पूर्ण होतो ].

7. When the brilliant sword is ready to work, the priest is able to tie the cow.—When, [ O Indra ], thou shinest on sacred days, [ success attends ] the cartman and the swift driver of cattle.

---

७. हीहि ऋचा अतिशय कठीण आहे. हिचा तर भावार्थ सुद्धा समजत नाहीं. सायणाचार्य देखील निश्चयानें अर्थ करूं शकले नाहींत. त्यांच्या भाष्याप्रमाणें आम्हीं भाषांतर केलें आहे. ऋग्वेदांत कितीएक मंत्र आणि कांहीं कांहीं सूक्तेंहि अतिक्लिष्ट आहेत. त्यांपैकीं हें सूक्त आहे, आणि हा मंत्र तर अतिशय दुर्बोध आहे.

**अष्टा महो दिव आदो हरी इह द्युम्नासाहमभि योधान उत्सम् ।**
**हरिं यत्ते मन्दिनं दुक्षन्वृधे गोरभसमद्रिभिर्वाताप्यम् ॥ ८ ॥**

अष्टा । महः । दिवः । आदः । हरी इति । इह । द्युम्नऽसहम् । अभि । योधानः । उत्सम् ।
हरिम् । यत् । ते । मन्दिनम् । धुक्षन् । वृधे । गोऽरभसम् । अद्रिऽभिः । वाताप्यम् ॥ ८ ॥

---

## भाषायाम्.

८. [ हे इन्द्र ], यत् ( =यत्र स्थले=अस्मद्गृहरूपे ) ते वृधे ( =तव वर्धनाय= तव सुखार्थं ) मन्दिनं ( =मदकरं ) गोरभसं ( =गोः पयसा वेगवन्तं ) वाताप्यं ( =शीघ्रकारिणं ) हरिं ( =हर्षकरं सोमम् ) अद्रिभिः ( =ग्रावभिः) धुक्षन् ( =दोहयन्ति=अभिषुण्वन्ति ) इह ( =तत्रास्मद्गृहे ) द्युम्नासाहं ( =धनापहारिणम् ) उत्सं ( =शत्रुम् ) अभि ( =अभिलक्ष्य=तेन सह ) योधानः ( =योधनशीलस्त्वं ) महो दिवः ( =महतो द्युलोकस्य सकाशाद् ) अष्टा ( =अष्टौ=प्राप्तौ=आगत्य अत्र स्थितौ ) हरी ( =तव हरिद्वर्णाविश्वौ ) आदः ( =सोमं पायय ) ॥

महो महतो दिवो मदकरस्य सोमस्याष्टा भोक्तारौ हरी स्वकीयावश्वाविहास्मिन् कर्मण्यादः पीतशेषं सोमं पायय । तथा द्युम्नासाहं द्युम्नस्यास्मदीयस्य धनस्याभिभवितारमुत्समुत्स्रावयितारं शत्रुं योधानो योधनशीलस्त्वमभिभव । यद्यदा ते तव वृधे वर्धनाय हरिं मनोहरं मन्दिनं मदकरं गोरभसम् । अत्र गोशब्दः पयसि वर्तते । पयो बलम् । तद्वद्वेगवन्तं वीर्यवन्तमित्यर्थः । वाताप्यम् । वातेन प्राप्तव्यं वाततुल्येन शीघ्रकारिणा त्वया पातव्यमित्यर्थः । एवंविधं सोममद्रिभिर्ग्रावभिर्धुक्षन् । दुहन्ति । ऋत्विजोभिषुण्वन्ति तदानीमष्टेति पूर्वत्र संबन्धः । इति सायणः ॥

८. तुला आनंद होण्यासाठीं मदकारी, गोरसानें वेगवान् केलेला, [ आणि ] प्रतापी सोम ग्राव्यांनीं काढीत आहेत तेथें, [ हे इंद्रा ], द्रव्य हरण करणाऱ्या शत्रूशीं लढणारा असा जो तूं तो महान् द्युलोकापासून आलेल्या तुझ्या अश्वांला [ सोम ] पाज.

8. [ O Indra ], there where they, for thy delight, extract with the stones the exhilarating, delightful, strong and quick Soma, cause thou, who fightest against the enemy that stealeth the wealth, thy [pair of] tawny horses, which have come from the great heaven, to drink the Soma.

८. भावार्थः—' या प्रसंगीं आमचे घरीं तुला पाजून हर्षयुक्त करण्याकरितां म्हणून आम्ही सर्व मंडळी मिळून मदकारी, लवकर हर्ष उत्पन्न करणारा, आणि चपळ असा सोम ग्राव्यांच्या योगानें काढीत आहों; तर हे इंद्रा, तूं तो सोम महान् द्युलोकापासून येथें येऊन पोंहचलेले जे तुझे घोडे त्यांसहि पाज, आणि आमचें द्रव्य हरण करून जाणारा जो शत्रु त्याजवर घाला घाल.'

या ऋचेंत जरी दोन तीन शब्द कठीण आहेत, तरी भावार्थ वर दिल्याप्रमाणें आहे यांत संशय नाहीं. सायणांचेंहि भाष्य भाषेंत उतरून घेतलें आहे तें पहा.

' ग्राव्यांनीं ' =' अद्रिभिः. ' म्हणजे सोमवल्ली कुटावयाचे जे दगड त्यांहींकरून.

वृत्तासाठीं ' वातापिअम् ' असें चवथ्या चरणांत म्हणावें लागतें.

**त्वमायसं प्रति वर्तयो गोर्दिवो अश्मानमुपनीतमृभ्वा ।**
**कुत्साय यत्र पुरुहूत वन्वञ्छुष्णमनन्तैः परियासि वधैः ॥ ९ ॥**

त्वम् । आयसम् । प्रति । वर्तयः । गोः । दिवः । अश्मानम् । उपऽनी-तम् । ऋभ्वा ।
कुत्साय । यत्र । पुरुऽहूत । वन्वन् । शुष्णम् । अनन्तैः । परिऽयासि । वधैः ॥ ९ ॥

**पुरा यत्सूरस्तमसो अपीतेस्तमद्रिवः फलिगं हेतिमस्य ।**
**शुष्णस्य चित्परिहितं यदोजो दिवस्परि सुग्रथितं तदादः १०॥२९**

पुरा । यत् । सूरः । तमसः । अपिऽइतेः । तम् । अद्रिऽवः । फलिऽग-म् । हेतिम् । अस्य ।
शुष्णस्य । चित् । परिऽहितम् । यत् । ओजः । दिवः । परि । सुऽग्र-थितम् । तत् । आ । अदः । रित्यदः ॥ १० ॥ २९ ॥

---

## भाषायाम्.

९. हे पुरुहूत (=बहुभिराहूत=बहुभक्त) [इन्द्र], यत्र (=यदा) कुत्साय वन्वन् (=कुत्साय नामोपासकाय प्रसादं कुर्वन्=तम् अनुगृह्णन्) शुष्णम् (=एतन्नामानं तमोरूपम् असुरम्) अनन्तैर्वधैः (=अन्तरहितैर्घातकैः शस्त्रैः) परि यासि (=परितो गच्छसि-परिवेष्टयसि) [तदानीम्] ऋभ्वा (=महान्) त्वं दिवः उपनीतं (=द्युलोकाद् आनीतम्) आयसम् अश्मानं (=लोहमयं पाषाणं=वज्रं) गोः (=गो-विकारभूतात् ज्यारूपाच्चर्मणः) प्रति वर्तयः (=प्रत्यवर्तयः=व्यसृजः) ॥

सायणस्तु गोर्गन्तुः शुष्णस्यासुरस्य वधार्थम् इति ॥

१०. हे अद्रिवः (=अद्रिमन्=वज्रिन्), पुरा [काले] यद् (=यदा) सूरः (=सूर्यस्) तमसः अपीतेः (=अन्धकारस्य आवरणात्) [मोचयितव्य आसीत् त-दानीं] [त्वं] फलिगं (=मेघं प्रति=मेघरूपेण सूर्यमावृण्वन्तं शुष्णं प्रति) हेतिम् अस्य (=शस्त्रम् अस्तवानसि प्रक्षिप्तवानसि)। [अपि च] शुष्णस्य चित् (=शुष्ण-स्यापि) यद् ओजः (=बलं) दिवस्परि (=द्युलोकं परितः) परिहितं (=परितः स्थापितं) सुग्रथितं (=सम्यक् बद्धं) [च] [आसीत्] तत् [त्वम्] आ अदः (=व्यदारयः=विदारितवानसि) ॥

९. हे बहुभक्त [ इंद्रा ], तूं कुत्सावर प्रसाद करून जेव्हां शुष्णाला अनंत शस्त्रांनीं वेष्टिलेंस, [ तेव्हां ] महान् [ असा जो ] तूं तो द्युलोकाहून आणिलेला लोहमय पाषाण गोफणींतून [ शुष्णावर ] मारिता झालास.

९. Thou the mighty hero, didst whirl on [ S'ushṇa ] from the sling the adamantine rock brought down from heaven, when, O thou, invoked by many, in favouring Kutsa didst surround S'ushṇa with endless deadly weapons.

१०. हे वज्रधारी [ इंद्रा ], पूर्वीं जेव्हां सूर्य अंधकाराच्या संकटापासून [मुक्त करावयाचा होता], तेव्हां तूं मेघावर शस्त्र टाकिता झालास. आणि स्वत: शुष्णाचें जें बळ सर्व द्युलोकभर व्यापून निश्चल बसलें होतें, तें तूं विदारून टाकिता झालास.

10. When in ancient times the sun [ had to be freed ] from the seige of darkness, thou didst, O wielder of the thunderbolt, throw thy weapon against the cloud; and thou didst break that force of S'ushṇa himself which had surrounded the heaven [ and ] was firmly established.

---

९. 'हे इंद्रा, कुत्साला रक्षण्यासाठीं जेव्हां तूं शुष्णाला असंख्य शस्त्रांनीं वेष्टिलेंस तेव्हां तूं त्याजवर आपलें लोखंडासारिखें वज्र स्वर्गातून गोफणीनें जणूं टाकिलेंस' असा भावार्थ आहे.

'शुष्ण' आणि 'कुत्स' यांविषयीं सू. ५६ मं. ३ याजवरील टीप आणि सू. ५१ मं. ६ याजवरील टीप भाग १ पृ. ६९३ याजवर पहा.

'गोफणींतून'= 'गोः.' 'गो' शब्दाचा अर्थ गाईच्या कातड्याची केलेली वादी असा ऋक्संहितेंत पुष्कळ ठिकाणीं होत असतो. 'गोफणींतून' हा अर्थ कितीएक पश्चिमेकडील विद्वानांनीं सुचविलेला आहे, तो निराधार आहे असें वाटत नाहीं, यास्तव आम्हीं घेतला आहे.

वृत्तसुखार्थ पहिल्या पादांत 'त्वम्' याच्या ठिकाणीं 'तुअम्' असें म्हटलें पाहिजे.

१०. ऋषीचा अभिप्राय:—'हे इंद्रा, पूर्वीं जेव्हां सूर्य अंधारानें आणि मेघरूप वृत्रानें व्यापून गेला आणि नाहींसाच जणूं झाला, तेव्हां त्वां मेघावर आपलें वज्र मारिलें, आणि शुष्णाचें जें बळ सकळ द्युलोकभर पसरून सूर्याचा ह्रास करून राहिलें होतें, आणि घट्ट द्युलो-

**अनु त्वा मही पाजसी अचक्रे द्यावाक्षामा मदतामिन्द्र कर्मन् ।**
**त्वं वृत्रमाशयानं सिरासु महो वज्रेण सिष्वपो वराहुम् ॥ ११ ॥**

अनु । त्वा । मही इति । पाजसी इति । अचक्रे इति । द्यावाक्षामा । मदताम् । इन्द्र । कर्मन् ।
त्वम् । वृत्रम् । आऽशयानम् । सिरासु । महः । वज्रेण । सिस्वपः । वराहुम् ॥ ११ ॥

---

## भाषायाम्.

११. हे इन्द्र, कर्मन् (=कर्मणि=वृत्रवधरूपे महाकर्मणि=तस्य प्रसङ्गे) मही (=महत्यौ) पाजसी (=तेजस्विन्यौ) अचक्रे (=क्रमणरहिते=अचले) द्यावाक्षामा (=द्यावापृथिव्यौ) त्वा [त्वाम्] अनु मदताम् (=अन्वमन्यतां=हृष्टमकुरुतम्)। [तदनन्तरं] सिरासु (=मेघोदकप्रवाहेषु=मेघोदकप्रवाहप्रदेशेषु=अन्तरिक्षे) आशयानम् (="आ समन्ताद्व्याप्य वर्तमानं") वराहुं वृत्रं (=वृत्ररूपं वराहं=वराहसदृशं वृत्रं) महः (=महान्) त्वं वज्रेण सिष्वपः (=असिष्वपः=अस्वापयः=भूमौ पातितवानसि) ॥

---

काला चिकटून जणूं बांधलेंच गेलें होतें तें त्वां विदारून टाकिलें आणि या प्रकारेंकरून सूर्याची मोकळीक केली.'

['मुक्त करावयाचा होता']. या शब्दांच्या ठिकाणीं मुळांत शब्द नाहींत, आणि तेवढें वाक्य अध्याहृत घ्यावें लागतें. हा अध्याहार अगदी स्वाभाविक आहे असें नाहीं, पण तो केल्याशिवाय निर्वाह नाहीं.

'टाकिता झालास'=' अस.' अक्षरार्थ 'टाक' असा आज्ञार्थी आहे, पण भूतकाळार्थी आज्ञार्थी रूपें वेदांतच येतात असें नाहीं, इतर भाषांतहि तशी चाल आहे.

'वज्रधारी'=' अद्रिवः.' अक्षरार्थ, खडक फेकणारा; म्हणजे खडक उचलून तो मारिल्याप्रमाणें मारणारा. विजेचा आवाज आणि प्रहार होतो तो मोठा एकादा खडक येऊन पडल्याप्रमाणें होतो, म्हणून इंद्राला 'अद्रिवान्' असें म्हणतात.

११. हे इंद्रा, महान्, तेजस्वी, [ आणि ] निश्चल [ जे ] पृथिवी आणि द्युलोक [ ते ] [ वृत्रहननाच्या मोठ्या ] कामीं तुझें अभिनंदन करिते झाले. [ नंतर ] उदकप्रवाहीं व्यापून राहिलेल्या वृत्ररूपी वराहाला महान् [ असा जो तूं तो ] वज्रानें भूमीवर निजविता झालास.

11. In [thy great] exploit, O Indra, the great, resplendent, [and] immoveable Heaven and Earth congratulated thee. Thou the great one didst [ then ] lay prostrate with [ thy ] thunderbolt the boar [ like] Vṛitra that was lying in the streams.

---

११. भावार्थ असा आहे कीं, ' इंद्रानें वृत्राला मारण्याकरितां जें मोठें काम आरंभिलें, त्या प्रसंगीं पृथ्वी आणि द्युलोक हे अचल असतांहि त्यांनीं इंद्राचें अभिनंदन करून त्याची प्रशंसा केली. तेणेंकरून इंद्राला मोठें स्फुरण येऊन त्याणें अंतरिक्षभर व्यापून राहिलेला आणि मेघोदकांच्या प्रवाहांस अवरोधून टाकणारा जो वृत्र, तो मारून त्याला भूमीवर पाडिलें.'

' उदकप्रवाहीं व्यापून राहिलेला '= ' सिरासु आशयानम्.' अक्षरार्थ ' प्रवाहांत निजून राहिलेला ' इतका आहे. म्हणजे मेघोदकाचे जे प्रवाह बाष्परूपानें अंतरिक्षांत असतात त्यांत राहिलेला.

' वृत्ररूपी वराहाला '= ' वृत्रं वराहुम्.' बळ, पराक्रम आणि वेग हीं प्रदर्शित करावयाचीं असलीं म्हणजे जशी सिंहाची उपमा देण्याची चाल अर्वाचीन काळीं आहे, तशी वेदकाळीं वराहाची उपमा देण्यांत येत असे. प्रस्तुत मंत्राप्रमाणेंच सू. ६१ मं. ७ यांत ' वराह ' शब्दाचा प्रयोग आला आहे तो पहा.

वृत्तासाठीं तिसऱ्या पादांत ' त्वम् '-च्या ठिकाणीं ' तुअम् ' असें वाचावें लागतें.

त्वमिन्द्र नर्यो याँ अवो नृन्तिष्ठा वातस्य सुयुजो वहिष्ठान् ।
यं ते काव्य उशना मन्दिनं दाद्वृत्रहणं पार्यं ततक्ष वज्रम् ॥ १२ ॥

त्वम् । इन्द्र । नर्यः । यान् । अवः । नॄन् । तिष्ठ । वातस्य । सुऽयुजः । वहिष्ठान् ।
यम् । ते । काव्यः । उशना । मन्दिनम् । दात् । वृत्रऽहनम् । पार्यम् । ततक्ष । वज्रम् ॥ १२ ॥

त्वं सूरो हरितो रामयो नॄन्भरच्चक्रमेतशो नायमिन्द्र ।
प्रास्य पारं नवतिं नाव्यानामपि कर्तमवर्तयोऽयज्यून् ॥ १३ ॥

त्वम् । सूरः । हरितः । रमयः । नॄन् । भरत् । चक्रम् । एतशः । न । अयम् । इन्द्र ।
प्रऽअस्य । पारम् । नवतिम् । नाव्यानाम् । अपि । कर्तम् । अवर्तयः । अयज्यून् ॥ १३ ॥

---

## भाषायाम्.

१२. हे इन्द्र, नर्यः (=नृभ्यो हितस्)[त्वं] नृन् (=शौर्योपेतान्) सुयुजः (=शोभनं यथा तथा रथे युज्यमानान्) वहिष्ठान् (=वोढृतमान्=अतिशयेन वोढॄन्) यान् वातस्य (=वायोः) [अश्वान्] अवः (= रक्षसि=पालयसि) [तान् अश्वान्] त्वं तिष्ठ (=आतिष्ठ=तैर्युक्तं रथमारोह)। [अपि च] उशना काव्यः (=कवेः पुत्रः उशना नाम पुरुषो) मन्दिनं (=मदकरं=युयुत्साप्रेरकं) यं वज्रं ते (=तुभ्यं) दात् (=अदात्) [तं हस्ते धारय]। [स तं] वृत्रहणं (=वृत्रघातकं) पार्यं (=शत्रून् पारयितुं योग्यं=विजयिनम्) [एतादृशं] ततक्ष (=निर्मितवान्) [हि] ॥

सायणस्तु वातस्य तुल्यान् तद्वच्छीघ्रं गच्छतः......... । काव्यः कवेः पुत्र उशना मन्दिनं मदकरं यं वज्रं ते तुभ्यं दात् । दत्तवान् । तं वज्रं वृत्रहणं वृत्रस्यासुरस्य घातकं पार्यं शत्रूणां पारणेऽतिक्रमणे समर्थं च ततक्ष । तनूकृतवानसि । इति ॥

१३. हे इन्द्र, सूरस्त्वं (="सूर्यात्मना वर्तमानस्त्वं") नृन् (=वीर्योपेतान्) हरितः (=हरिद्वर्णांस्तवाश्वान्) रमयः (=अरमयः=न रथे योजयसि) [तदा तु] अयम् एतशः न (=एतशो नाम सूर्याश्वः) चक्रं (=रथचक्रं=रथं) भरत् (=अभरत्=प्रावहत्)। [अपि च त्वम्] अयज्यून् (=अयजमानान्=देवभक्तिहीनान् जनान्)

१२. हे इंद्रा, नरहितचिंतक तूं जे शूर, उत्तम रीतीनें जोडिले जाणारे आणि उत्तम रीतीनें वाहून नेणारे वायूचे घोडे पाळितोस, त्यांजवर बैस; [आणि] उशना काव्य तुजकरितां जें ईर्षाकारी, वृत्रघातक, आणि विजयी वज्र करिता झाला, आणि तुला देता झाला, तें तूं हातांत धर.

१३. हे इंद्रा, सूर्यरूपी तूं, [ आपले ] शूर पिंगट घोडे थांबविता झालास, आणि तो एतश चाक ओढिता झाला. तूं यजन न करणाऱ्या जनाला नव्वद नद्यांच्या पार हाकून देऊन त्यांस खळग्यांत घालिता झालास.

12. Do thou, O Indra, who art the friend of men, mount those horses of the wind, brave, well-trained [ and ] most able to carry, which thou keepest; [and] [ wield thou in thy hand ] the maddening thunderbolt which Us'anâ Kâvya gave to thee: he fashioned it capable of killing Vritra [and] subduing the enemy.

13. Thou, O Indra, [as] the sun, didst stop [ thy ] brave tawny horses; that Etas'a dragged the wheel. Having driven the unsacrificing men to the other bank of the ninety rivers, thou didst hurl [ them ] into the pit.

---

१२. भावार्थः–' तर हे इंद्रा, जनांचें हित करण्यासाठीं तूं जे चलाख, उत्तम शिकाऊ आणि मनांत आणिलेल्या स्थळीं उत्तम रीतीनें घेऊन जाणारे वायूचे घोडे पाळितोस, ते आतां आपल्या रथास जोडून त्या रथांत बसून तूं नीघ, आणि उशना काव्य यानें जें वीरश्री उत्पन्न करणारें, वृत्राला मारणारें, आणि विजयशील असें वज्र करून तुला दिलें, तें हातांत घे.' म्हणजे, तसल्या घोड्यांनीं ओढलेल्या रथांत बसून, आणि तसलें वज्र हातांत घेऊन तूं उशना काव्य याला रक्षण्याकरितां निघालास आणि वृत्राला मारिता झालास.

' वायूचे '=' वातस्य.' इंद्र वायूच्या घोड्यांवर बसून जातो आणि उशना काव्याला साहाय्य करितो अशाविषयीं सू. ५१ मं. ११ आणि सू. ८३ मं. ५ आणि त्यांजवरील टिपा पहा.

' उत्तम रीतीनें जोडिले जाणारे '= 'सुयुजः.' म्हणजे मस्ती न करणारे, उत्तम शिकाऊ.

' उशना काव्य.' सू. ५१ मं. ११ आणि सू. ८३ मं. ५ आणि टिपा पहा. उशना काव्यानें इंद्राला वज्र करून दिलें असें जें सांगितलें आहे, त्याचें तात्पर्य

त्वं नो॑ अ॒स्या इ॑न्द्र दु॒र्हणा॑याः पा॒हि व॑ज्रिवो दुरि॒ताद॒भीके॑ ।
प्र नो॒ वाजा॑न्र॒थ्यो॒३॒॑ अश्व॑बुध्यानि॒षे य॑न्धि॒ श्रव॑से सू॒नृता॑यै ॥ १४ ॥

त्वम् । नः॒ । अ॒स्याः । इ॒न्द्र॒ । दुः॒ऽहना॑याः । पा॒हि । व॒ज्रि॒ऽवः॒ । दुः॒ऽइ॒ता॒त् । अ॒भीके॑ ।
प्र । नः॒ । वाजा॑न् । र॒थ्यः॑ । अश्व॑ऽबुध्यान् । इ॒षे । य॒न्धि॒ । श्रव॑से । सू॒नृता॑यै ॥ १४ ॥

---

नवतिं ( =नवतिसंख्याकानां ) नाव्यानां ( =नदीनां ) पारम् ( =अपरतीरदेशं ) प्रास्य ( =प्रक्षिप्य ) कर्तम् अपि ( =गर्तम् उपरि ) अवर्तयः (=अगमयः ) ॥

अस्याः पूर्वार्धो दुर्बोधः । सायणेनैवं व्याख्यातेयम् । हे इन्द्र सूरः सूर्यात्मना वर्तमानस्त्वं हरितो हरिद्वर्णान् नॄन् नेतॄन् अश्वान् । यद्वा रसहरणशीलान् रश्मीन् रामयः । उपारमयः । एतशो न । एतश इति सूर्याश्वस्याख्या । तथा च श्रूयते । एतशेन त्वा सूर्यो देवता गमयत्विति । नशब्दश्चार्थे । एतशश्च रथस्य चक्रं भरत् । प्रावहत् । अपि च । त्वं नाव्यानां नावा तार्याणां नदीनां नवतिं नवतिसंख्यामतीत्य वर्तमानं पारं तीरदेशम् । सप्तम्यर्थे द्वितीया । तीरदेशेऽज्यून् अयजमानान् यज्ञविहीनानसुरादीन् प्रास्य प्रक्षिप्य तत्र कर्तमवर्तयः । कर्तव्यमपि कृत्वा तानयजमानानवर्तयः । प्रापयः । इति ॥

---

## भाषायाम्.

१४. हे इन्द्र, त्वं नः (=अस्मान्) अस्याः (=अस्मान्सांप्रतं पीडयन्त्या) दुर्हणायाः (=दुःखेन हन्तव्यायाः=दरिद्रावस्थायाः सकाशात्) [पाहि]। हे वज्रिवः (=वज्रिवन्=वज्रवन्=वज्रिन् ), दुरितात् अभीके ( =दुरितप्रसङ्गात्=पापसकाशात् ) [ नः] पाहि ( =रक्ष ) । [ अपि च ] नः ( =अस्मभ्यम् ) इषे ( =अन्नाय=अन्नलाभाय ) श्रवसे ( =कीर्तये=कीर्तिलाभाय ) सूनृतायै ( =प्रियसत्यवाचे=प्रियसत्यवागात्मकायै स्तुतये=तादृक्स्तुतिलाभाय ) [ च ] रथ्यः ( =रथयुक्तान् ) अश्वबुध्यान् ( =अश्वैर्ज्ञातव्यान् =अश्वप्रमुखान् ) वाजान् ( =नानाविधानि धनानि ) प्र यन्धि ( =प्रयच्छ ) ॥

---

असें कीं, उशनानें इंद्राची स्तुति केली तेव्हां इंद्राचें वज्र जणुं निर्माण झालें, आणि तें त्याणें मग इंद्राला दिलें.

'ईर्षाकारी '=' मन्दिनम्.' म्हणजे जें हातांत घेतांच आंगीं वीरश्री येते असें.

वृत्तासाठीं पहिल्या पादांत 'त्वमिन्दर नरिओ ' असें वाचलें पाहिजे.

१३. हीहि ऋचा कठिणच आहे.

१४. हे इंद्रा, नाहींशी करावयास कठिण अशी जी ही [दरिद्रावस्था], तिजपासून तूं आम्हांला [ तार ]; हे वज्रधरा, तूं आम्हांला पापापासून सुद्धा तार. तूं आम्हांला रथ आणि घोडे यांहीं भरलेली विपुल संपत्ति दे, कीं जेणेंकरून आम्हांस अन्न, कीर्ति आणि प्रशंसा ह्यांचा लाभ होईल.

14. Preserve us, O Indra, from this hard distress, preserve us, O wielder of the thunderbolt, from the jaws of evil. Grant us riches accompanied by chariots and horses, that we may obtain food, renown [and] praise.

पण वर दिलेल्या भाषांतराचा भावार्थ असा आहे कीं, 'हे इंद्रा, तूं जेव्हां सूर्यरूपानें असतोस, तेव्हां तूं आपले पिंगट घोडे एकीकडेस ठेवितोस; आणि सूर्याचा जो 'एतश' या नांवाचा प्रसिद्ध वारू, तो तुझ्या रथाला जोडिलेला असतो. आणि मग तूं अधार्मिक जनांस त्रिभुवनांतून हाकून लावून खाड्यांत लोटून देत असतोस.'

'नव्वद नद्यांच्या पार'=' नवतिं नाव्यानां पारम्.' या नव्वद नद्यांविषयीं सू. ८० मं. ८ या मंत्रावरची टीप पहा.

'खळग्यांत'=' कर्तम् अपि.' नरकांत असा अर्थ केल्यास, ऋषीचें हद्ग निघेल असें वाटतें. 'कर्त'शब्दाचा 'खळगा' हा अर्थ सायणांनीं दिलेला नाहीं; पण 'कर्त' आणि 'गर्त' एकच असें जें पाश्चिमात्य विद्वान् समजतात तें, 'कर्त'शब्दाचे प्रयोग असलेल्या ऋक्संहितेंतील सर्व ऋचा काढून पहातां आधारबद्ध आहे असें आम्हांस वाटतें. सायणांनीं केलेला अर्थ भाषेखालीं उतरून घेतला आहे.

वृत्तासाठीं पहिल्या पादांत 'त्वम्'-च्या ठिकाणीं 'तुअम्,' तिसऱ्यांत 'नाविआनाम्' आणि चवथ्यांत 'अवर्तयो अयज्यून्' असें म्हणावें लागतें.

१४. आतां सूक्त संपत आलें तशी ऋषि इंद्रापाशीं अभीष्टप्रार्थना करीत आहे. तिचा भावार्थ उघडच आहे कीं, 'हे इंद्रा, आम्ही ज्या ह्या दारिद्र्यांत पडलों आहों, त्यांतून आम्हांस पार पाड आणि संकटापासून सोडीव. आणि आम्हांस अनेक प्रकारची, रथ अश्व इत्यादिकांसहित संपत्ति दे, कीं तेणेंकरून आम्हांस खाण्यापिण्याला विपुळ मिळून आमची कीर्ति आणि औदार्य यांची प्रशंसा होईल.'

"पापापासून सुद्धा'=' दुरिताद् अभीके.' 'अभीके' हें अव्यय आहे. जसें

मा सा ते अस्मत्सुमतिर्वि दसद्वाजप्रमहः समिषो वरन्त ।
आ नो भज मघवन्गोष्वर्यो मंहिष्ठास्ते सधमादः स्याम ॥
॥ १५ ॥ २६ ॥ ८ ॥ १ ॥

मा । सा । ते । अस्मत् । सुऽमतिः । वि । दसत् । वाजऽप्रमहः ।
सम् । इषः । वरन्त ।
आ । नः । भज । मघऽवन् । गोऽषु । अर्यः । मंहिष्ठाः । ते । सध-
ऽमादः । स्याम ॥ १५ ॥ २६ ॥ ८ ॥ १ ॥

## समाप्तोयं प्रथमोष्टकः ।

### भाषायाम्.

१५. सा ते सुमतिः ( =तस्मात्=यस्माद्वयमेवं त्वां स्तुतवन्तः स्मस्तस्मात् तव शोभनानुग्रहबुद्धिः ) अस्मत् ( =अस्मत्सकाशात् ) मा वि दसत् ( =" मा विशुष्यतु "=मापैतु ) । हे वाजप्रमहः ( =धनैः प्रमहन्=धनसंपन्न ), इषः ( =अन्नानि ) सं वरन्त ( =संवृण्वन्तु=अस्मान् संवृतान् कुर्वन्तु ) । हे मघवन् ( =धनवन्निन्द्र ), अर्यः ( =धनपतिस्त्वं ) नः गोषु आ भज ( =अस्मांस्तव गोसंपत्सु भागिनः कुरु= अस्मभ्यं गा देहि ) । [ तदनन्तरं वयं ] ते मंहिष्ठाः ( =अतिशयेन हविर्भिः स्तुतिभिश्च त्वां वर्धयितारः सन्तः ) सधमादः साम ( =पुत्रपौत्रादिभिः सह माद्यन्तो भवेम=सपुत्रपौत्रा वयं त्वां भजेमहि ) ॥

## । समाप्तेयं प्रथमाष्टकस्य व्याख्या ।

पञ्चमीच्या किंवा षष्ठीच्या मागून संस्कृतांत ' सकाशात् ' हें येत असतें त्याप्रमाणेंच ' अभीके ' याचा प्रयोग पञ्चमीच्या मागून होतो. ' अभीके ' याचा अक्षरार्थ 'जवळ' इतकाच आहे. आम्ही पापाच्या जवळ असतांहि, आम्ही पापाच्या जणुं जबड्यांत सांपडलों असतांहि, तेथून आम्हांला सोडीव, असा ह्याचा अर्थ आहे.

वृत्तासाठीं ' त्वम्'च्या ठिकाणीं पहिल्या पादांत ' तुअम्,' आणि तिसऱ्यांत ' रथ्यो'च्या ठिकाणीं ' रथिओ ' असें म्हणावें लागतें.

१५. तर हे धनसंपन्न [इंद्रा], तुझी कृपा आम्हांला न सोडो; अन्नसंपत्ति आमच्या पदरीं राहोत. हे मघवन्, उदार [असा जो] तूं, [तो] आम्हांला गाई मिळवून दे, [मग आम्ही] तुला पुष्कळ हव्यें देऊन कुटुंबाच्या मनुष्यांसहित तुझ्या भजनांत परायण होऊं.

15. So may not your benevolence depart from us, may all foods wait upon us, O thou great in riches. Do thou who art bounteous, O Maghavan, make us share in [thy wealth of] cows; and we will then, offering many oblations to thee, be exhilarating ourselves together in thy service.

१५. हा या सूक्ताचा उपसंहार येथें झाला म्हणून ऋषि शेवटची प्रार्थना इंद्रापाशीं करितो कीं, 'हे इंद्रा, याप्रमाणें आम्हीं तुझी स्तुति केली आहे, तर तुझी कृपा आम्हांला कधींहि सोडून न जाओ. हे उदार देवा, सर्व अन्नसंपत्ति आम्हांला वेष्टून आमच्या सेवेंत जणुं तत्पर राहोत. तुझ्या घरीं गाई असंख्य आहेत त्यांतून कांहीं आम्हांला दे. आणि मग आम्ही तुला हव्यें आणि स्तोत्रें अर्पण करून, सर्व कुटुंब मिळून तुला सोमादिकानें तृप्त करून, त्वत्परायण होऊं.'

वैदिक ऋषींच्या ज्या प्रकारच्या प्रार्थना असतात, त्यांच्या मासल्याचीच ही प्रार्थना आहे. यांत इतकें स्पष्ट दिसतें कीं, ऋषीच्या मनांत एक आणि बाहेर एक असें नाहीं; त्याला जी प्रार्थना करावी असें वाटतें ती तो स्पष्ट बोलून दाखवितो. ऐहिक भोगाचे पदार्थ इंद्राएवढ्या मोठ्या देवापाशीं काय मागावे अशी शंका त्याला वाटत नाहीं.

ऋक्संहितेंत कितीएक दुर्बोध सूक्तें आहेत त्यांतून या सूक्ताचा बहुतेक भाग आहे. शेवटचे दोन मंत्र शिवाय करून प्रत्येक मंत्रांत कांहींनाकांहीं तरी अडचण आहे. प्रथमचे तर कितीएक मंत्र इंद्राविषयींच आहेत अशी सुद्धा खातरी होत नाहीं.

येथें पहिला अष्टक संपला.

THE

# VEDARTHAYATNA

OR

## AN ATTEMPT TO INTERPRET THE VEDAS,

**A MARÂṬHÎ AND AN ENGLISH TRANSLATION,**

TOGETHER WITH A SANSKRIT PARAPHRASE,

OF THE

## ṚIGVEDA SAṀHITÂ

WITH THE

**ORIGINAL SAṀHITÂ AND PADA TEXTS**

AND

NOTES IN MARÂṬHI

*( Registered under Act XXV of 1867 )*

## VOL. II.

*( Adhyâyas V–VIII of Ashṭaka I. )*

**Hymns 62–121.**

Bombay:

PRINTED AT THE "NIRNAYA-SAGAR" PRESS

*September 1878.*

# वेदार्थयत्न.

## ऋग्वेदसंहिता.

पदांसहित

व

तिचें मराठी आणि इंग्रजी

**भाषांतर**

आणि संस्कृत व्याख्या, आणि मराठी टीका.



**भाग २.**

( अष्टक १, अध्याय ५–८ ).

मुंबईंत

"निर्णयसागर" छापखान्यांत छापिलें.

शके १८००.

सेप्टेंबर १८७८ इ०.

| | रु. | आ. |
|---|---|---|
| रा. सा. नीलकंठ भगवंत मुळे मामलेदार.... .... .... | १२– | १२ |
| नेटिव लायब्ररी दापोली........................................ | ६– | ६ |
| रा. रा. शिवराव गोविंद मुंबई ................................ | ६– | ० |
| रा. रा. गंगाराम भाऊ म्हसके ................................ | १२– | १२ |
| ,, गोपाळ सींग टीचर. ................................ | ६– | ६ |
| जे. ए. व्हान्स................................................ | १९– | २ |
| ,, कृष्णराव हणुमंत वकील ........................ | १२– | ० |
| ,, कृष्णराव हरि क्लार्क आफ धि कोर्ट.............. | १२– | ० |
| नेटिव लायब्ररी मंडलेश्वर ................................ | ६– | ६ |
| ,, रिडिंग रूम रामपूर.................................... | ६– | ६ |

Registered No. 119 of 1878.

# सूचना.

| | रु. | आ. |
|---|---|---|
| वर्षाची वर्गणी, आगाऊ | १ | ० |
| मुंबईबाहेर राहणारांस टपाल हंशिलाबद्दल दरवर्षाचे | ० | ६ |

All communications to be addressed to the Manager Mr. Mahâdev Nârâyan Pandit, No. 29 *Moroba Popatji's Oart, Kalka Devi Road, Bombay.*

ग्रंथकर्त्याच्या नांवचा वगैरे सर्व प्रकारचा पत्रव्यवहार मुंबई मोरोबा पोपटजीची वाडी घर नंबर २९, या पत्त्यावर रा. रा. महादेव नारायण पंडित "म्यानेजर वेदार्थयत्न" यांच्याशीं ठेवावा.

**विशेष सूचना.**—आमच्या कितीएक वर्गणीदारांकडे गेल्या वर्षाची बाकी येणें आहे ती त्यांणीं मेहेरबानी करून लवकर पाठवून द्यावी. बाकीचा उलगडा झाल्याविना अंक पाठविण्याचें बंद करण्यांत येणार नाहीं.

तिकिटें पाठविणें झाल्यास अर्ध्या आण्याच्या दराचीं असून दर रुपयास अर्धा आणा वर्ताळा असावा. नाटपेड पत्र घेतलें जाणार नाहीं.

42760

